करूं लागले.'- मदरू ३.२९.

**आजराहे** पहा : **अज्राहे**

**आजलग** क्रिवि. आजपर्यंत; आजतागायत; आतापर्यंत.[सं. अद्य+लग्न]

**आजला** क्रिवि. १. आज; आजच्यासाठी, करिता. २. आजच्या दिवशी; एव्हाना.

**आजवर-वरी-वेरी** क्रिवि. आजपर्यंत; अद्याप; हा काळपावेतो.

**आजवर्दी-वर्ष-वर्षी** क्रिवि. ज्या काळास आज वर्ष झाले तो काळ दाखवणे या अर्थी; तो दिवस.

**आजवळ** पहा : **आजोळ** : 'राम म्हणे वत्से! तूं आजवळा पावलीस न वनातें।'- मोउद्योग १३.८

**आजस्वारी** अ. (आज स्वारी अमुक मुक्कामीं आहे वगैरे मायना) लष्करातून; स्वारीमधून (हुकूम निघतो की - आज्ञापत्र निघते जे). जुन्या कागदपत्रांत हा शब्द आज्ञापत्राच्या आरंभी लिहितात. [फा. अझ् = पासून + स्वारी]

**आजा, आजास** पु. आईचा पिता; बापाचा पिता : 'वधिलें कैंसें धनार्थ आज्याला' - मोभीष्म १.२४.

**आजागुरु, आजेगुरु** पु. गुरूचा गुरू.

**आजात - द** वि. स्वतंत्र; मुक्त : 'यांच्या मुलामाणसांचें चालवून (त्यांस) आजात करावे.' - ऐटि १.२२. [फा. आजाद]

**आजात** अ. अलगद : 'तो माणूस टाणूदिशी उडून झाडाच्या फांदीवर आजात जाऊन बसला होता.'-मिरास ३.

**आजादी** स्वातंत्र्य. [फा. आजादी]

**आजादेवी** स्त्री. कनिष्ठ समजल्या जाणाऱ्या लोकांची एक देवता.

**आजानुबाहु-हू** वि. उभे राहिल्यावर ज्याचे हात गुडघ्यापर्यंत पोचतात असा (मनुष्य) : (ल.) भाग्यवान 'ऐके आजानुबाहो नृपनाथा।'- एभा ३.७६. [सं.]

**आजार** पु. १. रोग; दुखणे; व्याधी. २. (ल.) उपद्रव; पीडा; जुलूम; त्रास : 'त्याणीं रयतेस काडीचा आजार द्यावया गरज नाहीं.'- मइसा ८.२४. [फा. आजार]

**आजारखाती** वि. नेहमी आजारी असणारा : 'तो आजारखातीच झाला होता म्हणावा!' - तअं २०४.

**आजारणे** अक्रि. आजारी पडणे; नादुरुस्त होणे; तंदुरुस्ती नसणे : 'जोड्यापरी तुझ धड बनवावें, आजारसी तूं नित।' - घड्याळ कविता (विवि. १९२२ डिसें.).

**आजारी** वि. दुखणाईत; रोगी; पीडित; व्यथित. [फा. आजार]

**आजि-जी** पु. स्त्री. रण; समर; युद्ध : 'कथलें तैसेचि तुझें विजयें मज आजि दक्षातें।' - मोद्रोण ११.२४. [सं.]

**आजिबाद** क्रिवि. १. यापुढे; यानंतर. २. अगदी बिलकुल : 'इनाम सेत दिल्हे ते कोयाजीचें नावें आजीबाद रूकमालियास खर्ची पडून भोगवटा चालत आहे.'- शिचसा ५.१९.

**आजिमांय** स्त्री. आजेसासू. (गो.)

**आजिमांव** पु. आजेसासरा. (गो.)

**आजिलग** क्रिवि. मुळीच; अजिबात : 'हल्लीं आम्हीं हरजी मजकूर यांचे घरींची भुतें वोवाळून नेतों. आजिलग भुतें येऊ देणार नाहीं.'- मइसा ३.४४.

**आजी** स्त्री. आईची, बापाची आई; वृद्ध पोक्त स्त्री. [सं. आर्यिका].

**आजी** स्त्री. प्रतिष्ठा; अब्रू; आब; इज्जत : 'तेव्हा राजे म्हणाले की, पेशवियांनी व चिटनिसांनी माझी आजी फोडली आणि मला धरावयासी जपतात.' - पेद ६.५९.

**आजीआजी करणे** पहा : **अजीअजी करणे**

**आजीकारणे** क्रिवि. आजपर्यंत; आतापर्यंत; हा वेळपर्यंत; 'अन्यथा आजीकारणें अंजनवेलीचा मनसबा विलेस लावून जंजिरेयाचा पक्ष तोडिला जाता.'-पेद ३.५९.

**आजी नसणे** मुळीच, अजिबात नसणे; अगदी नसणे; पूर्णपणे अभाव.

**आजीबाई** स्त्री. सामान्यतः वृद्ध, पोक्त स्त्री.

**आजीव** वि. क्रिवि. जन्मभर; मरणापर्यंत; आयुष्यभर. [सं.]

**आजीवक** पु. १. एक धर्मपंथ. अस्तित्व सुमारे ख्रिस्तपूर्व ६वे शतक. २. भिकारी, भिक्षुक. [सं.]

**आजीव कारावास** जन्मठेप तुरुंगवासाची शिक्षा. [सं.]

**आजीवन आय विमापत्र** न. (अर्थ.) विमाधारकाच्या मृत्यूनंतर त्याच्या वारसदाराला ठरावीक काळापर्यंत दरमहा मिळणाऱ्या रकमेचे हमीपत्र.

**आजीवन विमा** पु. मृत्यूपर्यंत हप्ते भरण्याच्या पद्धतीने उतरविलेला जीवन विमा; आयुर्विमा.

**आजीव वर्षासन** न. (अर्थ.) ब्रिटनमध्ये सरकारकडून किंवा काही देशांत विमा कंपन्यांकडून खरेदी केलेल्या वर्षासनाचा, जिवंत असेपर्यंत मिळणारा ठरावीक रकमेचा हप्ता.

**आजीव वार्षिकी निधी** पु. एखाद्या व्यक्तीस तहहयात, प्रतिवर्षी द्यावयाच्या रकमेसाठी असलेला निधी. तहहयात वर्षासन निधी.

**आजीविका** स्त्री. १. व्यवसाय; धंदा; वृत्ती. २. निर्वाहाचे साधन. [सं.]

**आजीस** स्त्री. आजी. (को.)

**आजीसबब्** क्रिवि. या कारणास्तव - साठी. [फा.]

**आजुरदा, आजुरा, आजुर्दा** वि. खिन्न; दुःखी; कष्टी. [फा.]

**आजुर्दगी** स्त्री. १. पहा : **अजुरदागी-अजुर्दगी** २. असंतुष्टता; नाखुषी; नाराजी : 'हे तुकोजी होळकरास कबूल न जाहल्यास महादजी सिंद्याची आजुरदगी'- पुअभा २.११२. [फा.]

**आजूमुद्यकार** अनुभवी, प्रौढ विचाराचा.

**आजूक** अ. अजून; आणखी : 'आता तरी जेवनं झालेत आन आजूक काय आनताव !'- पाचोळा ४९.

**आजूद, आज्यूत** न. बस्ती; एनिमा; पिचकारी. (गो.)

**आजूबाजू, आजूबाजूस** क्रिवि. आसपास; भोवताली; सभोवताली; जवळपास; शेजारी. [बाजूचे द्वि.]

**आजूळ** पहा : **आजोळ.** आईच्या वडिलांचे घर.

**आजू(जो)ळ वंश** आईच्या माहेरचा वंश, कुल.

**आजेचीर-वाण** नवऱ्यामुलीच्या आजीला वरपक्षाकडून लग्नात मिळणारे मानाचे लुगडे.

**आजे दुजे न पाहणे** अक्रि. भेदभाव न करणे.

**आजेसासरा** पु. सासऱ्याचा किंवा सासूचा बाप; बायकोचा किंवा नवऱ्याचा आजा; आजेसासूचा नवरा.

**आजेसासू** स्त्री. सासऱ्याची किंवा सासूची आई; बायकोची किंवा नवऱ्याची आजी; आजेसासऱ्याची बायको.

**आजोबा**पु. १. वडिलांचे किंवा आईचे वडील. २. वृद्ध मनुष्यास आदरार्थी म्हणतात.

**आजोरा**पु. १. त्रास; कटकट; (जास्त कामाचा वगैरे). पहा : **अजोरा** २. विनाकारण लागणारा खर्च. [फा. आझुर्दा]

**आजोवळ–आजवोळ**न. आजोळ. (गो.)

**आजोश**पु. आजोबा. (चि.कु.)

**आजोळ**न. आईच्या वडलांचे, पित्याचे घर. [सं. आर्यकुल]

**आज्य** न. १. शेळीचे तूप. २. (सामान्यत:) तूप (गाय, म्हैस इ.चे) : 'आज्य मी समिधा। मंत्र मी हवि।'– ज्ञा ९.२६७.
वि. शेळीसंबंधी. [सं. अजा]

**आज्याईश**पु. स्त्री. परीक्षा; कसोटी. 'एकवेळ आम्ही स्नेह म्हटला तेथें चाल कसी पडती याचा आज्याईश नबाब साहेब यांस अद्याप नाहीं.'– मइसा १९.१०१. [फा.]

**आज्याबा** पु. आजोबा : 'मामांजीस म्हणसि, ते न म्हण आर्य आज्याबा।' मोआदि ३२.७२.

**आझाद** वि. स्वतंत्र; मोकळा; एकाकी. [फा.]

**आझादी** स्त्री. स्वातंत्र्य; स्वतंत्रता; मोकळीक : 'राजकारणाचा, देशाच्या आझादीचा प्रचंड व्यवसाय आपल्या तरुणांचीं मनें खात होता.' – किर्लो. नोव्हें. १९३९ – [फा. आझाद.]

**आझान** न. (मशिदीच्या मनोऱ्यावर उभे राहून केलेले) नमाज पढण्यासाठी बोलावणे, हाका मारणे. [फा.]

**आझुइं,आझुणी** क्रिवि. अजून; अद्यापि : 'अगा! जी हृषीकेशी आझुइं किती चाळविशी।' – शिव ७८; 'आझुई उजगरा कितीं । कराल तुम्हीं ।' –शिव १२२. [सं. अद्यापि] [फा. हनोज]

**आझोडणे** क्रि. चांगले झोडणे; ठोकणे; मारणे : 'विकारें विचारातें आझोडी।' –उगी १८२.

**आट** स्त्री. १. हट्ट; हेका : 'नाहीं चाखून कोणी पाहिलें वृथा जाट धरणे। इंद्रास पाहिल्यामुळे भगेंद्र भरणें.' –प्रला १९२. २. मिजास; अभिमान; पीळ; ताठा; दिमाख. (ना.) ३. वेढा; वळसा; पीळ : 'भीतरू भरला आटा। आदि शंखाचे या सेवटा।'– ऋ ९२. ४. अडचणीची जागा; आडवाट : 'मार्ग रोधिला देखोनी आट । मार्गस्थातें मांडिला अनर्थ।'– मुवन ७.१७२. ५. फितुरी; कट किंवा बंड : 'त्यास इतकें मागितले की गंगाबाई व त्रिबंकराव यांणी आट केला आहे. त्यास तुम्ही सामील न व्हावें'– सब ५९.

**आट** पु. संताप; त्रास; श्रम; कष्ट. [सं. आर्त]

**आट** स्त्री. १. घारगे मऊ होण्यासाठी कण्या उकडून त्यात पीठ घालून तयार करतात ती आट; शिजलेल्या तांदुळाच्या कण्या.

**आट** पु. १. आटवलेला पदार्थ : 'वेधाचा वळसा। चैतन्याचा आट भवै जैसा।'– शिव ५९५. २. आटणी. ३. (ल.) नाश; शेवट : 'विकळ देखोनि दळभार। मागधथोर केला मार। आट भविन्नला थोर। हाहाकार उठिला।।'– एरुस्व १०.४२. ४. प्रयत्न, साहस : 'वरकड उचलावयास आट कशाला करावा?'– पुरंद१.२४४.

**आट** पु. स्त्री. हातमागावर आडवी सूते दाबून बसविण्याचे उपकरण.

**आटक** न. करवंदासारखे एक फळ. हे पिकल्यावर आतबाहेर लालसर होते.

**आटक** न. नारळाचा वाळलेला गोटा; पाणी आटलेला नारळ. (गो.) [का. अट्टु]

**आटक** वि. अवघड; दुर्लभ : 'आटकु न टके तो' –ज्ञागा ३९.

**आटकमाटक** पु. १. लहान मुलांचा एक खेळ. यामध्ये सर्वांचे हात पालथे ठेवून 'आटक माटक चन्ने चाटक' असे गाणे म्हणतात व आळीपाळीने प्रत्येक हातावर बुक्की मारतात. शेवटचा शब्द ज्या हातावर येईल तो उजवला.

**आटका** पु. आठ बियांचे फळ. (व.) [सं. अष्टक]

**आटकाटी** स्त्री. आडकित्ता. (गो.)

**आटकाळ** पु. दुष्काळ, दुर्मिळता.

**आटकांड** न. ज्यातील पाणी आटत आले आहे असे डबके. (व.)

**आटकी** स्त्री. १. पहा : **अटकी** २. आठ माणसांचा समुदाय, वजन; आठ माणसांनी वाहून नेण्यासारखा पदार्थ. पहा : **आठका–की**

**आटकूल** न. १. आठ चिंचोक्यांचा समुदाय.२. पहा : **अटकी** [सं. अष्ट + कुल]

**आटके** न. १. अच्छेर; अर्धा शेर; मापटे. २.पायलीचा अर्धा भाग. पहा : **आठके.** ३. बैदुलाचा खेळ. [सं. अर्धक]

**आटखोर, आटताकाळ, आटदार, आटप–पणे, आटपता, आटपसार, आटपळ, आटपाआटप** पहा 'अ' मध्ये.

**आटगा** पु. अर्धा भाग : 'कोबाचे आटगे थोडे लोणच्याकरिता...'– आंप ७१.

**आटघन** वि. अडून बसणारा; लवकर न वळणारा. (व.)[का. अड्ड]

**आटघाट** स्त्री. १. त्रास देणे; छळणे; कुतरओढ करणे. २. श्रम; त्रास; छळ; नाश : 'देशांत होईल खट आटघाट।'–दावि २११.

**आटछाट** स्त्री. १. आग्रह; हट्ट; छांदिष्टपणा; फाजील टापटीप; बातबेत; व्यवस्थितपणा; तंतोतंतपणा; चोखंदळपणा (क्रि. करणे, धरणे, लावणे). शेलक्या शेलक्या निवडक वस्तू; मासलेवाईक (वाईट अथवा चांगले) पदार्थ.

**आटछाटीचा** वि. १. मासलेवाईक; निवडक. २. बारीक पाहणारा; चोखदंळ; बातबेताचा, शिस्तीचा; शिष्टाचाराकडे फार लक्ष देणारा.

**आटण** स्त्री. शीण; धाक; घोर : 'जिवाला आटण लागली आहे.'– फकिरा.

**आटण** पहा : **अटणी**

**आटणकळा** स्त्री. अधोगती; उतरती कळा; ऱ्हास : 'मडकीं वगैरे रोखीने मिळूं लागलीं तशी कुंभार...ह्यांच्या कामाला आटणकळा आली.'– गांगा १८३.

**आटणी, आटणूक** स्त्री. पहा : **अटणी** १. मूस : 'जन्म कर्माची आटणी।'- दास ३.१.२. नाश : 'हे महाभूतांची फुडी । आटणी देखा।।'-ज्ञा ६.२९०. ३. आटविणे : 'त्याची जंवजंव आटणी कीजे। तंव रसपाक ते शर्करादि निपजे । - रंयो ८.२८ ४. श्रम; त्रास; छळ; जाच; जाचणूक; हाल-अपेष्टा; कोंडमारा. ५. (वा.) **आटणी पडणे**- क्षीण होणे; व्यर्थ खर्ची पडणे : 'एऱ्हवीं नरदेहाहीं येवढें। धन आटणीये पडे।'- ज्ञा १८.६१६. ५. समावेश; ऐक्य : 'दोही आंगाचिया आटणी। जिये गिवसित आहाति येकपणी'- अमृ १५.

**आटणीदाटणी** स्त्री. यातायात, कष्ट.

**आटणे** अक्रि. १. (उष्णतेने) घट्ट होणे, कमी होणे (दूध, रस वगैरे). २. थंडीने थिजणे : 'चौपाहारी हिवे आटतसे। जैसे कण साखरेचे'- रुस्व ५४६. ३. (कापड) आकुंचन पावणे; आक्रसणे. ४. (ल.) विलीन होणे; एकजीव होणे; व्यापणे : 'मी चि होउनि आटले। उपासिती'- ज्ञा. ८.१२६. ५. सोने, चांदी वगैरे वितळणे. ६. ऱ्हास पावणे; नाहीसे होणे : 'सपन कोटी यादवां प्रभासे आटलीया'- लिचपू ४०२. ७. घट्ट, मजबूत होणे (व्यायामाने शरीर). ८. शुष्क होणे; वाळणे : 'जैसा सरोवरू आटे। मग प्रतिमा नाहीं'-ज्ञा ५.१५५. ९. त्रास देणे; बेजार करणे; नि:पात, पराभव करणे : 'काम क्रोध मद मत्सरुं। मज आटिती दीरु' -ज्ञागा २८१. १०. मरणे; मारणे; नष्ट होणे : 'अपराहर्णीं बहु दारुण रण झाला, फार आटलें कटक'- मोकर्ण १९.३.१०.
उक्रि. पीळ घालणे; वळणे.

**आटप** पु. उरक; (वा.) **आटप असणे**- कामाची माहिती असणे; उरक असणे.

**आटपणे** पहा : **अटपणे** 'धीर धरोनी आटप म्हणूनी बाष्पें मजसाठीं ।'- केक ४१.

**आटपशीर** वि. सुटसुटीत; बेताचा; नीट आणि झटपट;

**आटपाट** पु. स्त्री. मुलींचा एक शिवाशिवीचा खेळ. या खेळात एकीवर डाव असून तिने इतर मुलींना शिवायचे असते. या खेळात डाव घेणारी मुलगी इतर मुलींना शिवायला गेल्यावर इतर मुलींनी छापापाण्याप्रमाणे खाली बसावयाचे नसते. पाठशिवणीचा खेळ. (क्रि. घेणे, खेळणे).
स्त्री. १. (ल.) गळ घालणे; गळी पडणे; आग्रह, नेट (क्रि. धरणे). २. ठामपणा; पक्केपणा.

**आटपाटनगर** न. १. कोणतेतरी निनावी, रहदारीचे गाव. [सं. अट् = गमने व पट् + गमने(आलेगेले गाव - राजवाडे] २. आठ पेठा असलेले मोठे शहर. [सं. अष्ट = आठ + पट्ट = पेठ] ३. बाजाराचे आठ चौक असलेले शहर. [सं. अट्ट = बाजार +पट्ट = चौक, पेठ] ४. आठ मोठे राजरस्ते असलेले गाव. [सं. अष्ट + पथ = पाट]

**आटपिरड** न. धुसफुस; वैमनस्य; रुसणे; फुगणे; रागावणे. (व.)

**आटपीठ** पहा : **आटापीट**

**आटफले** न. अटपळ; पासोडीच्या दोन तुकड्यांपैकी प्रत्येकास 'अटफळ' म्हणतात : 'कोष्ट्याचे मागास आटफले येक.' - चंद्रचूड २४.

**आटफाट्** पहा : **आटपाट** (खेळ) (गो.)

**आटफाटो-फांदो** पहा : **आटफाटा** पु. अडथळा; अडचण; हरकत; विघ्न; संकट. (कु.)

**आटबाज** पहा : **अटबाज**

**आटमाटकचंपा** पु. आटकमाटक प्रमाणेच मुलांचा एक खेळ.

**आटरणे** अक्रि. आखूड होणे; आक्रसणे; आकुंचन पावणे.

**आटवणे-विणे** स. क्रि. १. (सोनारी धंदा) सोने, रूपे इ. धातूचा रस करणे; आटवण्याची क्रिया करणे. २. द्रव पदार्थ उष्णतेच्या साहाय्याने घट्ट करणे, आटतील असे करणे. ३. (ल.) कमी करणे; ठार मारणे : 'द्रौणिपराभवकाळी म्यां कौरव सैन्य फार आटविलें ।'- मोकर्ण ४०.३४.

**आट (ठ) वल-ली-ले** पु. न. स्त्री. तांदूळ किंवा तांदळाच्या कण्या; यात पाणी अधिक ठेवून त्यांचा पातळसर भात करतात तो; कण्हेरी; पेज (कों.): 'श्री महालक्ष्मिदेविसि प्रात:कालिं आटवलिएच्या उपहारासि दिधलें' -बांदिवड्याचा शिलालेख. (शके १३३५) [का. अट्टु]

**आटवली** स्त्री. साकड गुंफा; एक खणाची खोली; नदीच्या काठावर बांधलेली गुंफा : 'सावळदेवा दक्षिणे आटवली : तेथ गोसावीयांसि...अवस्थान जाले'-लीचपू ४२२.

**आटवळसा** पु. गिरकी, भोवरी : विवेक भवंडी आटवळसा' मूप्र-१००७.

**आटवा** पु. दगदग; त्रास. (ना.) [सं.आर्त]

**आटवाळ** पु. स्त्री. न. तांदळाची कण्हेरी. (व.)

**आटविणे** क्रि. त्रासविणे; रडकुंडीस आणणे. (ना.)

**आटवी** स्त्री. १. एक मादक वनस्पती; हिला पांढरी फळे येतात. २. अरण्य.

**आटंक-ग** वि. भयंकर; विस्तीर्ण; मोठे : 'प्रधानादिक सभानायक। तिहीं घोर घातला धाक। रावणा लागली धुकधुक । आरिष्ट आटंक देखोनी ।'- भाराबाल ७.१०.

**आटंसाटं** न. साटेलोटे : आपआपसात.

**आटा** पु. १. (यंत्र.) स्क्रूचा फेरा, दोरा, कंगोरा; पेच. २. वाटोळे कडे, वेढे (तबला, पीप व जुन्या काळ्या तोंड्याच्या बंदुकीच्या नळीस बळकटी येण्यासाठी बसविलेले). ३. लहान मुलांचे खेळण्याचे लोखंडी कडे, जे मुले रस्त्याने पळवीत नेतात ते. ४. एखादा पदार्थ आवळून बांधण्यासाठी द्यावयाचा दोऱ्याचा वेढा; विळखा; वळसा. (क्रि. भरणे, बसणे). (सामान्यत:) पीळ. ५. छत्री, इरले यांचा सांगडा(कों. राजा.) [सं. अट] (वा.) **आटा ढिला होणे** - अर्धवट वेडा होणे; डोके फिरणे : 'एवढ्याशा गोष्टीनं चिडतोस किती? आटा ढिला झाला आहे का तुझा?' - एल्गार १०६. **आटा सटकणे-** डोके ठिकाणावर नसणे : 'मी समजलोच, याचा आटा सटकलाय त्या पोरीपाई.' - वासूनाका ११९.

**आटा** पु. धान्याचे पीठ : 'आमचाच आटा बंद जाला'-भाब १३०. [हिं.]

**आटा** पु. गाडीच्या दोन धुऱ्यामधील तिसरे लाकूड; टेकण. (को.)

**आटा** पु. खेळ; नाटक (सन १८४१ मध्ये प्रथम कानडी नाटकमंडळ्या

सांगली-मिरजेकडे आल्या, तेव्हा हा शब्द मराठीत आला).[का.]

**आटाआट-टी** स्त्री. १. खटपट; श्रम; दगदग; अटअट; अटाअट. पहा : **अटाट-टी** २. धुमाकूळ; घोटाळा; नाश; गडबड; मारपीट : 'यादवाचेआं काटकांभीतरी। पारकां आटाआटी केली थोरी ।' - शिव ९८८.

वि. निकराने : 'भांबावले जन धांवे आटाआटी ।' जना (नाम).

**आटाघाट** पहा : **अटाघाट**

**आटाट-आटाटी** स्त्री. १. श्रम; यातायात. पहा : **अटाट**: 'निवासस्थानाची आटाटी। सर्वथा पोटी न धरावी ।' -एभा ७.४० २. पराक्रम, चातुर्य; 'आटाट करी थोर : पारकया दळामध्ये' - मूप्र १००८.

**आटाटूट** वि. अतिशय; फार. (माळवी) [हिं.]

**आटाणू** वि. ढाल, तरवार बाळगणारा शिपाई. [सं. अड्डुन]

**आटाप** पु. व्याप; पसारा. (गो.)

**आटापाणी** न. १. पीठ व पाणी; शेर; दररोजची शिधासामग्री. २. जीविताचे साधन; अन्नाची बेगमी. (वा.) **आटापाणी बंद करणे** - तगादेदाराने कुळाच्या दारात बसून कुळाचे जेवणखाण बंद करणे.

**आटापिटा-टी, आटापेट** अतिशय परिश्रम; दगदग : 'आपला हा आटापीटा व्यर्थ आहे हे तिला कळत होते.'- रथ १५९. (वा.) **आटापीट करणे**- आटोकाट प्रयत्न करणे: 'दिलीपाने जीवाची आटापीट करणे म्हणजे ...' -विजी ३०. **आटापिटा करणे** - खूप परिश्रम करणे: 'कार्यक्रम सर्वांपर्यंत पोचावा म्हणून आटापिटा केला जातो.'-लोवि ७३. **आटापिटा पाडणे**- मेटाकुटीस आणणे.

**आटाफंड** पु. (धान्याचा, पिठाचा) मुष्टिफंड; मूठमूठ धान्य जमवून उभारलेला निधी, पैसा : 'पंजाबांत आर्य समाजाचे मिशनरी आटाफंडहि.... गोळा करतात.'- लोटिकेले ४.५११.

**आटारा** पु.आटापिटा; श्रम; आटा. पहा : **अटारा** (गो.)

**आटारेटा** पु. जोरदार प्रयत्न : 'खलाशांचा आटारेटा चाललेला होता.'- माजी १३३.

**आटारोटा** पहा : **अटारेटा-रोटा**

**आटाला** पु. १. माचवा; माळा; गच्ची. २. घर संसार; खटला; व्याप : 'नानासाहेबांचा आटाला दांडगा होता.'-फगो ७२.

**आटाले-ळे** न. गुरांना पाणी पाजण्यासाठी वापरले जाणारे एक विशिष्ट आकाराचे लाकडी भांडे. (कों.)

**आटालेदार** वि. मोठे खटले असलेला; कुटुंबवत्सल व व्याप असणारा : 'पाटील मोठा आटालेदार होता.'- भेटी ९४.

**आटास** अट्टाहास : 'हाक फुटली आटासे'- उषा १४१९

**आटासाटा** पु. साटेलोटे: 'ब्राह्मण जातीनें आटासाटा न करावा.'- पेम ४०२. [साटाचे द्वि.]

**आटाळ** पु. अडथळा. पहा : **अडल**

**आटाळ-ळा-ळी-ळे** पु. स्त्री. न. मनोरा; माळा; गच्ची. पहा : **अटाळा-ळी-ळे**: 'मोडिल्या गोपुर आटाळी।'- मुवन ३.५.

**आटाळ** पु. लटांबर; सामानसुमान; खटले; बाडबिस्तारा; अवजड सामान: 'हत्ती, घोडीं, माणसें आदि करून सारा आटाळा विट्या पावेतों सुखरूप गेला.'- ऐलेसं ८३६.

**आटिवेठी** स्त्री. १. श्रम; कष्ट. २. (ल.) येरझारा. पहा : **अठिवेठी** : 'ते अभ्र आल्यागेल्यापाठीं । सूर्यासि न पडे आटिवेठी ।'- एभा २८.१३७. [आटीचे द्वि.]

**आटी** स्त्री. १. श्रम; यत्न; खटपट. (क्रि. काढणे): 'तयातें इंद्रियबैलांची पेटी । न म्हणे अवसीं पाहाटीं । विषयक्षेत्रीं आटी। काढी भली ।'- ज्ञा १३.२९; 'चिंतिलें पावलीं जया कृष्णभेटी । एरवीं ते आटी वायांवीण ।'-तुगा ९८. २. मिठी. पहा : **अढी** : 'प्रियोत्तमाचिया कंठीं । प्रमदा घे आटी ।'- ज्ञा १३.७८५. ३. गोण वगैरे एकावर एक ठेवून केलेली उभी रांग; अढी.(गो.) (वा.) **आटी काढणे**-कष्ट करणे: 'विषयक्षेत्रीं आटी। काढी भली ।'- ज्ञा १२.२९. ४. झोंबी : 'जाली दोघांसी आटी'- गरा २९.

**आटीक** स्त्री. न. एक झाड व त्याचे फळ.

**आटीचा रुपया** पु. आटविण्यास योग्य असे, खराब झालेले रुपये: 'बापूजी नाईक भिडे यांनी दिकत लिहिली आहे की रुपये आटीचे येतील त्यास बटा पडणार तर तेथील सावकाराची तुम्ही अटीच्या रुपयास बटा पडेल तो समजोन घेणे.'- शिंइसा १०.

**आटीचे रेशीम** न. (चर्मकार व्यवसाय) जोड्यास भरतात ते एक प्रकारचे रेशीम. (रेशमाची लड)

**आटीव** वि. १. पीळदार : 'जो आटीव जेठिया ऐसा'- मुसभा ६.१५३. २. आटवलेला (काढा, दूध इ.).

**आटु-टू** पु. १. लय; आटणी; नाश: 'तंव शब्दाचा दिवो मावळला। मग तयाहि वरी आटु भविन्नला।'- ज्ञा ६.३१४. २. प्रतिशब्द; पडसाद.

**आटु** वि. १. कष्टपूर्ण; वेदनायुक्त: 'आटु भवंडिला सिहा रिसाचा। एक पाडू या फिलिस्तेवाचा ।' - क्रिपु १-२४.२५.[सं. आर्त]. (वा.) **आटु घालणे**- पीळ देणे : 'म्हणोनि मीशिया आटु घाली ।'- लीचउ २३२.

**आटुक** पहा : **आटकूल**

**आटुवा** पु. भुजा; पंख : 'आट्वे दाटौनि उडाला। तो विहंगमु।'- उह ९१७.

**आटुळणे** क्रि. १. आकुंचित होणे, आक्रसणे, २. हटून बसणे. (व.)

**आटू** वि. हट्टी; कुढणारा. पहा : **आटु** (व.)

**आटू** वि. १. कोरडे. २. दुर्बोध : 'बोली बोलूं नेणे आटू । छळणोक्तीं नव्हे शठू ।'- एभा १०.२२७.

**आटून असणे** क्रि. सिद्ध किंवा तयार असणे; सज्ज असणे : 'त्यानंतर दुसरे दिवशीही शिंद्यांनी शिकारीची ताकीद आपले गोटांत केली व ४ घटका रात्रीस शिकारीस निघावें हा बेत जाहला ! तो संदेश पडोन कारभारी (नाना फडणवीस) आटून होते.'- ऐलेसं ५२७१.

**आटूस** वि. नीटस; आटोपशीर; बांधेसूद : 'त्या गौरवर्णी, आटूस बांध्याच्या सुंदर पोरीवर कोण भाळणार नाही !'- तअं ४०१.

**आटूळ** स्त्री. पहा : **अठली** १. फणसाच्या गऱ्यातील बी. २. (ल.) लहान मुलाची आंडकुली.

**आटेजणे** क्रि आटणे; आळणे.

**आटेदार** वि. पीळदार; कंगोरे असलेला : 'पात बसविण्यासाठी लोखंडाची

आटेदार मूठ आहे.'– वानगी ८०.

**आटेविटे–आठेविठे** पु. अव. १. आळेपिळे; आळोखेपिळोखे. २. आढेवेढे. ३. उबग. (ग्रा.) [का. अड्डा]

**आटोका** पु. बुद्धीची, शक्तीची किंवा सामर्थ्याची मजल; आकलनशक्ती; आवाका; पोच; अवसान; योग्यता.

**आटोकाट** वि. अचाट; अमर्याद. 'आटोकाट ज्ञान व अपूर्व रचनाचातुर्य हीं लक्षांत घेऊन मन अगदीं थक्क होऊन जातें.'– नि ५७६. [सं. आ+कंठ]

**आटोकाट कुमैत** वि. अनावर अशी कुमाईत घोडी. जहांबाज, हट्टी स्त्रीला दिलेले विशेषण.

**आटोप** पु. १. सामर्थ्य; आवेश; उत्साह: 'सूर्य उदयपर्यंत कोपें। प्राची जिंतिली आटोपें।'– मुआदि २१.१२. २. पसारा; व्याप: 'व्यापेंविण आटोप केला।'– दास १९.८.१५. ३. संघटना; सुयंत्रणा: व्यवस्था: 'गेले बहुत आटोपाचे। कार्यकर्ते।'– दास ३.९.५१. ४. बंदोबस्त; नियंत्रण; निर्बंधन; संरक्षण. ५. अभिमान; गर्व; ताठा; डौल: 'आपलेनीचि आटोपें। धनित्वाचेनि दर्पें ।' – ज्ञा १७.२५. ६. जोर; अतिक्रम; क्षोभ : 'ज्वराचेनि आटोपे। रोगी भलतैसें जल्पे।'– ज्ञा १६.३६४. ७. आवर; उरक; आवरशक्ती : 'एवढा कारभार झेंपावयास त्याचे अंगीं आटोप नाहीं.' ८. स्वाधीनता; ताबा : 'प्रकृतीचेनि आटोपें। वर्ततु असे ।।'– ज्ञा ३.१८४. ९. संधान; १०. पकड. ११. पहा : **अटप** 'विश्व त्वां आटोपें वश केले' – नाम १३८८. [सं.]

**आटोप** पु. (आयु.) पोटात गुडगुड आवाज होणे. [सं.]

**आटोपणे** क्रि. १. लहान करणे. २. आवरणे; मागे घेणे; गुंडाळणे; संपवणे; नाहीसे करणे: 'प्रभुवर तें विश्वरूप आटोपी।'– मोउद्योग २०.२०. ३. (पुढे गेलेल्यास मागच्याने) गाठणे: 'आटोपिलाचि गेला होता जरि भीमसेन दूरवर।'– मोऐषिक २.३. ४. आटोपणे; ताब्यात घेणे; व्यापणे : 'जै देहीं आटोपे पित्त।'– ज्ञा १४.१९६. ५. उरकणे; संभाळणे : 'आटोपसील संसारू।' – दावि २२. ६. (ल.) मृत्यू पावणे.

**आटोपता घेणे** आवरता घेणे; संपविणे : 'शेवटी गोंधळ इतका वाढला की, कार्यक्रम आटोपता घेणेच.. भाग पडले.'– रोपा २४.

**आटोपशुद्ध** वि. नीटनेटके; नेमस्त; आटोपसर.

**आटोपसर, आटोपसार** वि. फार व्याप नसलेला: 'आमच्यात हुन्नरी लोक प्रचंड कारखानदार नसून घरच्याघरी आटोपसर धंदा करणारे झाले आहेत.'– गांगा १३९. [सं. अष्टौप्रहर]

**आटोपार** क्रिवि. रात्रंदिवस. (तंजा.) [सं. अष्टौप्रहर]

**आटोपी** वि. ज्याला पसारा आवरता येतो असा; व्यवस्थित; नीटनेटका.

**आटोळा** पहा : **अटवळा, अटाळा**: 'राखणीला आटोळ्यावर उभ्या राहिलेल्या गड्यांचे आवाज कानांवर पडू लागले.'– मिरास २५४.

**आटोळा** पु. (नाविक) वल्हे अडकविण्यासाठी नावेवर असलेला खुंटा. हा पेरजेस पाडलेल्या भोकात बसवलेला असतो. २. ओटा. [का. अड्ड]

**आट्टखुरी** वि. गाभण (मेंढी वगैरे); आठखुरी. तिचे चार व कोकरांचे चार खूर धरून आठ खुरांची. [सं. अष्टखुर]

**आट्टाला** पु. पसारा : 'त्या मळयाचा सारा आट्टाला कसा सांभाळायचा?'– रैत ८.

**आट्यापाट्या** स्त्री. एक महाराष्ट्रीय खेळ. एकाने दुसऱ्यास ठरावीक जागेत, पाटीत–अडवायचे व दुसऱ्याने त्याला हुलकावणी देऊन निसटून जायचे अशी या खेळाची ठोकळ रूपरेषा आहे.

**आठ** वि. १. आठ ही संख्या. सातनंतर व नऊपूर्वी येणारी संख्या. २. (ल.) अष्टसिद्धी : 'शिणल्या बहुत चौसष्टी। आठ जणी बहुत कष्टी।'– हरि ३.४. [सं. अष्ट]

**आठ** पु. १. आटापिटा; पीडा; उपद्रव. २. जुलूम; छळ : 'या तर्फेचें मुलुखांत वरातदार पाठवून रयतेचा आठ करूं लागले तरी वरातदार हाती धरून बाहेर घालणे.'– पेद २.४९.

**आठआणी** स्त्री. अर्ध्या रुपयाचे, पन्नास पैशाचे नाणे; जुने आठ आण्यांचे नाणे किंवा अधेली.

**आठई** वि. अधिकारी; आरूढ : 'नानाचा काळ जाहला तो. राव, प्रधानपदास आठई झाले.'– हिंद १.१४.

**आठक** वि. दुर्गम: 'ब्रह्मादिकां आठकु तो'– ज्ञागा ३२.

**आठका** वि. आठ संख्या किंवा तिने युक्त; आठांनी मिळून झालेला; आठांनी बनवलेला किंवा आठजण लागतील असा; आठ जणांना योग्य असे. पु. आठ मणांचे माप (खंडी) सुमारे ४० किलोचे माप. (ना.) [सं. अष्टक]

**आठकी** स्त्री. १. पहा : **आठका** २. आठ बैलांमागे जकातदाराने दिलेली एका बैलाच्या जकातीची सूट. ३. सागरगोट्यांच्या खेळातील एक टप्पा. आठ खडे एकाच वेळी गोळा करून उचलून वर उडवलेला नववा खडा झेलणे. ४. आठ माणसांची टोळी; आठांचा समुदाय. [सं. अष्टक]

**आठकी सोलंकी** स्त्री. आठ, आठ किंवा सोळा, सोळा मजुरांनी ओझी वाहणे: 'कुरणांत दोनशे पसतीस कामाठे पाठविले आहेत. त्यामुळे आठक्या सोलंक्या चालत होत्या त्या राहिल्या.'– पेद १८.१०१. [सं. अष्ट–षोहशन्]

**आठके** न. १. पहा : **अटके** २. सुमारे पाचशे ग्रॅम्सचे माप.[सं. अर्धक]

**आठके** वि. आठवे. (गो.)

**आठखणे–ओठखणे** क्रि. अटकून (भिंतीस वगैरे) बसणे; टेकून बसणे. पहा : **ओठंगणे** (गो.)

**आठघात** पु. आठव्या महिन्यात जन्मलेले मूल जगत नाही, या अर्थाने वापरला जाणारा एक शब्द.

**आठतीस** वि. अडतीस. (गो.)

**आठनहाण–न्हाण** न. लग्नानंतर आठव्या दिवशी वधूवरांस स्नान घालण्याचा एक सोहळा. [सं. अष्ट+स्नान]

**आठमुठी** अ. अडमुठी; सहज; अनायासे.

**आठयो** पु. तांब्याचे जुने नाणे. (गो.)

**आठरणे** १. पहा : **अटरणे,** अवटरणे २. वातड होणे: 'पाणी घालावे लागले तर ते कढतच घालावे. थंड घातल्यास पदार्थ आठरतो.'– पाकसिद्धी ७१.

**आठरा आणे अबरू** स्त्री. मोठी कीर्ती : 'विलायतेंत आठरा आणे अबरू आमच्या प्रभुची असे'– होला १८५. सोळा आण्यांचा रुपया म्हणून सोळा आणे म्हणजे परिपूर्ण परंतु अठरा आणे म्हणजे त्याहीपेक्षा अधिक, अत्युत्तम.उदा. अठरा आणे पीक.

**आठरा नारू–अलुतेदार** पु. अव. तेली, तांबोळी, सनगर, शिंपी, माळी, गोंधळी, डोरी, साळी, जंगम, भाट, ठाकर, गोसावी, मुलाणा, वाजंत्री, घडशी, कलावंत, तराळ किंवा कोरबू, भोई इ. पहा : **अलुता–त्या**

**आठली–ळी** स्त्री. फणसाची बी : 'दुपारी जेवतेवेळी रसाळ नि फणसाच्या मीठ घालून उकडलेल्या आठल्या.'– सोबत ६०.

**आठव** स्मरण, आठवण (क्रि. करणे, देणे) : 'अपराध नसे केला, स्मरण नसे काय ? मन न आठव दे.'– मोउद्योग ९.४३.

**आठवगाठ** स्त्री. आठवणीसाठी धोतर, लुगडे, उपरणे इ. ना मारलेली गाठ.

**आठवगिरी** स्त्री. आठवण; मनन.

**आठवडकरी** पु. आठ दिवसांनी, आठवड्याच्या आठवड्याला व्याज मागणारा, पिळून काढणारा सावकार.

**आठवडा** पु. आठ दिवसांचा काळ. रविवार ते रविवार दोन्ही दिवस धरून आठ दिवसाचा कालावधी.

**आठवडी** वि. आठव्या दिवशी भरणारा (बाजार.); आठ दिवसांचा (पगार): 'आज त्याचा आठवडी पगार होता.'– बाविबु ५.

**आठवडेकरी** पु. पहा : **आठवडकरी** १. दर आठवड्यास येणारा न्हावी, परीट, वारकरी, भिक्षेकरी इ. २. दर आठवड्यास ताप येणारा, वरचेवर आजारी पडणारा मनुष्य.

**आठवडे पा (वा.)ईक**–वि. आठवड्याच्या मुदतीचा, थोडा दिवस चालणारा, किंवा टिकणारा.

**आठवड्या** वि. १. आठ दिवसांनी तापाने आजारी पडणारा, कधी बरा–कधी आजारी.२. आठ दिवस दूध देऊन नंतर ते देण्याचे बंद करणारी (गाय,म्हैस).

**आठवण** स्त्री. एकदा घडलेली घटना किंवा सांगिलेली गोष्ट तशीच्या तशी मनात येणे, उमटणे. स्मरण, याद, आठव, स्मृती, धारणशक्ती. २. आठवणीकरिता ठेवलेली वस्तू; यादगिरी.[सं. आ+स्थापन] (वा.) **आठवणींचा खंदक**– अतिशय विसराळू.

**आठवणीचा धड, आटोकाट, बहादुर, खबरदार** वि. चांगल्या आठवणीचा; स्मरण शक्ती उत्तम असणारा.

**आठवणूक** स्त्री. ज्याच्या योगाने एखाद्याची आठवण होते ती वस्तू. पहा : **आठवणे**

**आठवणे** उक्रि. आठवण करणे, होणे; स्मरणात, लक्षात, ध्यानात, मनात येणे: 'बाळपणींचा काळ सुखाचा आठवतो घडिघडि मला गे।'– शारदा २२.

**आठवर** अष्टवर्षा; लग्नाजोगती.

**आठवल, आठवली** न. १. मेथी, तांदूळ वगैरे घालून केलेली खीर. (गो.) २. भाताची कण्हेरी.

**आठवळा** पहा : **आठोळा**

**आठवा** वि. क्रमाने मोजताना सातव्यानंतर येणारा अंक.

**आठवी** स्त्री. अष्टमी; विशेषत: आश्विन वद्य अष्टमी.

**आठवे** न. अर्ध्या शेराचे माप.

**आठळी** स्त्री. फळातील बी. [सं. अष्टि]

**आठसटी** वि. एकशेआठः 'गुरूचां चरणांगुष्ठाग्री आठसटी तीर्थे'– विद १४.

**आठाइत** वि. सर्वांगानी युक्त किंवा परिपूर्ण : 'रूपश्री होए आंगें आठाइति'– मूप्र १६७२.

**आठावेठी** स्त्री. बिगारी : 'जैसें हे आठावेठीचे पाइक' – लीचपू ५५.

**आठाळे**– पहा : **अटाली, अटाळी** : 'आठाळेया वरी उभे ठाकावें ।'– उषा १११८.

**आठांग** पहा : **अष्टांग** : 'आठांगाचा हुडा झुंझते दिसे।'– भाए ४५८.

**आठांगुळे** पहा : **अठांगळे**: 'मग जीवांचेनि मेळें। निकरलेंपणाचें आठांगुळें केलें।'–शिव ९०.

**आठिव** वि आठ थर असलेले (मधमाशांचे पोळे.) [सं. अष्ट]

**आठिळा** स्त्री. अठळी. पहा : **अटोळी** (को.) [सं. अष्टि]

**आठी** स्त्री. राग, नापसंती इ. कारणांनी कपाळावर पडणारी सुरकुती.

**आठी** स्त्री. १. अठळी; कोय : 'सकळ फळें फळल्या पाठीं। आम्रवृक्ष फळे शेवटीं। रसस्वादाचिया खोटी। पोटींची आंठी सांडिलिया।।'– एरुस्व १६.१४७. २. गाठ. [सं. अष्ठिल]

**आठी** क्रिवि. येथे, याठिकाणी. (खा.) [सं. अत्र]

**आठी** स्त्री. मिठी: 'मग सुखेंसी घे आठी। गाढेपणें ।'– ज्ञा ५.१३२.

**आठी** स्त्री. कोडे. कूट : 'आगमाची आठी, निगमाचा भेद.' – चोखा ४७.

**आठुरणा** पु. एक काटेरी फळझाड: 'तोरणा आठुरणांच्या टोपल्या घेऊन... कातकरणी हिंडू लागल्या.'–आआशे ३३.

**आठूरणे, आठोरणे** अक्रि. १. (अंगाचे कातडे किंवा अवयव) ओढून घेतले जाणे; ताठरणे. (को.) २. बांधणे; आवळणे. ३. (विप्र.) संकोचणे; आक्रसणे; आखडणे : 'उत्कट आनंदाच्या क्षणांकडे ती आठुरलेल्या नजरेने पहात होती.'– वेज ७. [का. अट्टु]

**आठुवरपण** न. निबरटपणा : 'नुजवेचि कव्हणे बोलें। आंगां आठुवरपण आलें।'– शिव २०८.

**आठुवा** पु. भुज; बाहू : 'समट संध्या रागाचे आंग। आठुवाचें जोडें हिरेलग। सर्वांगीं सैंभ श्लोकांचे बानलग। देवाचिये मुद्रे आंतुल।।'– नरुस्व १६५.

**आठुवे** न. हृदय.

**आठुळणे** क्रि. बांधणे. पहा : **आठुरणे** २: 'तो उध्वीं आठुळैजे कंदु।'– ज्ञा १५.८८.

**आठे, आठोपहार, आठोफळी, आठ्ठी 'अ' मध्ये पहा.**

**आठेविठे** पहा : **अढेवेढे** (गो.)

**आठो** स्त्री. अष्टमी तिथी. (व.)

**आठोक** वि. रोख ठोक : 'उपहार केला आठोक बोलणें।' – दावि १०१.

**आठोडिया** वि. आठवड्याचा : 'पर्वकाळिं धर्म त्या न कवडी केला रे आठोडिया।'– देप ५८.

**आठोळा** वि. आठवा. (गो.)

**आठोळी** स्त्री. कोय; आठली; बी.

**आठोळी** स्त्री. आठव्या महिन्यात बाळंत झालेली स्त्री.

**आठोळीपांगळी** स्त्री. जमिनीवर विशिष्ट आकाराची घरे पाडून त्यात आंब्याची कोय ठेवून ती एका पायाने लंगडत ठेच मारून बाहेर काढण्याचा एक खेळ; ठिकरी. (व.)

**आठॉळॉ** क्रि. आठव्या महिन्यात प्रसूत होऊन झालेले मूल. (गो.)

**आड** पु. १. वाटोळी, पायऱ्या नसलेली व लहान तोंडाची विहीर; कुवा; कूप : 'असतां आयु, न हो कां क्षम पळ जलधीस आड वाराया।'– मोभीष्भ ७.४९. (वा.) **आडात घालून दोर कापणे –** विश्वासघात करणे : 'सकळांसी आडामध्यें घालून। दोर कापून गेलासी।'– हरि १७.१५१. **अर्ध्या आडात सोडणे –** संकटात सोडून निघून जाणे.

**आड** स्त्री. डोंगर उतारावरची खडकाळ जमीन किंवा शेतजमीन भाजण्यासाठी एकत्र केलेल्या झाडाझुडुपांच्या फांद्या; काटेकुटे व गवत यांनी वेढलेले रान : 'अन्तू खोताच्या राखलेल्या आडीत नाऱ्यागोऱ्यानं बैल घातले.'– अउआ ६.

**आड** न. घराचे आढे. (ना.)
स्त्री. १. दोन डोंगरांच्यामध्ये पाण्याजवळ असलेली वस्तीस योग्य अशी जागा; धळ; दरी. (राजा.) विरोध; अडथळा; अटकाव; अडचण. ३. हट्ट; हेका; आग्रह या सर्व अर्थी पहा : **अड** : 'धरिली भाऊंनीं आड।'– ऐपो १२६. [का. अड्ड]

**आड** अ. १. हा शब्द उपपदाप्रमाणे कित्येक शब्दांना जोडून येतो. याची सविस्तर माहिती अडमध्ये दिलेली आहे. या शब्दाचे अर्थ – (अ)एकीकडे; एका बाजूस; दूर; मार्गाच्या बाहेर; रीती वेगळा, सांधीकोंदीत .उदा. आडमार्ग; आडबाजू. (आ) मधून; वरून; उलट; विरुद्ध; मार्गात (प्रतिबंधरूपाने). उदा. आडदंड या उपपदातील आणि अड उपपदातील अर्थभेद अड मध्ये पहा. २. एखाद्या पदार्थाच्या मागे; पलीकडे; पाठीमागे; पुढे, मागे न दिसेल असा; एका बाजूला : 'जे नित्य मायापाट आड लावी.' – सारुह १.५. ३. (दृष्टिरोध करण्याकरिता, प्रवेश प्रतिबंधाकरिता, आश्रय देण्याकरिता; संरक्षण करण्याकरिता) मध्ये येणारा; मार्गात असणारा; मध्यंतरी; मागे : 'आतां आड उभा राहे नारायणा। दयासिंधुपणा साच करीं।।' –तुगा १५६८. ४. एखाद्याच्या छत्राखाली, आश्रयाखाली. उदा. शेताआड चोरी (आपल्याला स्वत:चे शेत आहे तेव्हा दुसऱ्याचे चोरले असा आरोप येणार नाही). ५. द्विरुक्तीने आलेल्या शब्दात आड शब्द आल्यास त्याचा अर्थ प्रत्येक दुसरा; एक टाकून एक असा होतो. उदा. एकाआड एक. ६. (समासात) विवक्षित कालाव्यतिरिक्त. उदा. आडवार; आडसाल; आडदिवस = ठरावीक दिवसांपेक्षा इतर दिवशी. समासात आड याचा अर्थ केव्हा केव्हा अकस्मात असा होतो. (वा.) **आड घालणे** – १. मध्ये आणणे; रक्षण करण्यासाठी काही मध्यंतरी ठेवणे : 'तंव आड घातलें आणीकी वीरी'–उषा ६१६. २. उडी घालणे : 'कोणी आड घाली काय अथावीं।' –ज्ञा ८.२४०. ३.आडकाठी घालणे; अट घालणे : 'किल्ला हवाला करणे तरी राहेन म्हणून गणेश संभाजीने आड घातला. या करितां झाशी किल्ला हवाला केला.' – पेद २९.२२. **आड घालवणे** – आड येणे; अडथळा आणणे; हरकत घेणे : 'कार्यावर बक्षीस दिल्ह्याने दुसरियाच्याने आड घालवत नाही.' – आज्ञा ७६. **आड जाणे** – १. आडरस्त्यास, आडमार्गास लागणे; रस्ता चुकून भलतीकडे जाणे. २. जवळून जाणे : 'जया आड जातां पार्था । तपश्चर्या मनोरथा । पाखंडियाहि आस्था । समूळ होय ।' –ज्ञा ६.१६७. **आड धरणे** – धारण करणे: 'आड धरुनि गोपुवेषु। वत्से राखे' –ज्ञा २३४. **आड पडणे** – १. नमस्कार करणे; विनवणी करणे. २. अडविणे : 'तिये कडोन येतसे वारा। देखोनि धांवे सामोरा । आड पडे म्हणे धरा । बीजे कीजो ।' –ज्ञा १३.३७६. ३. मुरकुंडी वळणे : 'गोपाळ हांसां आडपडतु ।' – वछा २१७. **आड पडप–** वामकुक्षीकरिता आडवे होणे. **आड लावून घेणे –** ओवळ्या लुगड्यानंतर व सोवळे नेसण्यापूर्वी मध्यंतरी लावून घेण्याचे वस्त्र; न्हाताना, आंघोळ करताना लावून घेण्याचे जुनेर; नेसू (गो.): 'नव्हे सपातळ आड लावणें ।' –ज्ञा ६.११४. **आड रिगणे –** १. आश्रय करणे. २. विरोध करणे : 'उग्रसेनु आड रिगाला' –श्रीकृष्णच २.

**आडआरी** स्त्री. (चर्म.) कातड्यास भोक पाडण्याचे मध्यम हत्यार. पहा: **अरी**

**आडई** विश्रांतीसाठी आडवे होणे. (क्रि. घेणे) (कों.)

**आडऊ** पु. चाराचुरा; डबर; गाळ : 'आडऊ निघाला जो अपारू।' –ज्ञा १८.३६.

**आडऊड** क्रिवि. १. एखाद्या वस्तूच्या मागे (लपून, दडून); छत्राखाली. २. सांधीकोंदीत; आडबाजूस; आसपास. [आडचे द्वि.]

**आडक** पु. त्रास; प्रतिबंध : 'अपमानाचिये आडके । देखोनि न फडके भयभीतू ।' –एभा ११.४६४.

**आडकडा** पु. १. कड्याचा मध्यभाग; अर्धा कडा; दुर्गम कडा : 'तपोदुर्गाचा आडकडा ।' –ज्ञा ६.४७६. २. अडथळा. ३.बाजूला; कडेला; जलाशयाचा उथळ काठ, कडा : 'वरिल सिखरे गघनकार । झाडें लागलीं आडकडां ।।'– क्रिपु १७.१०.

**आडकण** पहा : **अडकण**

**आडकणीदार** वि. पातळाचा एक प्रकार : 'पातळें सेलारी, १. पंचरंगी आडकणीदार' – पेद २९.२२.

**आडकाठी** स्त्री. १. अडथळा; अटक; प्रतिबंध; हरकत; प्रत्यवाय (क्रि. घालणे) : 'परीणामी त्वां लाविली आम्हां आडकाठी । हें सांग काय म्हणउनीया नये सदनाशीं ।।' – होला १२३. २. दाब; बंधन; ताबा; वचक. (क्रि करणे, देणे).

**आडकाम** न. किरकोळ काम; बारीकसारीक काम. मुख्य कामात निघालेले किरकोळ काम; अडपझडप काम.

**आडकाम्या** वि. किरकोळ कामास उपयोगी पडणारा; बारीकसारीक कामे करणारा.

**आडकाष्टा** पु. १. कासोटा न सोडता थोडा बाजूस खोवणे. २. अपुरा

कासोटा किंवा काष्टा.

**आडकी सुडकी** स्त्री. (शब्दश: अर्थ -अर्धे पटकूर लावणारी) एखादी क्षुद्र स्त्री : 'बसलास झाडावर एक आडकीसुडकी । न धरी मायेची द्वाही ।।' -होला ५३.

**आडकुचा** पु. आडोसा. (व.).

**आडकुडता-चा** पु. हाताचा केलेला आडवा चुळका; कुडता (पाणी पिण्यासाठी तोंडाजवळ आडवा हात धरतात तो).

**आडकुडते** न. लहान कुडते : पहा **कुडते**

**आडकुशीस, आडकुशी** क्रिवि. सरळ मार्गापासून दूर; आजूबाजूस; एकीकडे; अडगळीच्या जागी.

**आडकूट-ड** न. १. आडोशासाठी घातलेली भिंत, पडदा, कुंपण. २. अडखूळ; प्रतिबंध; अडथळा (क्रि करणे, लावणे, घालणे, लागणे, पडणे, येणे).

**आडकूस** स्त्री. आडबाजू.
वि. क्रिवि. आडकूशीचा. पहा : **आडकुशीस**

**आडके** न. आडगल्ली; पोटआळी : 'या पोटआळीला महारगडी 'आडके' ही म्हणत.' - तअं २५.

**आडकोठा** क्रिवि. कोपऱ्यात; एकाबाजूस; एकीकडे.
पु. १. कोपऱ्यात असलेली गल्ली; अरुंद गल्ली. २. बिनवहिवाटीची जागा.

**आडकोपरा** पु. बाजूचा कोपरा; अडगळ.

**आडखप्या** वि. १. अंगमेहनतीने कामे करून पोट भरणारा (मुलगा, पोऱ्या) २. किरकोळ काम करणारा (नोकर), आडकाम्या; बगल्या; दुसऱ्याच्या हाताखाली काम करणारा.

**आडखर्च** पु. संसाराला नित्य लागणाऱ्या अन्नवस्त्रादी मुख्य खर्चाखेरीज अन्य किरकोळ खर्च.

**आडखळ, आडखळा** पु. १. अडथळा, व्यत्यय; अटकाव; अडचण; अडगळ. २.खोळंबा; खोटी; विलंब. ३. लक्ष्य : 'आपण चि आडखळा कीजे । कवतिकें जैसा विंधिजे' -ज्ञा ११.४७३. ४. अडखळून पडण्यासारखी जागा.

**आडखाणे** न. जेवणाशिवाय फळे, उपाहारा सारखे दुय्यम किंवा किरकोळ खाणे, फराळ.

**आडखाद** स्त्री. खाद्य.

**आडखिळा** पु. लगोरीची रचना; ज्यावर नेम धरायचा असे स्थळ; निशाण; लक्ष्य.

**आडखिळी** स्त्री. १. दाराचा अडसर, कडी, खिटी. २. अडथळा, (व.)

**आडखुळणे** सक्रि. वाटेत येणे : 'दारिद्री आडखुळें रीधी:अनाचार्यातें वरित सिधी' - ऋव ४६.

**आडखुळा** वि. भयभीत : 'जेहीं आडखुळे केले असुर' - रुस्व २९२.

**आडखोर** वि. हट्टी; आडमुठा; हेकेखोर; आग्रही; अडेल.

**आडगडी** पु. कामकऱ्याचा हाताखालचा माणूस; मदतनीस; हस्तक.

**आडगत-गात** वि. आडगिऱ्हाइकी; आयता, तयार मिळालेला; वापरलेला.

**आडगल्ली** स्त्री.१. लहान गल्ली, बोळ. २. मोठ्या रस्त्याला मिळणारा लहान रस्ता.

**आडगाठ्या** वि. चुरशी; खुनशी; द्वेषी; तेढ उत्पन्न करणारा.

**आडगाडी** स्त्री. छकड्याहून मोठी पण गाडीहून लहान अशी गाडी.

**आडगात** न. १. शरीराचा घेर. २. पलंग, बाज वगैरेचे आडवे लाकूड.

**आडगात-त्या** वि. वक्र; कुटिल; तऱ्हेवाईक; विलक्षण; शंकेखोर; विरोधी बोलणारा.

**आडगाव** पु. लहान गाव; खेडे; वाडी.

**आडगिरा(ऱ्हा)इक** पु. प्रत्यक्ष दुकानदाराकडून विकत न घेणारा माणूस.

**आडगिरा(ऱ्हा)इकी** वि.आडग्राहकी; प्रत्यक्ष दुकानदाराकडून विकत न घेतलेला किंवा विकत न दिलेला माल (वस्तू).

**आडगुड** स्त्री. पडदणी.

**आडगु(गू)ण** पु. १. भुताखेतांचा जोर; भुताने पछाडणे; काही चिन्हावरून दिसून येणारे भुताखेतांचे दुखणे; बाहेरची बाधा. २. कुटुंबातील मृतांच्या अवकृपेमुळे होणारी बाधा. (को.गो) ३. अवगुण; दुर्वर्तन (क्रि. धरणे, देणे).

**आडगोखमा** अर्धवट वयाचा मुलगा.

**आडगोष्ट** पहा : **आडकथा**

**आडघात** स्त्री. अवेळ; अकाळ; बेहंगाम; गैर मौसम; अयोग्य संधी. [आड+घात]

**आडघोडा** पु. लहान घोडा; प्रसंग विशेषी मोठ्या घोड्याचेही काम करणारा घोडा; तट्टू. [सं. अर्धघोटक]

**आडचा** वि. छत्राखाली, आश्रयाखाली असणारा.

**आडचाल्लो** वि. हट्टी; दुराग्रही.

**आडचावट** वि. कंटाळवाणे बडबडणारा; बडबड्या; बोलण्याने त्रासदायक वाटणारा; वाचाळ : 'तो पोरगा आहे थोडासा आडचावट.' - राकाळी ११४.

**आडची तेरा** क्रिवि. दरसाल दर शेकडा अडीच या प्रमाणे एक महिन्याचे व्याज काढून त्या वरून एका वर्षास तेरा महिन्याचे व्याज आकारण्याचा करार : 'मुकाम औरंगाबाद कर्ज ३००० गुजारत भुचंडमल सावकार औरंगाबाद व्याज आडची तेराप्रमाणे.' - बाबारो २.१६५.२६०.

**आडचोर** वि. सांदीकोपऱ्यात पडलेल्या, किरकोळ वस्तू चोरणारा; उचल्या; भुरटा.

**आडजागा** स्त्री. बाजूची, कोपऱ्यातील, वापरात नसलेली जागा : 'कुणी ... (चपलांसाठी) आडजागा हेरीत होते.' - कोउ १०१.

**आडजात** स्त्री. १. मुख्य प्रकाराव्यतिरिक्त इतर. २. संकरप्रजा. [का. अड्ड+सं. जाति]
वि. खट्याळ; हिरवट; द्वाड; खोडकर; त्रासदायक. (मूल इ.).

**आडजाळ** न. अकल्पित, भलते संकट : 'जैसे गगनीं आभाळ । ना तरी तरणीं मृगजळ । तैसें नाथिले आडजाळ । तुज पाडिलें हें ।' - विसिंपू ७.४५.

**आडजिना** लहान जिना, चोर जिना, अडचणीच्या विशेष प्रसंगी

वापरावयाचा जिना.

**आडजीभ पडजीभ** ( फक्त म्हणीमध्ये) स्त्री. जिभेचा एक भाग; (सामान्यत:) पडजीभ. (व.)

**आडजुना, आडजून** वि. अर्धवट जुना; उपयोगाने नवीनपणा नाहीसा झालेला; नादुरुस्ती,निरुपयोगी.

**आडझट** न. लहानसे संकट; अडचण; बारीकसारीक त्रास; उमेद खचविणारी गोष्ट. एखाद्या नीच मनुष्याने आणलेले संकट.

**आडणी** अडचणीची वेळ. (कु.)

**आडणी सावकार** किरकोळ, लहान सावकार.

**आडत** स्त्री. शेतकऱ्याच्या मालाची विक्री करून देणाऱ्या दलालाची, धंद्याची जागा : 'सतरी आडतीवरचे निजलाव.' -पाचोळा ५०.

**आडत** न. अडवणूक : 'जेथ जेथ भूमि खणिजे तेथ तेथ साहाजेचि आडत मांडले असे' - विद२.

**आडताल** पु. कोणत्याही तालांचे दीडपटीचे आवर्तन.

**आडताला-ळा** अडथळा : 'रघोजी भोसले मंगळूर प्रांतीच फिरत आहेत.त्यांचे मोकासे कमाविस चालत आहे. आडताला नाही.' - पेद ३०.९६.

**आडतास** न. शेत नांगरताना नांगरास पुष्कळ बैल असल्यामुळे बांधापर्यंत नांगर जाऊ शकत नाही अशी नांगरावयाची राहिलेली जमीन आडवी नांगरतात. ती नांगरलेली जमीन.

**आडताळणे** अक्रि. अडथळा करणे; प्रतिबंध करणे; उपद्रव देणे; आड येणे : 'कसब्याची जमीन आडताळून पाडिली आहे.' - पेद २०.१२५.

**आडताळा** पु. हिशेबाचा पडताळा : 'परी हा सूक्ष्म आडताळा । वारी विवेकें वेगळा ।'

**आडतीड** स्त्री.अडचण; नड; गुंता : 'मध्यंतरीची आडतीड निभावण्यासाठी मृतात्म्यास अडथळा करणाऱ्या देवचारास कोंबडा नारळ बळी देतात.' - ब्राह्मण मासिक १.५.७.

**आडत्या** पु. (स्था.) सुतारकाम करताना वस्तू मागेपुढे सरकू नये म्हणून टेबलाला लावलेली पट्टी.

**आडदण, आडदाण** स्त्री. कपडे ठेवण्यासाठी बांधलेली आडवी दांडी : 'सणावारी घालायची कापडं आडदणीला गठळ्यात बांधून ठेवली हुती..' - गोतावळा ११६.

**आडदर** पु. भय; धाक : 'जेयाचा आडदरु सदा वाहे। कृतांतु मनीं ।।' -ज्ञा १.१०७.

**आडदरा** पु. आडवळणातील दरी : 'दरेदरकुटे आडदरे।' - लीचपू १५०. [क. अड्ड+सं. दरी]

**आडदरा** न. आर्द्रा : 'लोक आडदराची वाट पाहू लागले' - बनगर १०५.

**आडदंड** पु. अडथळा : 'द्वारपाल आडदंड। घालूं न शकती महाभये।' - पांप्र ३.१५.

**आडदंडगी** स्त्री. (विणकाम) विणलेले कापड मापात व ठरावीक उंचीवर येण्याकरिता ठेवलेले आडवे लाकूड. याच्यापुढे आडसरावर कापड गुंडाळले जाते व विणकरी त्यावर रेलून विणतो.(बे.)[क.]

**आडदावा** पु. गुप्त द्वेष; हेवा; खुन्नस.

**आडदांड** वि. दणकट व अडाणी; हेकट आणि द्वाड; अविचाराने वागणारा; बलदंड पण अविवेकी; दणकट; धटिंगण; रानवट; बेमुर्वत.

**आडदांडी** स्त्री. आडवी दांडी : 'चौकाचेया दाराचा आडदांडीपासी राणा भेटला.' - स्थापो ५७. २. कापड मोजण्याचा गज : 'डांगेची आडदांडी'- लीचपू ७८.

**आडदिवस-दिस** पु. ज्या दिवशी काही नेमधर्म किंवा आचार-संस्कार नाही असा रिकामा दिवस. २. एक सोडून एक, दिवसाआड, अधलामधला दिवस. ३. बिन हंगामी, अयोग्य, दिवस.

**आडधाया-ये** स्त्री. वाण; नड; अडचण; अट : 'कापड पुढें पाठविले तरी कार्यास येईल; वरकढ लोकांनी हरयेक गोष्टीची आडधाये नसे.' - पेद १६.३६.

**आडधोतर** न. लहान धोतर किंवा मोठा पंचा.

**आडनर** पु. (नळीस) आतील बाजूस आटे पाडणारे यंत्र.

**आडनाम** न. टोपण किंवा औपरोधिक नाव : 'आडनामीं वर्मी बोलावितु। गोपाळ हांसां आड पडतु। तेवींची अमृतां दृष्टीं नीववीतु। सवंगडेया तें।' - दाव २.१७.

**आडनाव** न. १. उपनाव; घराण्याचे वंशाचे नाव. २. समाजात एकाच नावाच्या अनेक व्यक्ती सापडतात. तेव्हा व्यक्तीचा निर्देश अधिक निश्चितपणे करता यावा म्हणून त्याच्या वृत्तीवरून, गावाच्या अगर देशाच्या नावावरून त्याला लावलेले विशिष्ट नाव : 'अस्तमानाचें जयासी। आडनाव नाहीं।' -ज्ञा ८.९०. ३. (ल.) व्यर्थ नाव; खोटे नाव; अयार्थ नाव : 'जीभ जैं आरोगूं जाये। मग रसना हे होये । आडनांव कीं ।।' - अमृ ६.६२.

**आडनावाचा** वि. केवळ नामधारी; फक्त नावापुरता : 'नररत्न तोचि तूचि स्त्रीरत्न उदंड आडनावाची.' - मोनल.

**आडनिडी** वि. पाहिजे त्या वेळी नसलेली; योग्य वेळी नसलेली; अडचणीची : 'आडनिड्या गाड्यांच्या वेळामुळे .' - उपा ११४.

**आडनीड** वि. अडचणीची; अर्धवट; विषम : '...लेखांची संख्या पंधरा असून ती अडनीड होती...' -आत्मवृत्त ६२.

**आडनीत** स्त्री. १. अन्याय निवाडा. २. अन्याय्य कृत्य. (गो.)

**आडपडदा** पु. १. पलीकडचे दिसू नये म्हणून मध्ये सोडलेला, लावलेला, टांगलेला पडदा. २.(ल.) आच्छादन; गुप्तपणा; झाकण. ३. मर्यादा; विनय; लज्जा. (वा.) **आडपडदा न ठेवणे** - उघडपणे बोलणे; मनात असेल त्या प्रमाणे वागणे.

**आडपतादडपता** पु. वचक ठेवणारा.

**आडपदर** पु. १. पडदा (डोळ्यावरील, व्रणावरील). २.आडपडदा; गुप्तपणा; झाकण. ३. संकोच; विनय; लज्जा.

**आडपरण** न. पखवाज वाजवताना लयीशी आड वाजवलेले परणाचे बोल : 'तबलजीचे सर्व आडपरण, बोल, बिकट पेच त्याला वाजवायला लावले.' -अस्ताई ४५.

**आडपसारा** पु. सटरफटर वस्तू; अडगळ; फालतू वस्तू.

**आडपंचा** पु. अगदी लहान पंचा.

**आडपाग** न. मासे धरण्याचे मोठे जाळे. (हे बारा हात व्यासाचे असते.)

**आडपाट** स्त्री. पडशी (गोणी)च्या दोन्ही तोंडाच्यामधील भाग, तरट.

**आडपाड** पु. आडररस्ता.
अ. पुढे, मागे.

**आडपाडी** स्त्री. खटपट; श्रम.

**आडपालउ** पु. तोंडाआड धरलेला वस्त्राचा पदर : 'आडपालउ ओडउनि गोसावीयावरौनि निगाले' –लीचपू २९६.

**आडपीक** न. नेहमीच्या हंगामी पिकांच्या दरम्यान घेतले जाणारे पीक; पिकांच्या दोन रांगांच्या मध्ये लावलेले पीक.

**आडपेठ** स्त्री. छोटासा बाजारगाव; आडगावातील बाजार.

**आडप्राप्ती** स्त्री. वरकड मिळकत; गैर मार्गाने मिळालेली वरची रक्कम.

**आडफट** स्त्री. चीर; भेग (तक्तपोशी, दार वगैरेतील); एकीकडचा कानाकोपरा; एकीकडची जागा; एकान्त स्थळ.

**आडफळ** न. ढाल : 'आडफळें वोडवीत। तयातें भैदोनि रूपत' –उह १४८२.

**आडफागुर** पु. एकाच्या खाली एक असे डाहळीला मोड येणे, फुटणे; आडवे अंकुर फुटणे. (गो.)

**आडफाटणे** अक्रि. वेडेवाकडे फुटणे (झाड, इ.) : 'डहाळिया आडफाटति माळिया । जातीचिया ।' –ज्ञा १५.१४९.

**आडफाटा** पु. १. क्षुल्लक अडथळा; आक्षेप; हरकत; तक्रार; हुज्जत. २. अवचित अडथळा; विघ्न; संकट. ३. भुताखेतांची बाधा; भुतांनी पछाडणे. (कों.) (वा.) **आडफाटा काढणे, घेणे, फोडणे** – कार्याचा बिघाड करणे. **आडफाटा भरणे –** आडमार्गाने जाणे; बहकणे : 'अहंकार मद्य पिऊनी । भ्रमती मायाधीरविपिनीं । आपली शुद्धि विसरोनि । आडफाटा भरले हो।' –हरि ७.२२८.

**आडफाट्या** वि. १. आडफाटा, अडचणी, अडथळा घालणारा; तक्रार करणारा. २. लहरी; चिडखोर; तिरसट; छांदिष्ट.

**आडबंद धोतर** न. पुढे गाठ मारून नेसलेले धोतर.

**आडबंदर** न. लहान बंदर, विशेष व्यापारी महत्त्व नसलेले बंदर, गलबते नांगरण्यास फारसे सुरक्षित नसलेले बंदर.

**आड बाई आड** मुलींचा एक खेळ.

**आडबाजार** पु. मुख्य बाजारास जोडून असलेला दुसरा छोटा बाजार; वापरलेल्या जुन्या वस्तू विकल्या जातात तो बाजार;जुना बाजार : 'कंपनीच्या मालकीचा कोट वाईकर आडबाजारात विकत आहेत.' – अक्षर ८५.

**आडबाजू** स्त्री. मुख्य भागाहून वेगळा एकीकडचा प्रदेश. एका बाजूला असलेली जागा; ठिकाण.
क्रिवि. एका बाजूस; आड बाजूस; कानाकोपऱ्यात; नेहमीच्या जागेच्या पलीकडे.

**आडबाजूचा** वि. एकीकडचा; एका बाजूचा.

**आडबाप्या** पु. जवान मुलगा; तरणाबांड, प्रौढ झालेला मुलगा.

**आडबायको** स्त्री. नुकतीच वयात आलेली मुलगी.

**आडबारे** न. मंडपाच्या उभ्या मेढीवर जे बांबू अगर पोफळी यांचे सोट आडवे घालतात त्यापैकी प्रत्येक. (गो.)

**आडबिदी** स्त्री. आडगल्ली; आडरस्ता; लहान मार्ग : 'जेथ जैन मार्गीचिआं आडबिदी' – शिव ९७. [का.]

**आडबोली** स्त्री. १. वाकडे बोलणे. २. संदिग्ध, अस्पष्ट, न समजण्यासारखे बोलणे. (को. गो.)

**आडभर–भारी** स्त्री. १. अडचण; संकट. २. अडवेपणा. (वा.)
**आडभरीं भरणे** स.क्रि. १. (गर्भात) आडवे होणे, येणे. २. वाकडे जाणे : 'चित्त बहु निर्वुजलें। तेणे आडभरीं भरलें।' – दास ३.१.४०.

**आडभंगड** वि. मूर्ख; अडाणी. (व.)

**आडभिंत** स्त्री. पडदी; दोन भाग करण्यासाठी मध्ये घातलेली भिंत; विभाजन भिंत. आडोसा.

**आडभीड** स्त्री. अनमान; भीड; हट्ट : 'सर्वही आडभीड आम्ही चालवीत असतां ते पुन: फितण्यात होतेच.'–एलेसं ३४४.

**आडमान** न. ताबेगहाण; तारण : 'त्यास पाहिजे तरी आडमान, पैका पिटजेपावतो (फि टेजेपावतों) मुलुख, जो पाहिजे तो कुंपनीत ठेवून घ्यावा.'– चिरा.

**आडमाप** १. योग्य मापापेक्षा अधिक वा कमी असलेले असे अधले–मधले माप. २. (ल) खोटे माप. ३. भरमसाटपणे मोजणी किंवा मापणे.

**आडमार्ग** पु. आडवाट, आडवळणाचा, एकाबाजूचा, दूरचा रस्ता : 'परमार्थ पंथ क्रमितां सांग। पाऊल पडलें आडमार्गे ।' २. (ल.) चुकीच्या किंवा वाईट साधनांचा उपयोग.

**आडमिळकत** स्त्री. जादा मिळकत, नेहमीच्या प्राप्तीशिवाय, इतर मार्गाने होणारी मिळकत; वाममार्गी पैसा.

**आडमुठा** वि. १. आडदांड; अडाणी; मूर्ख; ज्याची समजूत पटत नाही असा.

**आडमुद्दा** पु. १. सबब; तक्रार; अडथळा; भलता विषय. २. कराराबाहेरचा मुद्दा; अडवणूक करणारा मुद्दा : 'रोजमुरा तिसरा द्यावा, नालबंदीपैकीं कांहीं द्यावे, तरी पलीकडे उतरों, असें शिलेदारांनीं आडमुद्दे घातले.'– ऐलेसं २३८०.

**आडमुशी** स्त्री. ओकारी; हागओकीची बाधा.

**आडमुसणे** अक्रि. ठेचकाळून; लचकून पडणे; घाबरणे.

**आडमूठा** वि. १. मुठीत न मावणारा; आटपशीर नसणारा; २. वेडावाकडा; बोजड; अकुशल.

**आडमूठ** स्त्री. डोंगराळ जमिनीत फार सावधगिरीने व वाया न जाईल अशा बेताने बी पेरणे.

**आडमेळ–ळे** पु. न. अकस्मात उत्पन्न झालेली अडचण; आडकाठी; प्रतिबंध; विघ्न; व्यत्यय; अपशकुन. (गो. कों.)

**आडमोड–डी** स्त्री. मोडतोड; कापाकाप; नाश: 'कवाडें करोनि आडमोडीं। प्रवेशला आंत।'– कथा ४.३.१८.

**आडमोडा** पु. मोडता; अडथळा: 'ऊंहूं ! आत्ता नाहीं सांगायचं... तूं आडमोडा घालशील.' – पडघवली १७७.
वि. उद्ध्वस्त; नष्ट : 'आडमोडे केले खरांटे : महातरूचे'– शिव ४८६

**आडमोरा–मोहरा** वि. १. एका बाजूस; समोर नाही असा; दूर रस्त्यावर नाही असा : 'जाय पाहतां आडमोहरा । संत सुपथें लाविती ।' – मुविराट ७.१०.३.
क्रिवि. मध्ये; आडमार्गात; प्रतिबंध रूपाने. (क्रि. येणे, असणे, होणे, पडणे, घालणे, ठेवणे इ.)

**आडमोरी–मोहरी** क्रिवि. १. आडून, दडून, आडोशाने २. कोनाकोपऱ्यात; सांधीकोंदीत; बाजूला; एकीकडे.३. बाजूस तोंड करून; तोंड फिरवून.

**आडम्हातारा** पु. मध्यमवयस्क; म्हातारपणात प्रवेश करणारा. [सं. अर्ध+महत्तर]

**आडय** स्त्री. एक पक्षी. [सं. आडि]

**आडय, आडव** स्त्री. आडवे होणे; कुशीवर निजणे, पडणे, टेकणे. (क्रि.येणे). (कों.)

**आडरझांव न.** अन्यायाने बोलणे, 'तागेलें हें पैलीं आडरझांव!' (गो. कु.) [आड+पोर्तु. राझांव = न्यायीपणा]

**आडराग** पु. प्रचारात नसलेला राग : 'श्रोते समजदार असले तर ते आडराग तितक्याच तयारीने गात.' – थोसं १७७.

**आडरात** स्त्री. अर्धी रात्र; मध्यरात्रीनंतरची रात्र; रात्रीची भलतीच वेळ. [अर्ध+रात्र]

**आडरान** न. १. एकीकडचे, मुख्य रस्त्यापासून दूर असलेले रान, शेत; अरण्य; आडवाट; चुकीचा मार्ग : 'ना तरी सेऊनि थोर आडरान।'– दावि ३६. २. (ल.) विषयांतर; भलताच विषय. (वा.) **आडरान घेणे–** वाकडे बोलणे; मुद्द्याला सोडून बोलणे; भलतेच समजणे : 'ऐसा श्रोतयांचा अनुमान । श्रोतीं घेतलें अनुमान ।' –दास ९.३.७. या शब्दाचा उपयोग पुढील क्रियापदांशी करतात. उदा. आडरानात भरणे, जाणे, शिरणे, फिरणे, बहकणे, गुंतणे, भटकत फिरणे. **आडरानात शिरणे**– १. जाणून बुजून अज्ञान दाखवणे; वेड पांघरणे : 'तर ते त्याचा अर्थवाद करून आडरानांत शिरतील काय ?'– लोटिकेले ४.४.६३.

**आडरानी** वि. गावंढळ; खेडवळ; शहरातील नव्हे असा (धंदा, रीत, माणूस, पदार्थ, व्यापार.).

**आडल** पु. १. आडहत्यारी. पहा : **आडाऊ** : 'स्वार माणूस आडलाचे.' – थोमारो १.३.२२.

**आडलणे** क्रि. १. आढळणे, अचानक सापडणे: 'जैसें मार्गे जातां आडळिजे। चिंतामणी ।।' –राज्ञा २.१९४. २. अडखळणे, जखडणे, त्रास देणे.

**आडलागांजला** वि. अडचणीत असलेला; अडचणीत आलेला; अडचणीत सापडलेला.

**आडलापिडला–भिडला** पहा – **आडला गांजला**

**आडलावणे** न. ताटाखाली लावायचे टेकण; वडगणे : 'गोसावियांसि ताटावरि आसन जाले : आडलावणे लाविले'– लीचपू ११५.

**आडव** न. १. अरण्य; रान; जंगल : 'जी जीवित्वाच्या आडवीं'– ज्ञा १६.३४. २. अडचणीचे ठिकाण : 'तें चोरांसी आडव होये।'– ज्ञा १८.७२४. [सं. अटवो]

**आडव** वेंग किवा दोन हातांची कवळी (कु.) २. (ल.) एका कवळीत मावणारी भाताण्याची पेंढी.

**आडव** पु. अडथळा: 'आडवी आडव, रूपाचा बरव'– ज्ञागा ३८६.

**आडवण, आडवाण** न. १. डोंगराचा मध्यभाग; शिखर आणि पायथा यामधील भाग.(कों.) २. डोंगरावरील उताराची जागा; उतरण: उतरणीवरील जंगल: 'तो आडवणीच्या वडाखाली उभा राहून रोज वाट बघत होता.'– तोरण ९.

**आडवण** न. आडवा धागा.

**आडवणे** अक्रि. भिणे; दबणे : 'कस्तुरीमृगाचिये ओसाइ भांबावे... भवराचीये श्रुती आडवे'– रुस्व ५३२.

**आडवत** न. काकडीचा कीस तांदळाच्या पिठात शिजवून केलेले एक पक्वान्न. (कों.)

**आडवर्ण** पु. मुख्य जातींहून वेगळी जात; आडजात.[सं. अर्ध+वर्ण]

**आडवर्णाचा** वि. १. आडजातीचा; संकर जातीचा (मनुष्य). २. भुताखेताच्या बाधेपासून झालेला (रोग, व्यथा).

**आडवल** स्त्री. हिंदी पोषाखातील (मजूर वर्गातील) किरिस्ताव. (गो.) स्त्री. न. वधूला लग्नाच्या वेळी हळदीचा रंग दिलेली वस्त्रे नेसविल्यानंतर त्यावर त्याच रंगाचे जे एक वस्त्र गुंडाळून हातात धरावयास लावतात ते वस्त्र.

**आडवली** स्त्री. विळी. (गो.)

**आडवस्ती** स्त्री. १. एका बाजूस, आडवळणास किंवा खोलगट जागेत वसलेले गाव. २. अशा प्रकारच्या ठिकाणी वस्ती, वसाहत, रहिवास.

**आडवस्त्र** न. मुख्य वस्त्र बदलताना नेसले जाणारे छोटे वस्त्र, पुरुष वापरतात तो पंचा किंवा स्त्रिया नेसतात ती पडदाणी; सोवळे नेसताना मध्ये नेसतात ते दुसरे वस्त्र. पडदा : 'स्वमायेचे आडवस्त्र । लेउनि एकला खेळवी सूत्र' –ज्ञा १८.१२९४. [सं. अर्ध+वस्त्र]

**आडवळण** न. मुख्य रस्त्याच्या बाजूचे वळण, प्रदेश, स्थळ, आडवाट; आडबाजू.

**आडवळणी** वि. १. हमरस्त्यावर नसलेले किंवा एका बाजूस असलेले. २. वाकडे; सरळ नसलेले.

**आडवळा** पु. खांबाला आडवे गुंडाळतात ते वस्त्र: 'धैर्याचा स्तम्भ निर्धारीं । धर्माचे आडवळे तयावरी ।'– भाराबाल २२.३६. २. आडवट; आडवा वासा; आडवा दांडा: 'कन्या मंडपीं स्तम्भभावाचे। आडवळे शुद्ध सत्त्वाचे ।' –भाराबाल २३.११.

**आडवंकी–गी** पहा : **अडबंकी–गी** : 'संकल्पाचीही आडवंगी । न करणें जें ।।' – ज्ञा १६.२०३.

**आडवा** वि. १. उभा नव्हे तो; समांतर पातळी वरचा. २. जाड; रुंद. ३. तिरपा; वाकडा. ४. विरुद्ध; प्रतिकूल; उलटा. ५. प्रतिबंध करणारा. (वा.)**आडवा करणे** –आड आणणे; आडवा करणे, सपाट करणे.

**आडवे घेणे**–१. दोषैक दृष्टीने पाहणे; वाकडे घेणे; शंका घेणे. २. खरडपट्टी काढणे; (विप्र.) आडवातिडवा घेणे. ३. मुलाला पाजणे. **आडवे जाणे** – १. रस्ता ओलांडून जाणे. २. सामोरे जाणे. ३. हरकत करणे; अडथळा आणणे; अपशकुन करणे. **मांजर आडवे जाणे** – एखाद्या कामाला जाताना मांजर आडवे आले तर काम होत नाही अशी समजूत आहे. **आडवे झेलणे, झोकणे, टाकणे, देणे**– धोंडा, गोळा, वीट, घागर इत्यादी वस्तू एका रांगेने उभ्या राहिलेल्या लोकांच्या हातातून एकाकडून दुसऱ्याकडे अशा देणे, नेणे. **आडवे टाकणे**–ओलांडणे. **आडवे ठाकणे**–मध्ये येणे; अडथळा करणे. **आडवे नेसणे**– (बायकी) लहान वस्त्र, तात्पुरते (स्नान किंवा वस्त्रांतर करताना) गुंडाळणे, वेढून घेणे, उभे घेणे, लावणे. **आडवे पडणे** – १. भांडणतंटा तोडण्यास मध्ये पडणे; तडजोड करू पाहणे. २. लोटांगण घालणे; दयेची याचना करणे; एखादे कार्य थांबविण्याविषयी विनंती करणे. ३. विघ्न, विरोध करणे. **आडवे बोलणे**– १. मुद्दा सोडून बोलणे. २. वाकडे बोलणे; लावून बोलणे; विरुद्ध बोलणे: 'म्हणोनि घडले बोलणे आडवें।।' –दावि १३५. **आडवे येणे**– १. गाठणे; भेटणे; मार्गात येणे : 'लोक म्हणती आडवे आले। खांडून काढा।।' – दास ३.१.४०. २. विरुद्ध जाणे; नाउमेद करणे; प्रतिबंध करणे : 'हा आडवा येईल कोण पाहों। –सारु ८.२९.३. (विप्र. आडवे येणे) प्रसूतिसमयी मूल सरळ न येता प्रसूतिद्वाराशी आडवे होणे; अडून राहणे. ४. सामोरे जाणे; स्वागत करणे. **आडवे लावणे**–१. परत पाठविणे. २. वस्त्रांतर करताना किंवा स्नान करताना आखूड वस्त्र नेसणे; वस्त्र अपुरे व सैल नेसणे; उभेआडवे नेसणे. ३. वाकडा अर्थ घेणे; बोल लावणे; निर्भर्त्सना करणे; अडथळे उपस्थित करणे. ४. कुत्सित दृष्टीने पाहणे. **आडवे लावून देणे**– पहा : **आडवे नेसणे. आडवे होणे**– १. (जमिनीवर) अंग टाकून लोळणे–निजणे; कलंडणे; वामकुक्षी करणे. २. (ल.) खाली पडणे. ३. लठ्ठ होणे. ४. आड येणे; मध्ये येणे. **आडव्या अंगाचा** – १. लठ्ठ; फोपशा. २. उंचीपेक्षा जास्त रुंद; आडवा वाढलेला. **आडव्या काठीचा**– पहा : **आडव्या अंगाचा. आडव्या जिभेचा**–१. वाकडेतिकडे बोलणारा; दुर्भाषण करणारा; भांडखोर. २. रानवट किंवा गावंढळ भाषण करणारा. ३. भरमसाटपणे बोलणारा; असंबद्ध बोलणारा. **आडव्या बांध्याचा** पहा : **आडव्या अंगाचा. आडव्या हाडाचा** पहा : **आडव्या अंगाचा. आडव्या हाताने घेणे** – खरडपट्टी काढणे. कठोर शब्दांत हजेरी घेणे. (ना.) **आडव्या हाताने (हाती) देणे**– लाच देणे. **आडव्यात शिरणे**– १. वाम मार्गाचा अवलंब करणे; सरळ रस्ता सोडून जाणे. २. वाकडे बोलणे; विषयांतर करणे. **आडव्या सुडक्याची बायको, रांड** – अत्यंत दीन, दुर्बल (विधवेबद्दल किंवा एखाद्या बाईबद्दल बोलताना ग्राम्य शिवी): 'तू लहान झालास तरी पुरुष आणि मी मोठी झाले तरी आडव्या सुडक्याची बायको, माझे हातून काय दरबारात बोलवेल?'

**आडवाअडव** स्त्री. १. एकदम जोराने अडथळा करणे. तगादा, निकड लावणे. ३. प्रत्येक बाबतीत एकसारखी अडवणूक करणे.

**आडवाउभा** वि. क्षितिजसमांतर व उर्ध्वाधर; आडवा व उभा; उंच व लांबट; पसरलेला व ताठ उभा; वाकडा व सरळ.

**आडवा छेद** पु. (वन.) जमिनीला समांतर काट.

**आडवाट** स्त्री. १. एका बाजूचा, आडवळणाचा रस्ता; आडमार्ग. २. मोठ्या रस्त्याच्या बाजूची वाट; रस्त्याची कड.

**आडवाटा धर्म** पु. काम्यकर्मे करून घेऊन मजुरी न देणे; काम करून घेऊन आडमार्गाने जाणे; आड वाटेत शिरणे; (ल.) तक्रार करणे.

**आडवाटी** स्त्री. मोठा थाळा : 'आडवाटीं ठाणवै जेवण'– लीचपू २७.

**आडवाट्या** वि. भलत्या मार्गाने जाणारा; सरळ न वागणारा; एककल्ली; करनकऱ्या.

**आडवातिडवा** वि. वाकडातिकडा; काहीसा तिरकस; बाकदार; वेडावाकडा; बेढब.

**आडवादंड** पु. (व्यायाम) दोन खांब जमिनीत उभे पुरून त्यांच्या शेवटास दोन भोके पाडून त्यात आडवी गुळगुळीत पहार बसवलेली असते. ही पहार उभ्या खांबांवरील समोरासमोर असलेल्या भोकांच्या साहाय्याने खाली वर सरकवता येते. व्यायाम करताना या पहारेस हातांनी धरून किंवा पायांनी अडकवून निरनिराळ्या प्रकारच्या उड्या घेतात. या उड्यांचे अनेक प्रकार आहेत.

**आडवार** पु. १. कोणत्याही विशिष्ट दिवसाशिवाय किंवा नेमलेल्या दिवसाशिवाय इतर दिवस; अधलामधला दिवस. २. भलता, अयोग्य दिवस.

**आडवारणे** अक्रि. रेलणे; (निजण्यासाठी) आडवे होणे: 'सर्वजण आपापल्या फळीवर आडवारले होते.' – धुश १०६.

**आडवारा** पु. अडथळा; प्रतिबंध : 'जैसें सिंहाचिया आहारा। जंबुक करिती आडवारा।'– कथा ४.११.१२८.

**आडवाव** पु. आड रस्ता; अडथळा; मधला रस्ता : 'न फेडितां आडवावो।'– अमृ ७.२६५.

**आडवांग** न. एक बाजू, आडवी बाजू : 'आपुलिया उसीसा कां आडवांगी ठेउनि आपण पाइतयाकडे खालिं नीजति।'– सूत्रपाठ.

**आडवी** पहा : **अडवी**

**आडवी** स्त्री. १. लहान अडणा; आडखिळी; गज; गराद (दाराचा–खिडकीचा) लहान खिळा.

**आडवी काडी** स्त्री. अडथळा; प्रतिबंध : 'कामाप्राप्तिसी आडवी काडी । होतां क्रोधाची पडे उडी ।'–एभा २३. २५२.

**आडवीण** पहा : **अडवण**

**आडवी पालखी** स्त्री. रस्त्याच्या दोन्ही बाजूंना पालखीच्या दांड्याची टोके करून पालखी आडवी नेण्याचा मान. हा मान शृंगेरीच्या शंकराचार्यांचा आहे.

**आडवी वाट** स्त्री. वाकडी वाट; योजलेल्या कामाला जाण्याचा मार्ग बदलून वेगळ्या मार्गाने जाणे (क्रि. करणे, धरणे): 'आम्ही बारदेशच्या स्वारीवर गेलो होतो तेव्हा आडवी वाट करून घरी गेलो.'– श्रीयो २.४०.

**आडवे** न. १. अरण्य: 'अविद्येचे आडवे। भुंजीत जीवपणाचें भवे।'– अमृ २.२ २. टेकडीच्या शिखरापासून पायथ्यापर्यंतचा उतार असलेला प्रदेश; माची. [सं. अटवी]

**आडवे उभे** न. १. वाकड्या मसलती–बेत; लबाडीचा डाव. २. कुटिल नीती; इष्ट हेतू साधण्यासाठी वाकड्या मार्गावर अवलंब.

**आडवे कापणे** जमिनीला समांतर काठ मारणे.

**आडवे छत** न. (स्था.) १. काटकमानी छप्पर, आडवे कमानी छप्पर, श्रोणीयुक्त चापछत.

**आडवेतिडवे** क्रिवि. इकडे तिकडे.

**आडवे पाणी** न. नद्या; विहिरी, तळी इत्यादींचे शेती, बागायतीला पुरवले जाणारे पाणी. (पावसाचे नव्हे.).

**आडवेळ** स्त्री. १.पहा : **अवेळ**. २. अनुचित, अयोग्य किंवा भलतीच वेळ. ३. कामाची नसलेली वेळ; फुरसतीची वेळ. ४. सूर्यास्तापूर्वी, तास दोन तासाच्या आधीची.

**आडवैर** न. आडवे (मध्ये) आलेले शत्रुत्व; हाडवैर : 'तेथ आडवैरें चि आले।'– ज्ञा १८.१०४४. [का. अड्ड+सं. वैर]

**आडवोगर** पु. आंबट भात : 'काळियवनाचा आडवोगरु : पुरडैला दे ढेंकरू'– शिव ४३९.

**आडवोल** न. ओले वस्त्र. (गो.)

**आडवोहळ** पु. आटून गेलेला ओढा : 'कां आडवोहळा पाणी आले'– ज्ञा १३.७५४.

**आडशहर** लहान शहर.

**आडशेरी** स्त्री. अंदाजे अडीच किलोचे माप किंवा वजन अर्धी पायली : 'शेतकरी याला चार पेंड्या कडबा देतो आणि आडशेरी पायली जोंधळेही देतो.'– विश ७०.

**आडस** स्त्री. १. अडचण; अट; मर्यादा; मध्यंतरी असलेली प्रतिबंधक गोष्ट, परिस्थिती, नियम इ. 'ग्रंथोक्ती तेथ आडसो घालितोसि कां'– ज्ञा १३.६३४. २. (ल.) शिष्टाचार; उपचार : 'ज्या श्रीमंतांच्या लोकांनीं पातशहाची तगीरी बहाली केली आहे, त्यांच्या पत्रास इतकी आडस नाहीं. यास कोण पुसतो?'– देअ २९४. ३. मध्यस्थ : 'रूसले भरतारा। समजावे नानारीती। घरांत नाहीं कोणी। आडस गणपती।।'– वलो ९०. (व.)

**आडस** वि. आटोपशीर, नेटकी : 'तेणें बरवी आडस। परवंटी घातली कास' –उह ११८२.

**आडसर** पु. दार किंवा खिडकी बंद ठेवण्याकरिता असलेली लाकडी किंवा लोखंडी दांडी; गज, खीळ, अडवा, अडू; लाकडी अडसर. हा कोठेकोठे दाराच्या पाठीमागच्या भिंतीत भोक ठेवून त्यात बसवलेला असतो व दार बंद करताना तो फळ्यांच्या आड लावतात.

**आडसर** पु. ज्यात पाणी अधिक असून खोबरे थोडे झाले आहे असा कोवळा नारळ; शहाळे. (कों)

**आडसर** पु. १. डोंगराभोवती असणारी वाट; ज्याचा भोवतालचा भाग तुटल्यासारखा दिसतो असा डोंगराचा भाग; डोंगराच्या माथ्यावरची धार; डोंगराची बगल : 'आडसरामाजीं राहिलें ।'– दावि २५०. २. गावच्या शिवेचा दगड. ३.(विणकाम) उभा ताणा सारखा पसरलेला राहावा म्हणून वहीच्या पुढे ताण्याच्या खाली आडवी लावतात ती काठी. ४. दांडगट, धटिंगण, अगडबंब मनुष्य. (वा.) **आडसरासारखा पडणे, निजणे, पसरणे** – अव्यवस्थितपणाने रस्त्यात, वाटेत वगैरे निजणे, पडणे, लोळणे.

क्रिवि. घट्ट; आवळ: ताठ.

**आडसंधि–धी, सांध** स्त्री. १. जांघ, कास इत्यादी अडचणीच्या जागी असलेला सांधा. २. अडगळीची, अडचणीची जागा. ३. रिकामा वेळ. ४. संकट, आपत्ती.

**आडसाटी** स्त्री. पूर्ण नव्हे व अपूर्ण नव्हे अशी मधली स्थिती (गो.) वि. मध्यम स्थितीतील; अर्धवट. (गो.)

**आडसाटो** पु. आडसट्टा; अंदाज; अटकळ. पहा : **अडसट्टा** (गो.)

**आडसाठा** पु. तात्पुरती एका बाजूस करून ठेवलेली, नेहमी न लागणाऱ्या वस्तूंची रास, संग्रह. प्राय: सप्तमी विभक्तीत प्रयोग. जसे– आडसाठ्यात. यावरून भलत्या ठिकाणी ठेवलेले, टाकलेले.

**आडसार** पु. पूर्ण न झालेला नारळ. (हेट.) पहा : **आडसर**

**आडसाल** न. १. एक वर्ष टाकून एक वर्ष; वर्षाआड वर्ष. २. (कृषी.) बिवडाचे साल. जसे–ज्या जमिनीत एक वर्षी जोंधळ्याचे पीक केले तीत पुढील वर्षी बाजरी इ. दुसरी पिके करणे : 'भात काढून थोडं आडसालीं माळवं केलं हुतं.'– गोतावळा ११८.

**आडसाल्या उस** पु. अठरा महिन्यांनी होणारा. (आइसाल्या ऊस म्हणजे एक वर्षाआड येणारा ऊस.)

**आडसुडी** पु. मदतनीस; सहायक पहा : **अडसुडी**

**आडस्वयंपाक –सैपाक** पु. स्वयंपाकातील मुख्य पदार्थाखेरीज इतर पदार्थ– चटण्या, कोशिंबिरी इ.

**आडहते(त्या)र** न. किरकोळ शस्त्र, खंजीर, कट्यार इ.

**आडहत्यारी** पु. (ल.) मिळेल ते हत्यार घेऊन सैन्यात दाखल होणारे आढाऊ: 'त्यांत दहा पंधरा हत्यारी व बाकीचे आडहत्यारी असतात.'– गांगा ५०.

**आडहेळ** पु. ओढा; नाला: 'गणपति आडाहेळात बुडाला होता.'– मिरास २४२.

**आडळ** न. गोरवी कटगी या नावाचे झाड. (कों.)

**आडळ** स्त्री. अडचण.

**आडळ** पु. आढळ. पहा : **आडळू**

**आडळ** पु. स्पर्श: 'कामक्रोधादि त्यां नाहीं आडळ.'– रंयोवा १.५२५.

**आडळ** पु. १. विकल्प: 'कवणें विखीं अडळु । ने घे चित्त ।'– ज्ञा १३.३५९. २. अडथळा; प्रतिबंध: 'मग घरींचाचि ठेवा । जेवीं डोळ्यां दावी दिवा । तरी घेतां काय पांडवा । आडळु असे ।'– ज्ञा १८.८९२. ३. यत्किंचित् : 'जळीं जळावेगळ। कापूर न दिसे आडळ ।'– अमृ ३.२७.

**आडळणे** क्रि. अडखळणे. आडळणे पहा : **अडळणे** : 'तरी उजूचि कां आडळिजे। जयापरी ।'– ज्ञा १.२४७.

**आडळणे** क्रि. आढळणे; प्राप्त होणे: 'एऱ्हवी हा योगियां नाडळे।'–

ज्ञा ४.१३.

**आडळी** स्त्री. १. एक पक्षी. पहा : **अडल** २. लहान विळी.

**आडळीभ्रमणी** स्त्री. अंधुक पूर्व कल्पना; संभव. (व.)

**आडंगी** क्रिवि. आड; मागे; अंगाआड; आडोशास.

**आडंबर** पु. न. (श्रीमंती, विद्वत्ता, पवित्रता इत्यादीकांचा) डौल; दिमाख; पोकळ बडेजाव; रिकामी ऐट; खटाटोप. 'जैसें आडंबर स्वप्न भेदाचें। नाथिलेचि।'– विसिंउ ८.४५ (क्रि. घालणे, मांडणे) [सं.]

**आडंबा** पु. दारास, खिडकीस लावण्याचा आडसर.(कों.) [क. अड्डा]

**आडा** १. धान्य, साठा. २. फायदा.

**आडा** पु. १. शेतास केलेले काटेरी झाडाझुडपांचे किंवा निवडुंगाचे कुंपण. (कों.) २. घराभोवतालचे दगडी कुंपण. (सामान्यत:) आडोसा. (गो.) ३. दरवाजा बंद करताना लावायचा अडसर.(कु.) ४. गलबताच्या व कलमीच्या आधारासाठी एकाखाली एक असलेली दोन मोठी लाकडे. (हेट.) ५. घराचे आढे (हेट.).

**आडा** पु. एका जातीचा पक्षी, बगळा. [सं. आडि]

**आडा** पु. रेषा; रेघ; टिळा : 'भालप्रदेशीं चंदनाचा आडा लेखिती'– पूजावसर (महानु.) [का. अड्डा]

**आडा** पु. गंधाचा आडवा पट्टा. (वा.) **आडा रेखविणे**–टिळा, गंध लावणे, लावून घेणे : 'साहाणेवरि चंदन होते : तेयाचा आपणेयांसि आडा रेखविला :' – लीच ३.८५.

**आडाआडी** स्त्री. धडपड; खटपट; श्रम; आटाआट : 'करूनि आवडीच्या कावडी। या रामेश्वरीं येती भाविक कापडी। क्षणिक आयुष्य जाणुनि तांतडी। आडाआडी पावले ।'– हरि १५.१४०.

**आडाऊ** पु. बंदूक, तलवार या शिवाय हलके हत्यार वापरणारा पायदळ शिपाई; आडहत्यारी: 'आडाऊ पायींचे चालत ।' – मुआदि १९.१०.

**आडाखताळा** पु. १. ताळा पाहण्याची रीत. आडव्या रकान्यातील बेरीज उभ्या रकान्यातील आकड्यांशी जुळवून पाहणे.

**आडाखा** पु. १. मेळ; ताळा; ठोकताळा. २. ताळेबंद; तपशीलवार पत्रक.

**आडाखेदार** पु. अंदाज, ठोकताळा मांडणारा.

**आडाचौताल** पु. (संगीत) एका तालाचे नाव; यात चौदा मात्रा व सात विभाग असतात: 'मोठया ख्यालाचे ताल म्हटले म्हणजे तिलवाडा, आडाचौताल.... हे होत.'– अस्ताई १६.

**आडाड** पु. अडथळा : 'तरि कां हो घालितसा । आडाड जीवा ।।' – राज्ञा १८.२९०.

**आडात–थ** पु. दरवाजा, फाटक, खिडकी इत्यादींच्या दारावरील किंवा पाटाखालील बसावयाच्या आडव्या पट्ट्या.

**आडामोडा** पु. उसाच्या रसाने भरलेली (चरकाजवळील) भांडी चुलाण्याकडे नेणारा.

**आडामोडा घालणे** क्रि. मोडता घालणे; अडथळा; अपशकून करणे : 'लेका, काय तरी आडामोडा घालू नगस !'– वळीव ६३.

**आडाव** पु. १. आडहत्यारी. पहा : **अढाऊ–व** : 'पावळे आडाव इटेकरी, पट्टाईत.... यांची संजगणी करून हशम मेळविले.'– मराआ ६. २. धाडसी, शूर शिपाई.

**आडाव** न. पेंढ्यांचा भारा; पांच पेंढ्या. (बे.)

**आडाव–वु** वि. आडगिऱ्हाइकी; जुनाट (वस्तू). (व.)

**आडावणे** क्रि. बंदरात आगबोट दूर उभी असताना उतारू उतरून घेण्यासाठी आगबोटीस पडाव लागणे. (कु.)

**आडावतपाग** न. बारीक मासे पकडण्याचे 'रोंगो' नावाच्या जाळ्याहून लहान जाळे. पहा : **आडपाग** (कों. राजा.)

**आडास** पु. आडोसा; आच्छादन; छाया; अंधार. (गो.)

**आडास** स्त्री. (कृषी) जमीन एकदा उभी नांगरल्यावर तीच पुन्हा आडवी नांगरणे. पहिल्या नांगरणीस 'तास' म्हणतात.

**आडासन** न. १. कंबर : 'म्हणोन हातीं भाले घेऊन व फिरंगा आडासनी घेऊन, हत्तीसन्मुख येऊन भाले निशाणाचे हत्तीस लाविले.' – मदरु १.४. २. मांडीवर मांडी घालून ऐटीत बसणे : 'आडासनी पाओ घातला असे' – लीचउ २३७. [सं. अर्धासन]

**आडाळणी** स्त्री. पेरणीच्या दुसऱ्या दिवशीची नांगरणी.

**आडाळा–ळी** पु. स्त्री. विळी.

**आडाळी** मातीच्या भिंतीचे कुंपण. (कु.)

**आडांगपण, आडांगाय** न. खोडकरपणा; व्रात्यपणा; वात्रटपणा; खोडी; मस्ती; आडदांडपणा. (गो.)

**आडांगी** वि. वात्रट; आडदांड; दांडगा; भांडखोर; मस्त. (गो.)

**आडांत्री** क्रिवि. नाजूक स्थानी किंवा मर्मस्थानी (क्रि. लागणे, पडणे, मारणे). (कु.)

**आडांव** न. चालू कामापुरती, तात्पुरती खणलेली, न बांधलेली विहीर. (कों.)

**आडि–डी** स्त्री. एक लहान मासा; खर्वा बांगडा. (गो.)[सं.]

**आडिका** पु. पैसा, आडका.

**आडिंगणे** कि. आलिंगणे. 'आडिंगति गातातिं देवांगना।' – वछा १६५.३४.

**आडिंबा** पु. अडसर; अडवट; अडाणा. (कों.)

**आडी** स्त्री. एक पक्षी; बगळी. [सं.]

**आडी** स्त्री. पहा : **अडी** १. रहाट गाडग्याच्या चाकाला परिघाच्या बाजूने अक्षाशी समांतर अशी रव्यावर मारलेली लाकडे. एका रहाटास अशा बारा आड्या असतात (कों.) २. धार काढताना गाईने लाथ मारू नये म्हणून तिच्या सभोवार बांधावयाच्या काठ्या. ३. (मल्लशास्त्र) कुस्तीत प्रतिपक्षास पायात घालावयाची आढी. ४. (सामान्यत:) आढी (आंब्याची, गवताची, कपाळ, पाय इ.ची). ५. जनावराचा पाय मोडल्यास दोन्ही बाजूंना बांधतात ती लाकडे. (कों.गो.) ६. घराच्या भोवतालचे दगडी कुंपण; गडगा. (गो.) ७. नदी उतरून जाण्याचा लाकडी पूल. (बे.) ८. आडकाठी; अडथळा; प्रतिबंध : 'मार्गी कांहीं पडली आडी । दूत तांतडी पाठविले।'– एरुस्व १४.६७ (बे.) ९. शंका. १०. (कातकरी धंदा) भांडी घडविण्याच्या उपयोगी असलेले दगडी, चपटे, आरपार भोक असलेले उखळ. ११. (नाविक) गलबताच्या झाडाच्या वरील लाकडी तक्त; उतारूंना बसण्यासाठी केलेली जागा; होडीवरील बसण्याकरिता असलेली फळी.

१२. काना.(गो.) १३. अडसर. (गो.)

**आडी** स्त्री. १. काठी : 'वामकरी धनुषाकार आडी : दक्षिणकरे भरणिका नाडी'- ऋम ७६५. २. गडदरा : 'पसु असे ते आडीदरडी चरे'- लीचपू २१५.

**आडी** स्त्री. (संगीत.) गानप्रकार; आदिपरंपरा (गाणे) : 'आडी गातांतीं देवांगणां'- दाव १६५.

**आडी** स्त्री : भोपळ्याची कापलेली फाक; तुकडा. (कु.)

**आडीगुडी** स्त्री. कपट; कृत्रिमपणा : 'भाऊजी लक्ष्मना । काय पोटीं आडीगुडी। माहेरची वाटवाहू। पुसतां कां घडोघडी ।।'-वलो १०. (व.)

**आडीचा** वि. अडचणीचा (मार्ग) : 'पुढें यावे तरी लस्कर लांबले. मार्गीहि आडीचा. याकरिता जासूद पत्रें देऊन रवाना केला.'- पेदम २.५.

**आडील** वि. आडचा; आश्रयाखालील; छत्राखालील; आच्छादनाखालील; आडोशाचा.

**आडीळणे** क्रि. अडवणे : 'चल ग, कोण आडीळतय बघू !' - वळीव १०३.

**आडुमाडू** पु. शेंदाडशिपाई : 'असले धाडस कोण आडुमाडू करेल.' - माजी ६.

**आडुळणे** क्रि. स्पर्श करणे. 'एथचें म्हणौनि : आडुळिचि ना:' - लीच ३.१७.

**आडू** स्त्री. १. घाटातील सडकेच्या एका बाजूस डोंगर असतो. त्याच्या विरुद्ध दरीच्या दुसऱ्या बाजूस असलेली दगडी अर्धी भिंत किंवा बांध. २.पाथर्वटाचे दगड फोडण्याचे पोलादी हत्यार; मोठा हातोडा. (कों.) [का. अड्डु]

**आडूक** वि. कडवट. (गो. बे.)

**आडून** क्रिवि. १. एखाद्याच्या आड उभे राहून किंवा एखाद्याच्या मागे. २. एखाद्या मार्फत, मध्यस्थीने.

**आडूनि** क्रिवि. समोरून, पुढून : 'आगा ए वीरन्हो ! आडूनि सरा'- शिव ५६३.

**आडे** क्रिवि. बाजूस; पलीकडे; आड : 'नग आडे जाले झाडी बहुत।'- दावि ७७८. (खा.)

**आडे** वि. आडवे; कलते (क्रि. घेणे) (कों.) [का. अड्डु] (वा.) **आडे घेणे** - विश्रांती घेणे; आडवे होणे : 'दुपारी आडे घ्यायला मधली गेली.' - रथ ९७.

**आडे** न. कडी : 'कवाडे घातली आडीं घातली ' - लीचउ २००.

**आडे** न. १. आढे (घराचे). २. उंबरा; उंबरठा; मर्यादा : 'ग्रामद्वारींचें आडें। नोलांडी कोण।' -ज्ञा १३. ७००. ३. दोन माणसांनी कापण्याची करवत; आढ्या करवत. ४. (नाविक) नावेचा कणा; एक जाडे लाकूड; हे नावेस बोडतांच्या दुरमीणावर बसवितात. याने आतल्या बाजूस व काठीस आधार मिळतो. ५. ज्याला बैल जोडतात तो उसाच्या चरकाचा आडवा दांडा. ६. घरावरील छप्पर; माळ्यावरचा भाग. (बे.) ७. तागडी; ताजव्याची दांडी. [सं. अट्ट]

**आडे** न. (कळस नसलेले) लहान देऊळ : 'पसीमा अभिमुख गैर आडे : आडेयासि दोनि खिडकीया' - स्थापो १४.

**आडे** पाण्याची कावड. (राजकोश - सं. श्री. मराठे.)

**आडे** न. गावाच्या वेशीचे लहान दार : 'पारके आले म्हणोनि .... आडी घातली.' - लीचउ ३६७.

**आडेकरी** वि. १. आड, आडवा येणारा. २. (ल.) वाटमाऱ्या.

**आडेकरी** वि. तागडीवाला.

**आडेचे** वि. चालू; हल्लीचा. (गो.) [सं. अद्य.]

**आडेपाठण** न. नावेचा कणा.

**आडेपाडे** न. आड्यापाड्या. शेतातील दर एक खळ्यातून काही धान्य घेण्याचा पाटलाचा हक्क.

**आडेपारडे** मोकदमीचा एक हक्क.

**आडो** न. शेत, बाग, घर इ. चे दगडी कुंपण; तट; गडगा. (गो.)

**आडोय** पु. विहिरीला बसवलेले लाकूड : 'आडोयाले कना, चाक दोन्हीमधी गती एक'- बगाणी ४४.

**आडोर** स्वस्थ, निभ्रांत.

**आडोरा** पु. व्यभिचार; बलात्कार : 'फिरला पापकर्म डांगोरा । विध्वंसिला यज्ञ सारा। मांडिला स्त्रियांसि आडोरा । प्रगटपणे ।'- कथा ६.५.४३.

**आडोसा** १. आडपडदा, आच्छादन. आपण कोणाला दिसणार नाही अशी जागा. २. आपण कोणाला दिसू नये म्हणून लावलेला पडदा किंवा कूड. ३. पाऊस, वारा, उन, इ. पासून तात्पुरता बचाव होईल अशी जागा. ४. दृष्टीस प्रतिबंध करण्यासाठी केलेली पडद्यासारखी योजना : 'पलिकडे पांढऱ्या कनाती लावून आडोसा तयार करण्यात आला होता.' - वासिंमास ७.

**आडोळणे** क्रि. आड येणे; प्रतिबंध होणे : 'येऱ्हवी आडोळलिया डोळा। शिवदर्शनाचा सोहळा। भोगिजे।' - अमृ ९.५५.

**आडोळणे** सक्रि. आदळणे; आपटणे : 'श्रीकृष्ण चक्रवर्ती धेनुकासुर पांई धरौनि भूमीसी आडोळिला' - श्रीकृष्णच १९(१)

**आडौनि** क्रिवि. बाजूस; आडवे : 'आगाअें वीर हो आडौनि सरा, उजू हाति अेरूं धरा।'- शिव ५६४.

शअ. आडून : 'पूर्ण चंद्राडौनि आभाळु काढिलें।'- शिव ७२०.

**आड्डा** पु. (दारूकाम) चंद्रज्योती लावण्याकरिता एका कळकाला लावतात ते लोखंडी फूल (आटा).

**आड्याळ** न. नांगराचे रुमणे. (माण.)

**आढई** स्त्री. बगळी. (कु.) [सं. आडि]

**आढक** पु. सुमारे चार किलो. आठ पौंड, चार शेर किंवा पायलीचे माप; बंगाली दोन मणांचे माप. [सं. आढक]

**आढक** वि. ओढून धरणारा; आढ्यतेचा.

**आढकपणा** पु. हट्ट; ओढून धरणे; ओढाताण; अडवणूक : 'नवाब आढकपणा करतात हा स्वभाव आहे' - मइसा ५.१९०.

**आढकस** वि. १. मजबूत; घट्ट. २. (ल.) धाडसी.

**आढगळा** पु. मांग लोकांचा सरपंच.

**आढणी** स्त्री. तिवई. पहा : **अडणी.** 'रत्नजडित दीप ठेविले जवळी। जडित आढण्या त्या तळीं।' - हरि २४.११९.

**आढन** पु. गाय, म्हैस इ. ची कास. (व.)

**आढमूढ** वि. १. विस्तृत; अफाट; आडमाप. २.अतिशय उंच. पहा : **आडमूठ** : 'आरामवाटिकेंत आढमूढ वाढून, आकाशात हात घालणाऱ्या वृक्षाची योजना'– लोटिकेले १.१५२.[सं. अर्थ+मूढ]

**आढवानी** वि. अनवाणी : 'असा राजा शेतकरी चालला रे आढवानी'– बगाणी १०७.

**आढळ** पु. १. थांग; पत्ता; शोध; भेट; उपलब्धी. २. ज्ञानाचे, अनुभवाचे क्षेत्र; आटोका.

**आढळणे** अक्रि. आढळ होणे; भेटणे; दिसणे; मिळणे; ज्ञानगोचर होणे, लक्षात येणे; हाती येणे.

**आढळून जाणे** क्रि. भेटून जाणे : 'तिलाहि तो आढळून जात असे.'– खदे २५९.

**आढाऊ–व** पु. शिपाई. पायदलातील शस्त्रधारी सैनिक. पहा : **अढाऊ**

**आढारणे** क्रि. पसरणे; झोपणे : 'मग आढारली एका हातरुणावर शेजारी शेजारी.'–ककां ४१.

**आढाल** न. शस्त्र; अडला : 'उगाउगीच भांडतो। उगाउगीच तंडतो। उगाउगीच ढाल घे। उगाउगी आढाल घे।'– दावि ७०६.

**आढालढालाची** वि. ढालगज; धीट : 'आढालढालाची पै थोर। अभावभावें अति सुंदर। दाटोनि रिघों पाहे घर। वशीकरण मज करील।'– एरुस्व ५.४५.

**आढाव** पहा : **अढाऊ**

**आढावा** पु. १. व्यवहाराच्या सर्व हिशोबांचा सर्वसाधारण मेळ, वर्षाअखेरीस पाहण्याचा तक्ता. २. खर्चाचा कच्चा खर्डा. ३. घडलेल्या घटना थोडक्यात सांगणे; गोषवारा. ४. सिंहावलोकन.

**आढाळ** न. डोंबारी दोरीवरून चालताना तोल सांभाळण्यासाठी हातात घेतात तो बांबू. तोल सांभाळण्याचा खेळ : 'ब्रह्मगोळकाचे आढाळ करी।' – भाए ६०५. [क. अड्डु]

**आढी** स्त्री. फळे पिकवण्यासाठी गवतात रचून ठेवणे. पहा : **अढी** : 'यासी शुकमुख लागलें। आवडीचे आढिये मुराले। संतजन सेवितां धाले। आनंदले परिपूर्ण।।' –हरि १९.२२५. [का. अडकु]

**आढी** नाठाळ गायी–म्हशींना मस्ती करता येऊ नये म्हणून दूध काढण्याच्या वेळी त्यांच्या शेजारी बांधलेले आडवे लाकूड; आडी

**आढी** स्त्री. पीळ; वळी; सुरकुती.

**आढे** न. १. घराच्या छपराच्या किंवा पत्र्यांच्या दोन पाख्यांमधील लांब लाकूड : 'गुहा पांच वांसे असें येक आढें ।' – कचेसुच२. २. उसाच्या चरकाचा लाटा फिरविण्याकरिता व बैल जोडण्याकरिता वर बसवलेला लांब दांडा. ३. पहा : **अढे**

**आढे** न. एका खांद्यापासून दुसऱ्या खांद्यापर्यंत मानेलगतचा पाठीकडील भाग; (शिवण) या भागाचे माप.

**आढेखांब** पु. खांबणी; आढे व तुळई यांना जोडून असणारा खांब.(कों)

**आढेवेढे** पहा : **अढेवेढे**

**आढ्य** वि. धनिक; श्रीमंत; संपन्न; युक्त : 'आढ्य कुलीनजनाचें दावी औदार्य जें वितरणीं तें।'– मोभीष्म ५.४५. [सं.]

**आढ्यता** स्त्री. १. गर्व; ताठा; मिजास; डौल. २. श्रीमंती : 'आढ्यु आतुडे आडवीं । मग आढ्यता जेवीं हारवी।' – ज्ञा १३.२०६. (क्रि. धरणे, बाळगणे, मिरवणे). ३. ख्याती; प्रसिद्धी (निंदाव्यंजक). [सं.]

**आढ्या करवत** स्त्री. (यंअ.) १. दोन माणसे चालवितात अशी करवत. २. आकडीचे दाते असलेली खालपासून वरपर्यंत निमुळती होत जाणारी अरुंद (खाच असलेली) करवत.

**आढ्याचा खोबळा** पु. उसाच्या चरकाच्या लाटां (खुंटां) पैकी मधल्या लाटेच्या (नराच्या) डोक्यावर बसवलेली इंग्रजी 'यू' आकाराची लोखंडी पट्टी. या पट्टीत चरक फिरविण्याचे जोखड बसवतात.

**आढ्याचे ताक** न. ज्यात आढे दिसू शकेल इतके पातळ ताक.

**आढ्या मारणे** क्रि. १. धडपड करणे (व.) २. हेलपाटे घालणे. (ना.)

**आण** स्त्री. शपथ : 'कां भीमकाची आण । हे चंद्रकिरण ।' – शिव. ८२२. [सं. आज्ञा.]

**आण** स्त्री. नजर; दृष्टी : 'मराठ्यांची आण दिल्लीवर फिरली.'– हिप्र ११.१५२.

**आण** स्त्री. मिठाची रास (माप). (कों.)

**आण** उअ. आणिक; आणि; व; आणखिन.
वि. अन्य; दुसरे; निराळे : 'आण करूं नये बापा।'– उषा १०९८; 'तुजसम वीर नाही आण।'– मुशांति ३०.१५६. [सं. अन्य]

**आणआणू** क्रिवि. अन्योन्य; एकमेक; परस्पर : 'मग बोलतीं निपनवसां आणआणूं।' – शिव ८१. [सं. अन्योन्य]

**आणको** पु. टोमणा; वाक्प्रहार. (गो.)

**आणक्रिया** स्त्री. शपथक्रिया; प्रतिज्ञा; आणभाक; काही महत्त्वाच्या करारांच्या वेळी घ्यावयाची शपथ.

**आणखी, खीन्** क्रिवि. १. अधिक; जास्त; शिवाय. २. पुन्हा.

**आणणावळ** स्त्री. सामान वगैरे वाहून आणण्याची मजुरी.

**आणणे** उक्रि. १. घेऊन येणे. २. मिळणे; मिळवून देणे : 'कणिकेत जैसे पाणी। तैसें मीठ बांधेयाते आणी।' – ज्ञा १७.१३९.
सहाय्यक क्रि. ईत प्रत्ययान्त कोणत्याही क्रियापदास जोडल्यास मुख्य क्रियापदाने दर्शवलेली क्रिया बहुतेक पूर्ण झाली असा अर्थ होतो. उदा. बांधीत आणणे, फेडीत आणणे. इ. [सं. आ+नी]

**आण ने** स्त्री. १. एखादी वस्तू वारंवार इकडून तिकडे नेणे आणि आणणे. २. (ल.) उपद्व्याप; दगदग; तारांबळ. ३. ने आण.

**आणप्रमाण** न. शपथ; शपथक्रिया; आणभाक.

**आणभाक–घ** स्त्री. १. शपथेने दृढ केलेला करार किंवा वचन : 'लटकें जाहलिया आणभाकेसि'– एभा १२.२५६. २. लग्नात कंकणबंधनाच्या वेळी घेण्याची शपथ. यामुळे वधू वर शपथेप्रमाणे वागण्यास बांधिल असतात.

**आणव** वि. (रसा.) अणूसंबंधी, अणूच्या संदर्भात. [सं.]

**आणव भार** पु. (रसा.) ऑक्सिजनचा आणव भार सोळा मानतात. त्यास प्रमाण मानून त्याच्या सोळाव्या हिशशाच्या जितके पट एखाद्या अणूचा भार असेल, ती पट म्हणजे त्या अणूचा सापेक्ष भार, म्हणजेच आणव भार. [सं.]

**आणवाई** पहा : **आणणावळ**

**आणशपथ** स्त्री. वचन; शपथ; करार.

**आणसुट (धरणे)** न. एक विधी. शनिवारी संध्याकाळी सर्व दूध विरजून दुसऱ्या दिवशी त्याचे लोणी काढतात. ते कढवून त्या तुपात वाती भिजवतात व त्या देवापुढे लावतात.

**आणा** १. उखाणा. पहा : **आहणा** २. लोकोक्ती; सुभाषित; म्हण.

**आणा** पु. १. जुने चार पैशाचे वा नवीन सहा पैशाचे नाणे. सध्या हे नाणे प्रचलित नाही. २. जुन्या रुपयाचा सोळावा भाग, हिस्सा. ३. (जमीन मोजणीत) ७.५६२५ चौ. यार्ड = एक गुंठ्याचा १/१६ किंवा एकराचा १ह्न६४० भाग; गुंठ्याची साखळी १६ कड्यांची किंवा आण्यांची असते; १ह्न१६ फूट लांब रेषेचे माप, प्रमाण. ४. कोणत्याही वस्तूचा १ह्न१६ भाग. ५. १६४ मण वजन : 'माझ्या मित्राचा पडाव आठ आणे वजन उतरविणारा असून तो राजिवड्याच्या खाडीत काम करीत होता.'– किर्लो १९३७.१४७.२. ६. शंभर मण किंवा फराभर मीठ (मिठागरात).

**आणाआण** स्त्री. लागोपाठ घाईघाईने सामान सुमान आणणे, इकडून तिकडून सर्व बाजूंनी –दिशांकडून आणणे, जमा करणे; जुळवाजुळव. [आणणेचे द्वि.] (वा.) **आणाआणीचा संसार** घरचे उत्पन्न अगदीच नसलेल्या माणसाने बाहेरचे मिळवून केलेला संसार. **आणा आणा मागे, पाठीस लागणे** – १. हे पाहिजे, ते पाहिजे असा घरचा तगादा मागे लागणे. २. (ल.) लग्न करणे; कुटुंबवत्सल होणे; पुष्कळ माणसांचा प्रपंच चालविणे; अडचणीत येणे.

**आणा दोन आणे** वि. थोडा तरी; किंचित; (१६ आणे गुण= पूर्ण गुण यावरून) पूर्णांशापैकी काही अंश.

**आणापट्टी** स्त्री. प्रत्येक बिघा, नांगर, मनुष्य इत्यादिकांगणिक घेतलेली एक आणा जादा पट्टी, कर.

**आणि** उअ. आणखी; व; शिवाय; आणिक. १. दोन किंवा अधिक शब्द किंवा वाक्ये अर्थाच्या दृष्टीने जोडणारे अव्यय. २. असंभवता दर्शक उपयोग करताना कर्त्यानंतर वापरतात. उदा. टिळक आणि सरकारची माफी मागणार ? शक्यच नाही ! ३. भरभर बोलताना आणि चे 'अन्' किंवा 'न' असे रूप होते.

**आणि** स्त्री. अग्र; टोक; महत्त्व; तीव्र इच्छा: 'जैसा पाखाण नेघे आणी।'– ज्ञा १६.१२५.

**आणिक** वि. वेगळा; भिन्न; विशेष; दुसरा; अन्य.
'जेथील तेथे आणिकीं। कामा नये सर्वथा।'– दास ७.९. १५.
क्रिवि. आणखी, पुन्हा.
शअ. शिवाय.

**आणिकचि** अ. भलतेच; विलक्षण: 'आणिकचि सुख होउनि जाये। म्हणून विसरे।'– ज्ञा ६.३७१.

**आणियाळी दृष्टी** स्त्री. कटाक्ष; नेत्राच्या कोपऱ्यातून पाहणे; तिरकी दृष्टी : 'आणियाळिया दृष्टी ।'– उगी ३६५. [सं. अणि]

**आणियाळे** वि. तीक्ष्ण; टोकदार. पहा : **अणियाळे** : 'अत्यंत सूक्ष्म आणियाळें। तांदुळां वेळिलें सोज्वळें।'– एरुस्व १४.१२३.

**आणी; आणेली** स्त्री. आणा. जुने चार पैसे वा नवे सहा पैसे किंमतीचे चांदी, निकेल इ. धातूंचे नाणे. पहा : **आणा**

**आणी** स्त्री. (चर्म. व्यवसाय) जोड्यांस शोभा आणण्यासाठी ढोपरापासून आणलेली शेंडी, टोक. पहा : **अणि–णी** [सं. अणि]

**आणी** स्त्री. आवड : 'आणी पुरो लागे'– ज्ञा. ६.१८

**आणीक सारखा** पु. दुसरा कोणीतरी; भलताच.

**आणीख** अ. आणखी; निराळा; वेगळा; विचित्र: 'गतवर्षीचा विचार आणीखच होता. यंदाचा आणीखच आहे.'– हिंद २.७.

**आणीबाणी** स्त्री. १. रागाची, क्षोभाची स्थिती; क्षुब्धता; हमरीतुमरीवर येण्याची अवस्था; (क्रि. येणे). २. कार्य सिद्ध होण्याची जवळ आलेली स्थिती; सोक्षमोक्षाची वेळ. ३. निकडीचा कठीण प्रसंग, समय. ४. आकस्मिक संकट; आकस्मिक आपत्तीचा काळ. (वा.) **आणिबाणीचा कज्जा, भांडण, लढाई, वाद–** कडाक्याचा, निकराचा, जोराचा तंटा, कलह वगैरे. **आणीबाणीचे काम–** नाजूक काम; ऐनवेळचे अगदी संपवलेच पाहिजे असे काम. **आणीबाणीस येऊन नासणे**–ऐनवेळी बिघडणे, बिघाड होणे.

**आणीबाणी सांडवा** पु. (स्था.) धोक्याच्या वेळी अडवलेले पाणी वाहून जाण्यासाठी केलेली वाट.

**आणीबाणी स्विच** पु. (विअ.) आपत्कालीे वीजप्रवाह बंद करावयाचे बटन किंवा स्विच.

**आणीया** पु. अफूच्या (खसखशीच्या) पिकावरील एक रोग.

**आणी शिवणे** क्रि. (चर्म.) तजाच्या मध्ये टोकास रेशीम भरणे.

**आणेआन** वि. भलतेच : 'एऱ्हवीं होईल आणेआन ।'– उषा ६५०. [सं. अन्य चे द्वि.]

**आणेक** पु. टोमणा. (गो.)

**आणेगा** स्त्री. १. अधिकाऱ्याच्या द्वाहीने एखादी गोष्ट बंद करणे. २. प्रतिबंध; मनाई. ३. द्वाही; दुराही. ४. शपथ; आण. पहा : **अनेगा** (क्रि. घालणे, करणे, मोडणे, मानणे).

**आणे पै चा हिशेब** पु. तंतोतंत हिशेब.

**आणेवारी** स्त्री. १. सारा आकारण्यापूर्वी पाटील, कुलकर्णी इ. नी उभ्या पिकाची पाहणी करून आण्यांच्या प्रमाणात बांधलेला अंदाज. २. पिकाच्या परिस्थितीप्रमाणे आकारावयाचा सारा. ३. वाटणी : 'वतनाची आणेवारी होऊन प्रत्येकाला पाच वर्षे पाळी येते.'– गागो ३६.

**आणोजे** न. अंकुर : 'देहीं कर्माचें आणोजें।'–ज्ञा १४.३२७.[सं. अणि]

**आण्विक** वि. १. अणुबाँब सारख्या शस्त्रासंबंधी, शस्त्रांचा. २. अणुऊर्जेवर चालणारा; अणुविषयक. [सं.]

**आण्विक उत्सर्ग** पु. आण्विक स्फोटानंतर वातावरणातून भूपृष्ठावर पडणारे किरणोत्सारी पदार्थ, धूळ इ. [सं.]

**आण्विकता** स्त्री. (भौ.) मूलद्रव्यातील एका रेणूमध्ये असलेली अणूंची संख्या. [सं.]

**आण्विक पाणबुडी** स्त्री. अणुशक्तीवर चालणारी पाणबुडी.

**आत** स्त्री. १. आत्या; बापाची बहीण. २. मामी; सासू. अत्तिका म्हणजे

वडील बहीण; प्राकृतात 'बापाची बहीण' असा अर्थ रूढ.– व्युत्पत्तिप्रदीप पृ. २९. [सं. अत्ता]

**आत** न. सीताफळ. (को. गो.); आंत (गो.)

**आत** अ. १. आतल्या बाजूस; अंतर्भागात. २. ठराविक मुदतीच्या पूर्वी; अगोदर ३. मध्ये; मिळून; धरून; संबंधात किंवा संबंधाने; बरोबर; (गौणपणे) एकात एक; उदा. कामात काम, खर्चात खर्च, गोष्टीत गोष्ट इ. [सं. अंतर] (वा.) **आतबाहेर करणे, पाहणे–** मागचा पुढचा विचार करणे. **आत येणे**– खालावणे; ऱ्हास पावणे; एखादा धंदा तोट्यात येणे; साधनसामग्रीचा अभाव होणे. **आत होणे**– अंकित होणे; मांडलिक बनणे : 'मोठमोठे राजे ज्याचे आंत होऊन ज्यांस थरथरा कांपत होते...'– नि ६४.

**आत, आंत** न. आंतडे; आंत्र: 'एकाची लोंबतीं आंतें। घायीं कोतें अडकलीं।'– एरुस्व १२.२२. [सं. अंत्र]

**आतई, आतोई** पु. आतेचा नवरा. (व.)

**आतउता–ती** शअ. आत; मध्ये; अंतर्भागी. [सं. अंतर]

**आतकडी–किटी–किडी** स्त्री. आतडी. (गो.) [सं. अंत्र]

**आतकोनाडा** पु. मोठ्या कोनाड्यात राखलेला लहान कोनाडा.

**आतखानी** वि. मत्सरी; द्वेषी; असहिष्णू; हेवेखोर.

**आतगी** स्त्री. आत; आत्या; बापाच्या बहिणीस बहुमानार्थी.

**आतचा** वि. आतील; आतला.

**आतचाल** स्त्री. (ज्यो.) एक मुहूर्त. सूर्य नक्षत्रापासून दिन नक्षत्रापर्यंत होणाऱ्या नक्षत्रांपैकी आरंभीच्या चार नक्षत्रांचा काल. हा मुहूर्त गाय, म्हैस नेण्या–आणण्यास शुभ मानतात. वरील एकंदर नक्षत्रांपैकी पहिल्या चार नक्षत्रांस आतचालीची व त्यापुढील तीन नक्षत्रांस बाहेरचालीची अशी संज्ञा आहे. [सं. अंतर्+चर्]

**आतडी, आतडे** स्त्री. न. १. आत; अंत्र; नलाकृती अन्नमार्ग; पोटातील नळी. २. ज्यात अन्नपचन होते असा जठरापासून सुरू होणारा व गुदद्वारापर्यंत पसरलेला, दोरीसारखा परंतु पोकळ असणारा, पचन संस्थेतील एक घटक, अवयव. ३. तातीचे चर्म. (वा.) **आतडी कुंपणावर घालणे**– अतिशय त्रास देणे. **आतडी बाहेर काढणे–** अतिशय रागावणे; स्फोट करणे. **आतडे तुटणे–** एखाद्याबद्दल फार काळजी वाटणे; मनाला दुःख होणे : 'पोरांकरिता माझें आतडें कसें तुटतें'– कलंदर ४१. **आतड्याला पीळ बसणे–** खरी कळकळ, काळजी वाटणे; अतिशय दया येणे; अतिशय दुःख होणे; खऱ्या कळकळीमुळे तीव्र दुःख होणे. **आतडी गळ्यास येणे**– अतिशय श्रम होणे.

**आतणे** क्रि. १. होणे, पावणे : 'असो जळीं लवण विरोनि गेलें। परि क्षारतेसीं होतें उरलें। तेंहि हळुहळु मधुरता आतलें। या नांव विज्ञान स्थिती ।' – स्वानु ११.१.८५ २. दडपणे: 'परि कैसा भारें आतला पिकें। दैवाचेनि ।' – ज्ञा ६.१४५. ३. देणे; अर्पण करणे : 'प्रसन्न होउनि वरदानास। सावरी विद्या आतुली।' – नव ७.३.४. व्यापणे: 'विचित्रता भूताचिया । आपण आंतोनि ठिकरिया।'– ज्ञा १८.५३९. ५. स्पर्शणे; शिवणे. पहा : **आतळणे**. ६. आटणे; सुकणे : 'तें बरव देखोंनि उचश्रवा आतला पाणी।' – रुस्वन ९०३. [सं.]

**आतताई–यी** वि. १. अपराधी; गुन्हेगार; खुनी; विष घालणारा, चोर, आगलाव्या, दुसऱ्याची जमीन बळकावणारा व दुसऱ्याची स्त्री हरण करणारा. या सहांपैकी एक. आततायी मनुष्याचे हे सहा प्रकार शुक्रनीतीत दिले आहेत: 'शुक म्हणे कुरुनंदना। यादव टेंकले आत्ममरणा। ते मारावया रामकृष्णा ।आततायी जाणा लोटले।'– एभा ३०.१५८. २. (ल.) साहसी; हेकट; परिणामाचा विचार न करता, स्वतःचे नुकसान होईल याची पर्वा न करता धाडस करणारा; अविचारी; मागचा पुढचा विचार न करता अनिष्ट, अनुचित कृत्य करणारा. ३. वाजवीपेक्षा अधिक आकांडतांडव करणारा. [सं.]

**आतनात** स्त्री. विपत्ती; अडचण; लाचारी : 'आमची आतनात पाहून आमच्या हातून निभावे असा विचार करून बालाजी रामचंद्र याची रवानगी करावी.'– ऐले ८१.

**आतप** पु. ऊन; सूर्याचा प्रकाश; उष्णता; ताप: 'सांगें वातवर्ष आतपु धरे।'– ज्ञा ५.११४. [सं.]

**आतपणे** अक्रि. तळपणे; चकाकणे: 'नाट्याकाशात सतत चाळीस वर्षे आतपत राहून आपल्या दिव्य कांतीने जनतेचे मनश्चक्षु दिपवून टाकणारा...' – गणपतराव अंक ३.८०.

**आतपत्र–आतपत्राण** न. छत्री किंवा अबदागीर; ऊन निवारण करण्याचे साधन : 'छत्रातपत्रचामरयुग्म। ध्वजीं उत्तम गरुडलांछन।' – एभा १५.१७३. [सं. आतप+त्र]

**आतपदग्ध** वि. (वै.) सूर्याच्या किरणामुळे–उन्हामुळे भाजलेले (त्वचा, डोळे इ.) [सं.]

**आतपमूर्च्छा** स्त्री. कडक ऊन किंवा हवेचा परिणाम शरीरातील मज्जातंतूंवर होऊन त्यामुळे हृदय व श्वसनेंद्रिये यांची क्रिया बिघडणे व त्याने मूर्च्छा व ताप येणे.

**आतपरोधक** वि. उन्हापासून रक्षण करणारे; उष्णता प्रतिबंधक. [सं.]

**आतपवारण** न. छत्री; आबदागीर.

**आतपविकार** उन्हाची तिरीप लागल्याने मूर्च्छा येणे.

**आतबट्टा** पु. १. निरनिराळ्या प्रकारच्या नाण्यांची अदलाबदल, देवघेव करताना मूळ रकमेत येणारी तूट; बाहेर बट्ट्याच्या उलट. २. नफा अपेक्षित असता नुकसान होणे; खोट; तोटा. ३. (ल.) बुडता धंदा : 'आंतबट्ट्याच्या या अजागळ सट्ट्याला आंधळ्या श्रद्धेची साक्ष आणि अनोळखी ईश्वराची जामिनकी.'– प्रेमसंन्यास.

**आतबट्ट्याचा** वि. नुकसान सोसून केलेला, चालविलेला.

**आतबड** न. आधवड; कच्चे कातडे. **पहा : अधोड**. 'बारा आतबडीचा जोडा'– ऐपो ५७.

**आतबोलाने घेणे** पहा : **अंतःक्रय करणे**

**आतमध्ये** क्रिवि. अंतर्भागात; आतल्या बाजूस.

**आतर** पु. उतारा; नावेतून नदी उतरून जाण्याचे भाडे; नोर: 'तुम्हींच मग आतरास्तव मला सुदीना विका'– केका २२. [सं. आतृ]

**आतरंगी** वि. अंतरी नाना कळा असलेला : 'त्यात बापू म्हणजे खूपच आतरंगी माणूस.' – बलुतं ४८.

**आतला** वि. आतील बाजूचा; अंतर्भागासंबंधी; मनातला; गुप्त. [सं. अंतर्]
**आतला** क्रि. 'आतणे'चा भूतकाळ.
**आतला आवाज** पु. अंत:स्फूर्तीने मिळणारी सूचना : 'गांधी बुद्धिवादापेक्षा आतल्या आवाजालाच प्राधान्य देत.'– विशि १२१.
**आतला नकाशा** पु. (भू.) नकाशातील विवक्षित भाग अधिक सविस्तर व मोठा करून दाखविण्यासाठी मोठ्या नकाशाच्या चौकटीच्या आत छोट्या चौकटीत काढलेला नकाशा.
**आतली खूणगाठ** स्त्री. मनातील गुप्त हेतू; मतलब.
**आतली चाल, आतचाल** स्त्री. एक मुहूर्त. (राजा.)
**आतली पाळ** स्त्री. काना च्या आतील कड–बाजू; मांसल भाग.
**आतल्या आत** क्रिवि. १. अंतर्भागात; आत; मध्ये. २. गुप्त रीतीने; मनातल्या मनात; मुकाट्याने. ३. आपआपसात; घरातल्या घरात; आपल्या मित्र मंडळीत. ४. बाहेर न दाखवता; लोकांना कळू न देता.
**आतल्याकडचा, कडला, कडील, धडचा** वि. आतल्या बाजूचा; आतील; मधील.
**आतल्या गाठीचा** वि. खोल मनाचा; आपले मनोगत प्रगट न करणारा; ज्याचे हेतू, बेत, गुप्त आहेत असा; गुप्त मसलत्या; कारस्थानी; मतलबी.
**आतवर–वार** न. स्वयंपाकघर; माजघर; घराचा मध्यभाग; याच्या उलट बाहेरवार. (कों.) [सं. अंतर् + वर्ती]
**आतश–ष** पु. अग्नि. [फा. आतिश]
**आतशखाना** पु. तोफखाना : 'किल्ल्यात अबदुल अहदखानाचे आतशखान्यांत रहावे.'– दिमरा १.८६.
**आतशबाज** वि. प्रेक्षणीय दारूकाम करणारा.
**आतशबाजी** स्त्री. १. अग्निक्रीडा; शोभेचे दारूकाम; दारूची लंका : 'रात्रीं नाच रोशनी आतशबाजी जाली ।' – मइसा ७.१४५. २. (ल.) चैन; करमणूक. [फा. आतिश्+बाजी]
**आतशबेहराम** पु. पारशी लोकांचे अग्निमंदिर. [फा.]
**आतस** स्त्री. आत; आत्या. (कों.) [सं. अत्ता]
**आतसवाई** स्त्री. नुकसान; तोटा. मूळ वस्तूची किंमत सवापट होऊन वाढ होण्याऐवजी उलटा प्रकार: 'त्याचा नेहमी आतसवाईचा धंदा.'– खेस्व १६५.
**आतळ** पु स्पर्श : 'जेथ बुद्धीचा विटाळु: नाहीं मनासि आतळु' – ऋव. ४६५.
**आतळणे** उक्रि. संसर्ग होणे; स्पर्श करणे; शिवणे; भेटणे: 'ते कर्मी तरी वर्तती । परी कर्मफळा नातळती ।'– ज्ञा २.२७८. पहा: **आतणे** २. पावणे; लाभणे: 'तुजहूनि शाल्व पवित्र भला । नाहीं अंबेसी आतळला ।'– मुसभा ११.४९. ३. धारण करणे; प्राप्त होणे : 'अगाध महोदधीचें जीवन । आतळे धवळ दुग्धवर्ण ।'– मुआदि ४.११०. [सं. आप्]
**आतंक** पु. १. भीती; दहशत; धाक : 'तयाच्या आतंकें द्विजतिलक तेथें चळवळी ।'– सारुह ७.२. २. रोग; व्याधी. ३. उत्सुकता; हौस. [सं.]
**आतंकनिग्रह** पु. व्याधिनाश; रोगहरण. [सं.]
**आतंकवादी** वि. दहशतवादी : 'माडखोलकर आतंकवादी तरुणांच्या वीरकर्मांनी मोहावले होते.'– एपिआ ९३.
**आता** क्रिवि. १. सांप्रत; सध्या; या वेळेस. २. यापुढे; चालू क्षणानंतर: 'आतां पारा कैसा सोधावा'– वैद्यक ७८. ३. ग्रंथ, विषय यांचे आरंभप्रतिज्ञेचे द्योतक.४. तर मग: 'मौन गा तुझें राशिनांव । आतां स्तोत्रीं कें भांजे हांव'– ज्ञा १७.१५.
**आताघटके** क्रिवि. या घटकेस; या वेळी. (ग्रा.)
**आताच** क्रिवि. इतक्यात; या क्षणाला; लगेच.
**आतार** पु. सुगंधी द्रव्य किंवा सामान. [फा. अतार्]
**आतारी** पु. अत्तरे विकणारा. [फा. इत्र]
**आतावेरी** क्रिवि. आतापर्यंत : 'तुम्हांला आतावेरी आठवतं का ?'– गांगा. २२५.
**आताशा–सा** अ. क्रिवि. यावेळी; हल्ली; सांप्रत; आजकाल; अलीकडे.
**आति** क्रि. होय; आहे: 'तुज सर्वज्ञा विचारितां धर्मे कांइ संसारा आति ।' – ऋ ४४. [सं. अस्ति]
**आतित्याई** वि. आततायी; अतिरेकी: 'गोविंदपंत आतित्याई फार आहे.' – चंद्रचूड १५८.
**आतिथ्य** न. अतिथीचा सत्कार, सन्मान, पूजन, आदर; पाहुणचार.[सं.]
**आतिथ्य, आतिथेय** वि. अतिथीला योग्य असे; पाहुण्यासंबंधी; आदरसत्कार; पाहुणचार या संबंधी.
**आतिथ्य भत्ता** पु. उच्चपदस्थांकडे भेटीसाठी येणाऱ्या मंडळींचा आदर सत्कार करण्याकरिता मंजूर केलेली ठरावीक रक्कम. मिळणारा पाहुणचार खर्च; खानपानखर्च.
**आतिथ्यविमुख** वि. आगत स्वागत न करणारा; पाहुणचार न करणारा. [सं.]
**आतिथ्यशील** वि. पाहुण्याचा योग्य तो आदरसत्कार करणारा; पाहुण्यांची बडदास्त ठेवणारा; आतिथ्यतत्पर. [सं.]
**आतिफत** कृपा; प्रसाद.
**आतिवाहिक** पु. (तत्त्व.) या लोकातून परलोकात घेऊन जाण्याचे काम करणारा; मृतात्म्याला नियतस्थानी घेऊन जाणारा देवविशेष. जीवाला एका कर्मफलातून दुसऱ्या कर्मफलात घालताना त्याला वाहून नेण्याचे साधन. [सं.]
**आतिस** पु. आग. पहा: **आतश**
**आती** वि. आर्त; त्रस्त : 'आती रक्षावेआं ।'– दाव ३३८. [सं. आर्ति]
**आती** स्त्री. आत; आत्या. (गो.)[सं. अत्ता]
**आतील** वि. १. आतील बाजूचा; मधील; अंतर्गत. २. गुप्त; अंतर्गृहातील. [सं. अंतर]
**आतील आख** पु. व्यापारी लोक मालावर किंमतीचा गुप्त आकडा घालतात तो, किंवा काही खूण. गुप्त या अर्थी.
**आतील करारनामा** पु. खाजगी रीतीने घेतलेली वचनचिठ्ठी, करार.
**आतील जामिनकी** स्त्री. आतील जामीनदाराचे काम, धंदा.
**आतील जामीनदार** पु. सरकारी रीतीने किंवा उघड रीतीने जामीनदार झालेल्यास आतून जामीन राहणारा किंवा त्याला हमी देणारा.
**आतील टांग** स्त्री. (मल्लविद्या.) प्रतिस्पर्ध्यास चीत करण्याचा कुस्तीतील एक डाव.

**आतील भोक** न. गुप्त गोष्ट; एखाद्या गोष्टीतील व्यंग, छिद्र, दोष, रहस्य.
**आतील मजकूर** पु. १. (पत्रातील) वृत्तान्त. २. (ल.) मनातील गुप्त हेतू.
**आतील रोग** पु. १. गुप्त रोग. २. (ल.) जुलूम, दुर्बलता, ऱ्हास इ. चे अंतस्थ, गुप्त कारण.
**आतीव्र** न. रासायनिक धातुमूलद्रव्य (दुर्मिळ मृत्तिकाधातुवर्गातील.)
**आतुटी** अ. अखंड; पहा : **अतूट** : 'चंद्र चकोरा चोखटीं । वोळे अमृतधारीं आतुटी ।'– ऋ. ५२. [सं. अ+त्रुट्]
**आतुडणे** अक्रि. १. सापडणे; स्वाधीन होणे : 'कटकटा क्षुद्र मंडळातु आंतुडलों ।'– पंचतंत्र १.३९. २. (ल.) आकलन होणे; समजणे : 'माझें मजचि वो आतुडलें गुज ।' – निगा ७४. ३. लागणे; प्राप्त होणे; हाती येणे : 'न करितां भगवद्भक्ति । सज्ञानहि नातुडे मुक्ती ।'–एभा ३.१८६. ४. संबंध येणे; निकट येणे; स्पर्शणे : 'मां साक्षात तुं शामसुंदर । आंतुडलासी कीं ।'– रास पं. १.१०३२. ५. अडकणे.
**आतुणे** सक्रि. देणे : 'प्रसन्न होऊनि वरदानास । साबरी विद्या आतुली ।'– नव ७.३. [सं. आप्]
**आतुर** वि. १. उत्सुक; उतावीळ; उद्युक्त: 'बहुतकरूनि कौरव हे आतुर दुस्वभाव ।' –ज्ञा १.१७२. २. आर्त; विव्हळ; व्यथित; पीडलेला; दुखणाईत : 'बाळक, वृद्ध, आतुर जन । न करितां स्नान दोष नाहीं ।' –एभा २१.१२२. [सं.]
**आतुरता** स्त्री. विशेष उत्सुकता; घाई.
**आतुरसंन्यास** पु. मरणसमयी घाईघाईने घेतलेला संन्यास; केवळ प्रेषोच्चारादिक विधी करून घेतलेला संन्यास. [सं.]
**आतुराय** वि. आतुर; अधीर; उत्सुक. (गो.) [सं. आतुर]
**आतुल** वि. आतील; आतील बाजूचा; अंतर्गत; मधील: 'परि तया आंतुल नव्हे हे देवा ।' – ज्ञा ११.३८८. [सं. अंतर]
**आतुवट, आतुवटे** वि. आतील; अंतरंगातील : 'मी देव तो भक्तशुद्ध । हा बाहेरी नांवाचाचि भेद । आंतुवट पाहतां बोध । सच्चिदानंद जनि ऐक्यें ।' – एभा २१.४७१.
न. अंतरंग हृदगत; गुप्त, गुह्य गोष्ट : 'हें आंतुवट तुज वर्म । दाविजत असे ।' – ज्ञा ८.२०३. [सं. अंतर्+वर्ती]
**आतू** स्त्री. आत; आत्या; आत्याबाई; बापाची बहीण. [सं. अत्तिका.]
**आतून** शअ. क्रिवि. आतल्या बाजूने; अंतर्भागापासून; बाहेरूनच्या उलट. (वा.) **आतून पाय ओढणे, मोडणे–** एखादे कृत्य करीत असता दुसऱ्याने त्यास गुप्तपणे विरोध, प्रतिबंध करणे : 'नानांचे पाय आंतून ओढण्याचा विसूभाऊंचा यत्न होता.'– अस्तंभा ११२. **आतून पाय काढणे–** (मल्लविद्या) जोडीदार आपल्या पाठीवर आपणास धरतो त्या वेळेस आपण खाली वाकून आपल्या दोन्ही पायांतून त्याचे पाय काढून घेणे, ओढणे.
**आतृप्त–तृप्ति** क्रिवि. तृप्ती होईपर्यंत; शांत होईपावेतो. [सं.]
**आते** क्रि. १. आहे : 'हां ही हातपिटी खेळती आते । जगजेठींसीं ।'– शिव ६८९. २. होते; असते; बनते : 'पाणी बुडऊं ये मिठातें । तंव मीठचि पाणी आतें ।' –ज्ञा १६.७२. ३. येतो; प्राप्त होतो : 'जयाचेनि अपांगपातें । बंध मोक्षपणीं आते ।'– अमृ २.४. [सं. अस्ति]
**आतेगवर–आतेगौरव–चीर–वाण–मान–पुन** १. वरपक्षाकडून वधूच्या आत्याला मिळणारे मानाचे लुगडे–चोळी. २. अशा प्रकारे दिलेला मान किंवा मानाची रीत, प्रकार.
**आतेदीर** पु. नवऱ्याचा आतेभाऊ.
**आतेबहीण** स्त्री. आत्याची मुलगी या नात्याने बहीण.
**आतेभाऊ** पु. आत्याचा मुलगा या नात्याने भाऊ.
**आते मामे भावंडे** न. भावाची मुले ती बहिणीच्या मुलांची मामेभावंडे व बहिणीची मुले ती भावाच्या मुलांची आतेभावंडे होत.
**आते** न. आतडे. [सं. अन्त्र.]
**आतेस** स्त्री. आत्याबाई. (कों.)
**आतेसासरा** पु. १. सासऱ्याचा आतेभाऊ. २. आतेसासूचा, सासऱ्याच्या बहिणीचा नवरा.
**आतेसासू** स्त्री. सासऱ्याची बहीण; नवऱ्याची किंवा बायकोची आत्या.
**आतोजी** स्त्री. सासू. (कों.) [का. आते]
**आतोबा** पु. आत्याचा नवरा.
**आतौत** शअ. आत; मध्ये : 'तरंग समुद्रा आतौता । म्हणे माझेनि मेघ तत्त्वतां ।'– एभा २.३८८. [सं. अंतर्+वर्ती]
**आतौनि** क्रिवि. भरदारपणे: 'घुमरीसी उठी येके वेळे: भार आतौनि पिके'– मूप्र १७९२.
**आत्काटी** स्त्री. आडकित्ता. (गो.)
**आत्ता** ('आता'चे, 'ता'वर आघात आल्याने होणारे रूप); या क्षणापर्यंत; या क्षणी.
**आत्ताच्या आत्ता** क्रिवि. ताबडतोब; वेळ मुळीच न घालवता.
**आत्म** वि. १. आत्म्यासंबंधीचे; ब्रह्मासंबंधी. २. स्वतःचे; आपले. [सं.]
**आत्मक** वि. (नेहमी सामासिक शब्दांत उपयोग) च्या वस्तूने बनलेले, भरलेले, पूर्ण; तत्स्वरूपी, तन्मय आत्मा असणारे. सामा. शब्द– गुणात्मक, भावात्मक, पापात्मक, ध्वन्यात्मक इ. [सं.]
**आत्मकठोर** वि. स्वतःशी कठोर असलेला; स्वतःच्या तत्त्वाशी कठोरपणे प्रामाणिक असलेला : 'व्रत आत्मकठोरपणे पाळले होते.' – किरि. १४.
**आत्मकथा** स्त्री. स्वतःच्या जीवनाची कहाणी.
**आत्मकार्य** न. आपले काम; स्वतःचे काम.
क्रिवि. आपल्या खासगी कामाकरिता; व्यापारी लोकांच्या पत्रव्यवहारात, कागदपत्रात हा शब्द येतो. [सं.]
**आत्मकेंद्रित** वि. स्वयंकेंद्रित; स्वतःभोवती गुरफटलेले; फक्त स्वतःचा विचार करणारे; स्वतःला सर्वस्व मानणारा; इतरांचा विचार न करणारा : 'जे घडत आहे.... ते.... पूर्णतया आत्मकेंद्रित आहे.'– भाप्र १९५.
**आत्मक्लेश** पु. स्वतःला होणारा त्रास, वेदना, दुःख. [सं.]
**आत्मखंडन** न. स्वतःच स्वतःच्या विरुद्ध बोलणे; प्रथमार्थाचे दुसऱ्या अर्थाने खंडन करणे; प्रथम एक विधान करून लागलीच त्याच्या विरुद्ध बोलणे. [सं.]
**आत्मगत** न. स्वगत; नाटकात एखाद्या पात्राने स्वतःशी केलेले भाषण.
**आत्मगति–ती** स्त्री. १. आत्म्याची अखेरची अवस्था. २. आपली

अखेर: 'प्रिये आत्मगति यांची दिसताहे ।' – सप्र १३.१४.

**आत्मगौरव** पु. आपण बडे आहोत ही भावना; आपला मोठेपणा लोकांनी मान्य करावा ही भावना: 'प्रत्येक माणसात आत्मगौरवाची भावना असते.'– न्यूगं ७९. [सं.]

**आत्मग्रह** पु. १. आत्मज्ञान. २. स्वीकार करणे; स्वत:चे मानणे; आपला म्हणणे; कैवार घेणे.

**आत्मघात** पु. १. आत्महत्या. (धर्मशास्त्रविहीत प्राणत्यागास हा शब्द लावीत नाहीत). २. स्वत:चा घात, नुकसान, हानी. [सं.]

**आत्मघातक–की, आत्मघाती** वि. १. स्वत:चा घात करणारा. २.(ल.) स्वत:चे नुकसान करून घेणारा; स्वत:च्या पायांवर धोंडा पाडून घेणारा. [सं.]

**आत्मघ्न** वि. १. आत्महत्या करणारा; स्वत:चा नाश करणारा. २. आत्मघातकी. [सं.]

**आत्मचरित्र** न. एखाद्याने स्वत: लिहिलेली स्वत:ची जीवनकथा. [सं.]

**आत्मचर्चा** स्त्री. आत्म्यासंबंधी वादविवाद; अध्यात्माविषयी चर्चा; ब्रह्मविचार; आत्मानात्मविचार. [सं.]

**आत्मच्छाया** स्त्री. स्वत:ची सावली : 'कां कवळिलिया न धरे । आत्मच्छाया ।।'– ज्ञा १८.५३०. [सं.]

**आत्मज** पु. स्वत:चा मुलगा, पुत्र : 'पैल इतरू हा आत्मजु । हें उरेल के ।'– ज्ञा ५.९३.

**आत्मजवारस** पु. स्वत:चा वारस, अपत्य.

**आत्मजा** स्त्री. स्वत:ची मुलगी : 'अगा आत्मजेच्या विषी ।' – ज्ञा १२.१३२. [सं.]

**आत्मजिज्ञासु–सू** वि. आत्मज्ञानाची इच्छा करणारा; ब्रह्मज्ञानाची इच्छा असणारा : 'ऐसे आत्मजिज्ञासु जे होते ।'– ज्ञा १६.५२.

**आत्मतत्त्व** न. ब्रह्मज्ञान; आत्मज्ञान; ब्रह्म : 'येर आत्मतत्त्व उदासीन'– ज्ञा १८.३०६. [सं.]

**आत्मतोख–तोष** पु. आत्मानंद; स्वसंतोष.

**आत्मत्याग** पु. १. स्वार्थत्याग : 'हा आत्मत्याग व लोकाश्रय सरकारचे गुप्त हेतू पर्यायानें सिद्धीस नेण्यास जर उपयोगी पडला.' – लोटिकेले ३.१८२. २. आत्मार्पण; आत्मसमाप्ती; (ल.) देहविसर्जन; देहत्याग. [सं.]

**आत्मत्व** न. १. आत्मस्वरूप: 'न लगती तपें व्रतें अनुष्ठान । आत्मत्वाची खूण वेगळीच'–ब गाथा १७९. २. ममता. [सं.]

**आत्मदर्शन** न. (मानस.) स्वत:विषयीचे योग्य ज्ञान; स्वत:कडे त्रयस्थाच्या दृष्टिकोनातून पाहणे. [सं.]

**आत्मदहन** न. मागणी पदरात पाडून घेण्यासाठी स्वत:ला जाळून घेणे.

**आत्मधन** न. १. स्वत:ची संपत्ती. २. स्वत:चा आत्मा; स्वत: . ३. (ल.) स्वत:चा पुत्र.

**आत्मधृति संपत्ती** स्त्री. स्वत:च्या मालकीची, बोजा नसलेली संपत्ती.

**आत्मनिग्रह** पु. स्वत:वर नियंत्रण, ताबा.

**आत्मनिरीक्षण** न. स्वत:च्या वर्तनाची, गुणदोषांची चिकित्सा, सूक्ष्मपरीक्षा, मूल्यमापन. [सं.]

**आत्मनिर्भरता** स्त्री. स्वावलंबन; स्वत:च्या पायावर उभे असणे.

**आत्मनिवेदन** न. १. आत्मसमर्पण; परमेश्वराच्या ठिकाणी स्वत:स वाहून घेणे; नवविधाभक्तीतील शेवटचा– नवव्या भक्तीचा प्रकार : 'आत्मनिवेदनाचें लक्षण । आधीं पाहावे मी कोण । मग परमात्मा निर्गुण । तो वोळखावा ।'– दास ८.८. १२. २. स्वत:ची कथा, खुलासा; आत्मचरित्र; आपले म्हणणे मांडणे; स्वत:बद्दल सांगणे: 'परंतु काव्याचे क्षेत्र... कवीचे आत्मनिवेदन असते.' – मक १०.

**आत्मनिष्ठ** वि. १. आत्मस्वरूपी तल्लीन असलेला; आत्मानंदी, ब्रह्मानंदी निमग्न असलेला. २. मनोभावाचा; कळकळीचा; उत्सुक. ३. आपली मते व भावना यांना प्राधान्य देणारा; आपल्या भावनांशी, आवडीनिवडींशी प्रामाणिक असलेला. ४. वस्तूपेक्षा व्यक्तीच्या अंतरंगाशी, विचारांशी संबंधित असलेला. वस्तुनिष्ठच्या उलट. [सं.]

**आत्मनिष्ठ दृष्टिकोन** पु. (समाज.)स्वत:च्या भावभावना, विचार यांच्या अनुषंगाने एखाद्या गोष्टीकडे पाहण्याची पद्धत.

**आत्मनिष्ठ मूल्य** न. स्वत:च्या भावभावना, विचार, यांच्याशी प्रामाणिक असणे; आपल्या मनाचा कौल प्रमाण मानणे. [सं.]

**आत्मनिंदा** स्त्री. स्वत:ची निंदा; स्वत:स दोष देणे; पश्चात्तापाने स्वत:वर दोषारोप करणे. [सं.]

**आत्मपरिचय** पु. आत्म्याविषयीचे किंवा स्वत:विषयीचे ज्ञान; स्वत:ची ओळख. [सं.]

**आत्मपरिभवव्यथा** स्त्री. स्वत: स्वत:वर काही बंधने घालून घेतल्यामुळे होणाऱ्या यातना किंवा येणारा कंटाळवाणेपणा. [सं.]

**आत्मपरिरक्षण** न. (समाज.) स्वत:ची सुरक्षितता राखण्याचा प्रयत्न; संकटापासून स्वत:चे संरक्षण करण्याची माणसाची सहजप्रवृत्ती. [सं.]

**आत्मपरीक्षण** न. स्वत:कडे चिकित्सकपणे पहाणे; स्वत:चे गुण, दोष, उणिवा इ. बाबत विचार करणे. [सं.]

**आत्मपीडानंद** पु. (वै.) स्वत:ला होणाऱ्या शारीरिक अथवा मानसिक वेदनांतून आनंद उपभोगण्याची प्रवृत्ती. एक मानसिक विकृती. [सं.]

**आत्मपोटी** वि. आप्पलपोट्या; स्वार्थी : 'तव भीम म्हणे श्रीकृष्णासी । तूं बरवा आत्मपोटी कळलासी । मी अतिथी उभा असता द्वारासी । भोजन सावकाश करिसी तूं ।'– जै १०.२.

**आत्मप्रगटन** न. (मानस.) आत्माविष्कार; स्वत:च्या विचार, भावनांना मूर्तरूप देणे.

**आत्मप्रचीति–ती** स्त्री. १. आत्मज्ञान; स्वप्रतीती, गुरुप्रतीती, आत्मप्रतीती या तीन प्रतीतींपैकी एक. २. स्वत:च्या अनुभवावरून मिळवलेले ज्ञान, बोध; आत्मानुभव: 'नाना ग्रंथांच्या समती । उपनिषदें वेदांत श्रुती । आणि मुख्य आत्मप्रचीती । शास्त्रेंसहित ।'– दास १.१५. [सं.]

**आत्मप्रत्यय** पु. स्वत:बद्दल विश्वास; स्वत:च्या सामर्थ्याची जाणीव. [सं.]

**आत्मप्रशंसा** स्त्री. स्वत:ची स्तुती; आत्मस्तुती. [सं.]

**आत्मप्रसाधन** न. स्वत:चा मोठेपणा मिरवणे; स्वत:स भूषवणे: 'श्रीमंती व राज्याधिकार यामुळें मनुष्याचें आत्मप्रसाधन होण्याला कितीतरी पट अधिक साहाय्य मिळेल यात काय संशय आहे?' – के ८.१२.३६. [सं.]

**आत्मप्रक्षेपण** न. आपल्या विचारांचे प्रतिबिंब दुसऱ्या गोष्टीत पाहणे.

**आत्मप्राप्ति–प्ती** स्त्री. १. आत्मज्ञान; ब्रह्मज्ञान. २. देव, आत्मतत्त्व आणि आपण यांचे ज्ञान होणे. [सं.]

**आत्मप्रौढी** स्त्री. स्वत:बद्दल मोठमोठ्या गप्पा मारणे; फुशारकी मारणे; बढाया मारणे : 'आत्मप्रौढी किंवा बढाईखोरपणा हे न्यूनगंडाचे एक लक्षण आहे.'– न्यूगं ६२. [सं.]

**आत्मबंधु–धू** पु. स्वत:चा नातेवाईक; चुलत – आते – मामेभाऊ इ.[सं.]

**आत्मबिंब** न. १. प्रतिबिंब : 'का आत्मबिंबा घेतलें । बाळकें जळीं ।'– ज्ञा १८.१३०६. २. (ल.) जीवात्मा (परमात्म्याचे प्रतिबिंब). [सं.]

**आत्मबुद्धि–द्धी** स्त्री. एखाद्याचे स्वत:चे ज्ञान, जाणीव; स्वत: लावलेला स्वत:चा शोध, विचार. [सं.]

**आत्मबोध** पु. ब्रह्मज्ञान; आत्मज्ञान : 'मग सत्त्वें चोखाळें । उघडती आत्मबोधाचे डोळे ।' – ज्ञा १८.२१०. [सं.]

**आत्मभान** न. १. स्वत:च्या गुणांची, हक्कांची, परिस्थितीची जाणीव. २. स्वत्त्व, स्वाभिमान याबद्दलची जागरूकता. [सं.]

**आत्ममानी** वि. स्वत:च्या मोठेपणाची किंवा आत्मसन्मानाची ज्याला योग्य जाणीव आहे असा; स्वत:ची योग्यता जपणारा.

**आत्मयज्ञ** पु. आत्माहुती देणे; स्वार्थत्याग; जीविताचे बलिदान; स्वत:हून मरणाला तयार होणे. [सं.]

**आत्मरत** वि. स्वत:तच मग्न असलेला; स्वत:शीच रममाण होणारा.

**आत्मरक्षण** न. स्वसंरक्षण; स्वत:स जपणे. [सं.]

**आत्मराज** पु. आत्मा; स्वत:; आत्मतत्त्व : 'तेथे न सुवावा अभंगी । आत्मराजु ।' –ज्ञा १८.२८०.

**आत्मरूप** न. स्वस्वरूप : 'जयजय स्वसंवेद्या आत्मरूपा ।'– ज्ञा १.१.

**आत्मलक्षी** वि. जास्तीत जास्त व्यक्तिगत पातळीवर असलेला : 'कविता मात्र अधिक उत्कटतेने आत्मलक्षी होत चालली आहे.' – छांदसी ७. स्वत:च्या अनुभूतीवर विसंबणारा; स्वानुभवाशी एकनिष्ठ असलेला.

**आत्मलक्षीपणा** पु. (मानस.) एक वर्तन समस्या; स्वत:च्या अडचणीत गुरफटून जाऊन घुमे व एकलकोंडे होणे.

**आत्मलाभ** पहा: **आत्मप्राप्ती**

**आत्मलिंग** न. १. आत्मस्वरूप : 'पैं तुझी आण वाहणें । हें आत्मलिंगातें शिवणें ।'– ज्ञा १८.१३६९. २. शिवाचे मुख्य लिंग (प्रतीक). शंकराने आपल्या भक्तासाठी आत्मस्वरूपाचा तत्त्वांश मूर्त करून ठेवला आहे. कैलासावरील शिवलिंग. ३. अत्यंत जिवलग मनुष्य; प्रेमाचे माणूस : 'रघुनाथराव यांचे पूर्वज विठ्ठल शिवदेव हे आमचे दादासाहेबांचे आत्मलिंग होते.'– तीप्र ८२. [सं.]

**आत्मवत** वि. आपल्याप्रमाणे; स्वत:सारखे; आपपरभाव न ठेवता.

**आत्मवश** पु. स्वत:वर ताबा ठेवणे; मनोनिग्रह; आत्मनिग्रह; आत्मसंयमन.

**आत्मवंचना** स्त्री. स्वत:ची फसवणूक; स्वत:शी प्रतारणा. [सं.]

**आत्मविचार** पु. आत्म्यासंबंधी चर्चा; ब्रह्मविचार. [सं.]

**आत्मविद्या** स्त्री. १. ब्रह्मविद्या; अध्यात्मविद्या; वेदान्त. २. आत्मज्ञान; स्वत:संबंधी जाणीव. [सं.]

**आत्मविधि–धी** पु. आत्म्याचे कर्तव्य; गुणधर्म.

**आत्मविश्वास** पु. (मानस.) स्वकर्तृत्वाचा भरवसा; स्वत:संबंधीचा योग्य असा विश्वास, खात्री. [सं.]

**आत्मवृत्त** न. आत्मचरित्र; स्वत:विषयीचा वृत्तान्त, माहिती. [सं.]

**आत्मवेत्ता** पु. ज्याला स्वस्वरूपाची पूर्ण ओळख झाली, स्वहृदयात वास करणारा ब्रह्मांडव्यापी परमात्मा आपण आहो असा ज्याच्या बुद्धीचा निर्धार झाला तो; मी ब्रह्म आहे असे मानणारा. [सं.]

**आत्मव्याघात** पु. १. (सास.) स्वत:चे विधान स्वत:च खोडून टाकणे; स्वविरोध. २. विसंवाद. ३. परस्परविरुद्ध कथन. ४. असंगती.[सं.]

**आत्मशास्त्र** न. अध्यात्मविद्या शास्त्र. [सं.]

**आत्मशुद्धि–द्धी** स्त्री. १. चित्तशुद्धी; स्वत:चे आचारविचार, वर्तन शुद्ध ठेवणे; स्वत:ला निर्दोष करणे. २. आत्म्याची शुद्ध अवस्था. [सं.]

**आत्मसत्ता** स्त्री. ब्रह्मज्ञान; आत्मस्वरूप : 'तैसें होईजे जाईजे देहें । ते आत्मसत्ते अविक्रये ।'– ज्ञा १५.३८०. [सं.]

**आत्मसमर्पक प्रवृत्ति–त्ती** स्त्री. दुसऱ्याच्या हितासाठी स्वत:चे सर्वस्व देण्याचा मनाचा कल.

**आत्मसमर्पण** न. (राज्य.) शरणागती; शरण जाणे. [सं.]

**आत्मसमीक्षा** स्त्री. स्वत:च्या आचारविचारांवर टीका करणे; स्वत:चे गुणदोष तपासणे. [सं.]

**आत्मसंतुष्ट** वि. स्वत:बद्दल, स्वत:च्या कृतीबद्दल समाधानी असलेला; स्वत:वर खूष असणारा; आहे त्यावर संतोष मानणारा. [सं.]

**आत्मसंतुष्टता** स्त्री. १. आत्यंतिक तृप्तीची, विशेषत : स्वार्थप्रेरित तृप्तीची भावना. २. आहे तेवढ्यात संतोष मानण्याची वृत्ती. [सं.]

**आत्मसंतोषाने** क्रिवि. राजीखुशीने; कोणाची भीड न धरता; आपखुषीने.

**आत्मसंतोषी** वि. १. आत्मानंदात सुख मानणारा. २. (ल.) आपमतलबी.

**आत्मसंभव** पु. १. पुत्र. २. मदन.

**आत्मसंयम** पु. स्वत:च्या भावनांवर, विचारांवर असलेला ताबा.[सं.]

**आत्मसंयमन** न. स्वत:चे मन स्वत:च्या ताब्यात ठेवणे. [सं.]

**आत्मसात करणे** क्रि. १. आपलेसे करणे; आपल्या कामी लावणे; बळकावणे स्वत:च्या ताब्यात घेणे; एखादा विचार, तत्त्व वगैरे पचवणे. २. अभ्यासाने एखादी विद्या अवगत करणे; पांडित्य संपादणे; प्रभुत्व मिळवणे. ३. स्वस्वरूप करणे; आपणाशी एकरूप करणे.

**आत्मसाधन** न. १. आपल्या जीवाचे किंवा जन्माचे सार्थक; स्वत:च्या उपजीविकेची व्यवस्था, तरतूद. २. (ल.) स्वत:चा मतलब; स्वार्थ.[सं.]

**आत्मसाक्षात्कार** पु. निर्गुण साक्षात्कार (सगुण साक्षात्काराच्या उलट); अंतर्यामी परमेश्वर याचे दर्शन. आत्मा हेच ब्रह्म ही जाणीव. [सं.]

**आत्मसुख** न. १. स्वत:चे (शारीरिक किंवा मानसिक) सुख; आपल्या ठिकाणीच सुख. २. ब्रह्मज्ञानापासून होणारे सुख.

**आत्मसोय** स्त्री. आत्मज्ञानाचा मार्ग : 'पाहे पां केवळ आत्मसोये'– नाम १८१२.

**आत्मस्थिति–ती** स्त्री. ब्रह्मस्वरूपाची स्थिती; आत्म्याची स्वतंत्र अवस्था; शरीर किंवा इतर वस्तू यांहून भिन्न अशी अलिप्त स्थिती. (क्रि. ओळखणे, जाणणे, संपादणे, जोडणे, धरणे). [सं.]

**आत्महत्या** स्त्री. १. (कायदा) धर्म आणि न्याय यांनी निषिद्ध मानलेल्या मार्गाने स्वत:च्या मरणास कारण होणे; हेतुपुरस्पर स्वत:चा जीव स्वत:

देणे; जीव देणे; आत्मनाश; आत्मघात. धर्मशास्त्राप्रमाणे आत्महत्या हे पाप असून कायद्याने तो गुन्हा ठरविला आहे. [सं.]

**आत्महत्यारा** वि. आत्मघाती; स्वत:चा नाश करणारा : 'जो आपला आपण घातकी । तो आत्महत्यारा पातकी ।' – दास १७.७.१०.

**आत्महा** वि. पु. स्वत:स मारणारा : 'तो आत्महापासौनि देखिया : महातामसु'– ज्ञाप्र. २२५. [सं.]

**आत्महित** न. १. (ईश्वरप्राप्तीने होणारे) जीवाचे कल्याण; उद्धार; देहाचे सार्थक; भगवत्प्राप्ती. २. स्वत:चा फायदा; स्वहित. [सं.]

**आत्मज्ञ** पहा: **आत्मज्ञानी**

**आत्मज्ञान** न. १. ब्रह्मज्ञान; स्वस्वरूपाचे ज्ञान; अध्यात्म ज्ञान; 'ज्ञान म्हणजे आत्मज्ञान । पाहावें आपणांसि आपण ।'– दास ५.६.१. २. स्वत:च्या वर्तनाची जाणीव; स्वत:च्या विचार-विचारांचे ज्ञान. [सं.]

**आत्मज्ञानी** पु. स्वत:चा आत्मा व ब्रह्म यामधील संबंधाची जाणीव असणारा; याविषयीचे ज्ञान असणारा. [सं.]

**आत्मंभरी** वि. अप्पलपोट्या; पोटभरू.

**आत्मा** पु. १. ज्यामुळे शरीर जिवंत राहते पण ज्याला शरीरापलीकडे स्वतंत्र अस्तित्व असते असे अपार्थिव व अगोचर तत्त्व; आदितत्त्व; निराकार,अमर्त्य परमात्मा. २. सर्व विश्वात भरलेले चैतन्य; परब्रह्म. ३. ज्यामुळे स्वत:च्या भिन्नपणाची जाणीव होते असे तत्त्व; चैतन्य; प्राण. ४. मी, स्वत: याबद्दल वापरण्यात येणारा शब्द. ५. स्वभाव, प्रकृती; अंत:करण. ६. देह.७. बुद्धी; समजशक्ती. ८. ज्याला विचार, भावना, इच्छाशक्ती आहेत असे आध्यात्मिक व्यक्तिमत्त्व : 'माझा आत्मा असा आरसा । पाहो जन त्यामाजि तुला ।'– उसं २८१.[सं.]

**आत्मा** पु. (पिंजारी व्यव.) कापूस पिंजण्याच्या कमानीच्या पंख्याच्या कडेवर असलेल्या चामड्याच्या पट्टीच्या आत बसवलेली कातड्याची घोडीवजा घडी केलेली पट्टी. हिने कमानीस असलेली तात ताणून अधिक आवाज निघतो.

**आत्मानंद** पु. विषयसुखापासून चित्त आवरून परमात्म्याचे ध्यान केल्याने होणारे समाधान. ब्रह्मज्ञानापासून होणारा आनंद; आत्म्याची जाणीव झाल्यामुळे लाभणारे सुख. भारतीय तत्त्वज्ञानात आनंद हा आत्म्याचा एक घटक मानला आहे. पहा: **आनंद** [सं.]

**आत्मानात्मविचार** पु. देहाच्या ठायी शुद्ध निर्विषय जो ज्ञानांश तो मात्र मी, इतर देहादिक ते अनात्मा म्हणजे मी नव्हे असा विचार; आत्मा आणि अनात्मा या संबंधी विचार. [सं.]

**आत्मानुभव** पु. १. आत्म्याचा परिचय; आत्मज्ञान; ब्रह्मज्ञान : 'तेथें आत्मानुभव बोलिजे कैसा कवण परि ।' २. आत्मप्रतीती; योगप्राप्त समाधी; प्रतिष्ठितप्रज्ञता; जीवन्मुक्ती. ३. आत्म्याच्या व परमात्म्याच्या ऐक्याचा अनुभव. ४. स्वत:ला आलेला, स्वत: घेतलेला अनुभव.

**आत्मानुभूति-ती** स्त्री. (समाज.) स्वत:ची योग्य ती ओळख; स्वत:च्या सामर्थ्याची स्वयंप्रेरणेने झालेली जाणीव. [सं.]

**आत्मानुशासन** न.(समाज.) स्वत:च स्वत:वर लादून घेतलेले बंधन; स्वयंशिस्त. [सं.]

**आत्मानुसंधान** न. १. परमार्थविषयक सत्याकडे, आत्मज्ञानाकडे लागलेले लक्ष. २. (ल.) अप्पलपोटेपणा. [सं.]

**आत्माभिव्यक्ति-क्ती** पहा: **आत्माविष्कार**

**आत्माराम** पु. १. आत्मा; जीव; अंत:करण.२. विषय-पराङ्मुख व ईश्वराराधनेविषयी तत्पर; आत्मानंद लाभलेला; स्वसंतुष्ट. ३. परमेश्वर; परब्रह्म : 'आत्मारामाचेनि विरहें । जेयां जीवीतु न साहे.'– ऋ ६.

**आत्मार्पण** न. १. एखाद्या गोष्टीसाठी स्वत:ला ईश्वरास वाहून घेणे. स्वत:चा प्राण देणे. २. आत्मसमर्पण; शरणागती; शरण जाणे.[सं.]

**आत्माविष्कार** पु. (सास.) निरनिराळ्या कला, साहित्य व सर्जनशील माध्यमे या द्वारा आपल्या भावना, अनुभव, आपले व्यक्तिमत्व प्रगट करणे; आत्मप्रगटीकरण. [सं.]

**आत्माश्रयदोष** पु. (तर्क.) अन्योन्याश्रय दोष; एखादी गोष्ट सिद्ध करण्यासाठी त्याच गोष्टीचा आधार घेण्याचा तर्कदोष.

**आत्माहुति-ती** स्त्री. तत्त्वासाठी स्वत:च्या प्राणाचे बलिदान. [सं.]

**आत्मिक, आत्मीय** वि. १. स्वकीय; आपले नातलग; सोयरेधायरे : 'आणि मी अर्जुन हे आत्मिक ।।' – ज्ञा १८.१२८२. २. स्वत:संबंधीचे; स्वत:चा, जवळचा संबंध असलेला; विश्वासू (मनुष्य). आपल्या पक्षाचा, आपला हितचिंतक (मनुष्य, नातलग) : 'खबर द्यावयाची कारण जे आमचा आत्मिक राजपुरीस आहे त्यांही सांगोन पाठविले.'– पेद २३.२२६. [सं.]

**आत्मिक सहजप्रवृत्ति** स्त्री. उपजत अहंकार प्रवृत्ती.

**आत्मीभाव** पु. (तत्त्व.) १. आत्मस्वरूपी लीन होण्याची अवस्था. २. स्वस्वरूपी तन्मय होण्याची स्थिती. [सं.]

**आत्मीयता** स्त्री.आपलेपणा; जवळीक : 'कशाचीच आत्मीयता वाटत नव्हती.' – पुत्र ३८. [सं.]

**आत्मोन्नति-ती** स्त्री. स्वत:चा उत्कर्ष; स्वत:ची प्रगती; स्वत:मध्ये केलेली सुधारणा. [सं.]

**आत्मोपासना** स्त्री. ध्यान करून परमेश्वराची उपासना करणे. [सं.]

**आत्मौपम्य** न. १. परब्रह्मस्वरूपाशी एकरूपता २. आत्म्याशी, आपल्याशी ऐक्य; आपपरभाव नसणे. [सं.]

**आत्मौपम्यबुद्धि-द्धी** स्त्री. सर्वत्र आपल्यासारखी बुद्धी; सर्वत्र आत्मतत्त्व असल्याची बुद्धी : 'सर्वांभूती एक आत्मा किंवा आत्मौपम्य बुद्धी या तत्त्वानें व्यावहारिक नीतिधर्माची जशी उपपत्ती लागते, तशी दुसऱ्या कोणत्याच तत्त्वानें लागत नाहीं.'– गीर ३८२. [सं.]

**आत्यंतिक** वि. १. अतिशय; फार; तीव्र; पराकाष्ठेचा: 'रायें पुसिलें आत्यंतिक क्षेम । तदर्थीं कवि ज्ञाता परम ।'– एभा २.२७७.२. शेवटचा; निर्वाणीचा. [सं.]

**आत्यंतिक प्रलय** पु. १. ब्रह्माशिवाय इतर सर्व वस्तुमात्रांचा नाश. २. मोक्ष प्राप्त झाल्यावर सर्व जगाचा भासणारा अभाव. मोक्षप्राप्तीसाठी चार प्रलय आहेत. निद्रा व मरण हे दोन पिंडीचे आणि कल्प व महाकल्प हे दोन ब्रह्मांडीचे असे चार प्रलय. पण यात जीवास मुक्ती नाही. म्हणून हा पाचवा आत्यंतिक प्रलय कल्पिला आहे. हा मुक्तिप्रद आहे. [सं.]

**आत्या** स्त्री. बापाची बहीण; काही लोक आत्ती म्हणतात. [सं. अत्ता]

**आत्याती** स्त्री. आततायीपणा.

**आत्याबाई** स्त्री. १. बापाची बहीण; आत. २. सासू.(काही ठिकाणी

आत्या सासू होते) : 'तंव सत्यभामा म्हणे आत्याबाई । तुम्हासी तरी म्हणावें काई । तुम्ही कां म्हणवितां यांची आई । केवीं उदरीं धरिलें हो ।।' – जै ९.७२.

**आत्येसा** क्रिवि. अतिशय; फार (शोक): 'मुर्दा डेऱ्यास आणला... आनंदी करितसे आत्येसा ।' – ऐपो ८९.

**आत्राटण** न. मारणे; ताडण : 'निर्विकल्प करितां आत्राटणा'– गीता २.२२५०. [सं.आ+तड्]

**आत्राटणे** क्रि. १. मारणे; थापटणे; ताडन करणे : 'आवेसें भुजा आत्राटिति ।'–राज्ञा १. १३३. २. फुंकणे 'तेणे पौंड्रु आत्राटिला । महाशंखु ।।' – राज्ञा १.१४८.

**आत्रेय** पु. एक रासायनिक मूलद्रव्य.

**आथ** पु. हात. (भिल्ली) [सं. हस्त]

**आथडणे** उक्रि. हसडणे; हिसकणे; हिसका मारून हिसकून घेणे; पकडणे; बलात्काराने धरणे; जोराने किंवा झटक्यासरशी पकडणे.
अक्रि. जाऊन थडकणे; पोचणे; थांबणे; आवळणे. [सं. आ+स्तभ्]

**आथणे** अक्रि. शिवणे; हात लावणे. (भिल्ली)

**आथर्वण विधि–धी** जारणमारण. पहा: **अथर्वण** : 'विधि आथर्वण । हातीं आथी ।।'– ज्ञा १३.८३०.

**आथवो** अर्धा शेर पहा: **आठवा** (गो.)

**आथापि** उअ. पहा: **अद्यापि** : 'आथापि मुलामाजी मुली.'– नागेश लीलामृत.

**आथि–ति** क्रि. १. (जुने मराठी काव्य) आहे. पहा: **आति** : 'पिंगलकु सिंह येथें आथि ।' – पंच १.२४. २. होती : 'एक कुकडी (कोंबडी) आथी.'– भिल्ली गोष्टी ९. (भिल्ली)

**आथिणे** सक्रि. मिळवणे: 'काइ आथियलें ज्ञानेंविण'– ज्ञागा ४७६.

**आथिला** अक्रि. झाला; होता; 'असणे' चा भूतकाळ. (जुन्या मराठीतील.)

**आथिला** वि. १. भाग्यवान; थोर : 'सदाभ्यासाचेनि योगें । भगवतप्रसाद प्रसंगे । लाहोनि युक्तिसौभाग्यें । आथिला होय तो ।'–रासपं २.६०५. २. युक्त किंवा संपन्न: 'ऐसेनि गंभीरपणें । स्थिरावलेनि अंत:करणें । आथिला तोचि जाणें । मानूं इये ।।'– ज्ञा १.६१. शिवाय नामाथिला (मुआदि २१.४१) मोहाथिला (मुआदि २२.२२) इ. रूपे आढळतात.

**आथिलेपण** न. १. असतेपण; अस्तित्व. २. संपन्नता; थोरपणा; भाग्य : 'एथ जाणीव करी तोचि नेणें । अथिलेंपण मिरवी तेचि उणें ।'– ज्ञा ९.३६८. [सं. अस्ति]

**आथुधुरे** अ. सदसतपणे: 'जेथ चैतन्य आथुधुरे । करूनि असिजे ।'– राज्ञा ६.२८०.

**आथुरण** न. पहा : **अंथरूण** : 'ते गोपाळ झाले जाणते । आपले आथुरणावरी ।'– रासपं ५.५१.

**आद** वि. अर्ध. पहा: **अद** सामा शब्द. आदपाव; आदमण.

**आद** क्रिवि. आद्यमूळ; प्रारंभीचा; आधीचा : 'श्रोताची स्वभावना आद । ऐको येतो कवणही नाद । परि तयाचा अर्थ भेद । नाहींच तया ।।' – सिसं ३. [सं. आद्य]

**आद** स्त्री. वंशाची माहिती; आदि. [सं. आदि]

**आद, अवसान** न. आदिअंत; पुरावा; आधार : 'आपल्यास आद–अवसान कोठे काही लागेना.'– मासपमा ७०.

**आदक** पु. धाक; भीती: 'जैसी क्षैतिजें चंद्रकला । वरि राहोचा आदकु आगळा । कां लोणारी धार लोपे उन्हाळा । तेणेचि धाके मातंगा ।।'– रुस्व ४६४.

**आदकरणी** स्त्री. मागील आचरण; पूर्वीची कृती: 'तीर्थवासि सांगतां ऐकली सुमित्र तुमची आदकरणी ।'– प्रला ९१. [सं.आद्य+कृ]

**आदकव–काव, आदकावो** वि. अधिक; गरजेपेक्षा जास्त; शिल्लक राहिलेले. (कु.) [सं. अधिक]

**आदकुर–कर** न. अर्ध; अर्धुक; अर्धाभाग. [सं. अर्ध]

**आदखणा** पहा: **अदखणा**: 'बहुकृपण बहु खंदस्ती । बहु आदखणा बहु मस्ती ।'– दास ५.७.३५.

**आदखणेपण** न. मात्सर्य; द्वेष; एखाद्याचे चांगले झालेले न पाहण्याची वृत्ती : 'आदखणेपण करूं नये ।'– दास २.२.२२.

**आदगी** स्त्री. नणंद, नवऱ्याची बहीण. [का. आदंगी]

**आदघर** न. आदिघर; आद्यस्थान; पुराणप्रसिद्ध क्षेत्र : 'खुब जुर्तीनें किल्ला राखावा हें पूर्वीचें आदघर ।'– ऐपो २५१.

**आदट** वि. स्वैर; दडपले न जाणारे : 'तेवि इंद्रियें खाति अदटें : आत्मा नरक भोगीं'– उगी ५१०.

**आदट** वि. दृढ; बलवान. पहा: **अदट** : 'निळा म्हणे माझा पुरता आला वीट । देखोनी आदट कर्म बळी ।।'– निगा २१५.

**आदटणे** अक्रि. दबणे; जिरणे; कमी होणे : 'बुद्धी भ्रम सुटे प्रशस्त न वटे धोका सवे आदटे ।'– दावि ४३६.

**आदडा** स्त्री. गर्दी; दाटी.

**आदत** स्त्री. सवय; खोड : 'जयाजी शिंदे यांस आदत अशी होती कीं स्नानानंतर मुखावर धोतर घेऊन क्षणभर डोळे चोळीत रहावें.'– भाब १५. [फा.]

**आदद** स्त्री. संख्या. [फा. आदाद]

**आदन** न. आधण; भात इ. शिजवण्यास लागणारे उकळी आलेले पाणी. (गो.)[सं. आदहन.]

**आदन** न. अवलंबन; आश्रय. (गो.)

**आदब** स्त्री. आदरयुक्त नम्रता; शिष्टाचार; दरबारातली किंवा वरिष्ठासमोर पाळायची शिस्त : 'हिंदुस्थानातील आदब होती ती'– आभाळ १०. (वा.) **आदब राखणे**–मर्यादा, सन्मान, प्रतिष्ठा सांभाळणे.

**आदबत** क्रिवि. कष्टाने; हळूहळू; सावकाश : 'आबाची आई आदबत उठली'–बाराब ३२.

**आदबअटि** स्त्री. (मल्लखांब.) १. छातीवर स्वस्तिकाकार हात ठेवणे. २. मल्लखांबाला हात ठेवून मारावयाची उडी.

**आदमखोर** वि. नरभक्षक; मनुष्यभक्षक : मनुष्याच्या रक्तमासांची चट लागलेला (वाघ) : 'ही आदमखोर वृत्ति नानांच्या ठिकाणीं उत्पन्न झाली होती.' – खून की आत्महत्या ८३१. [फा.]

**आदमास** पहा: **अजमास, अंदाज**

**आदमी** पु. मनुष्य; मानव; पुरुष (आदमचे वंशज); इसम; माणूस; व्यक्ती. [फा.]

**आदमुरे-मोरे** पहा: **अदमुरे**

**आदमुसा** वि. १. मूर्च्छित; अर्धमेला. २. निरुत्साही; कष्टी; निराश: 'तो आदमुसा झाला'- धग ६.(व.) [सं. अर्ध+मूर्च्छा]

**आदर** पु. १. मान; श्रद्धा; पूज्यबुद्धी : 'गुणा न म्हणतां उणा अधिक आदरें रोविती ।'- केका २३. २. (हुंडी) स्वीकार; सत्कार; होकार. ३. सद्भाव; हौस; आवड : 'तसा रंग श्रीमंत खेळले कलियुगांत अति आदरांत ।' - ऐपो १९८. ४. (सामान्यत:) गौरव; सत्कार; स्वागत; आदरातिथ्य. ५. अगत्य.

**आदर** पु. १. आवश्यक गोष्ट; वेळप्रसंग; तत्परता : 'ऐसास राजश्री मानाजी आंगरे याचेंहि पत्र आम्हास आले यावरून इलाज करावयास आदर जाहाले.'- पेद ३४.३२. २. धर्म, राष्ट्र, थोर व्यक्ती, वडील माणसे इ. ना मान द्यावा. त्यांच्या बाबतीत नम्रपणाने वागावे अशी भावना; भक्ती : 'बाइसीं तेयाचा आदरू सांघितला.'- लीच २.१५.

**आदर** पु. इच्छा; खुमखुमी : 'खाली धामधुम करावयाचा आदर आहे म्हणून लिहिले तरी धामधुम करणे ही कार्ये भले मर्दाची आहेत'- वे ४. स १७४३.२६. [सं.]

**आदरउपचार-मान-सत्कार** पु. पाहुणचार; मानसन्मान; मानमरातब; संभावना; आसन; अभ्युत्थान; भोजन वगैरे देणे : 'हैदरअल्लीनें लक्ष्मणपंतांची भेटी घेतली. मशारनिल्हेचा आदरउपचार फार कांहीं केला.'- ऐलेसं १४४३.

**आदरण** न. बहुमान; सन्मान; आदर; श्रद्धा; अगत्य. (कों.)

**आदरणीय** वि. बहुमानास योग्य; मान देण्यास योग्य; सन्माननीय; आदरार्ह. [सं.]

**आदरणे** क्रि. १. मान-सन्मान करणे; आदर ठेवणे. २. स्वीकारणे, घेणे; कबूल करणे; मान्य करणे : 'जसें प्रार्थितांचि आदरिलें ।' - मोऐषिक १.३०.३. (एखाद्या धंद्याविषयी) हातात घेणे; पत्करणे, कृती करण्याचे मनात आणणे: 'धरिला राज्य मनोरथ म्यां मूढें, न वनवास आदरिला ।' - मोभीष्म ११.१. ४. ठरवणे: '...उधाणी करू आदरीली ।' - लीच १.३६. ५. लागणे; निघणे: 'बीजे करूजें आदरिलें.'- लीच १.१३. ६. आरंभ करणे : 'जे तुवां एथ आदरिलें । माझारींचि ।।'- ज्ञा २.९१. [सं. आ+दृ]

**आदरदोदर** वि. अर्धवट कुटलेले -चेचलेले. (व.) [सं. अर्ध+दृ]

**आदरमुदारत** पु. आदरसत्कार : 'त्यांची भेट जालियावर बहुत आदरमुदारत करून त्यास मेळवून घ्यावे.' - मशिंका ३१४.

**आदरातिथ्य** न. पाहुणचार (भोजनासंबंधीचा); आदरसत्कार. [सं.]

**आदरांजली** स्त्री. भावपूर्वक वंदन; भक्तियुक्त प्रणाम. [सं.]

**आदरून** क्रिवि. १. मनापासून; अंत:करणपूर्वक. २. दृढ निश्चयाने; खडसून; खात्रीने; साफ; चकचकीत. ३. मुद्दाम. ४. अगत्याने: 'त्या पत्रादी साधनांचे विभक्तीकरण व एकीकरण पाहिजे असें द. वि. आपटे आदरून सांगतात.'-आघइ ५. [सं. आदर]

**आदरेखून** अ. आवर्जून; मुद्दाम; आदरून : 'बाबू केशवचंद सेन यांची नव्या धर्मावर व्याख्यानें हीं फार मननीय असत. तीं नेटीव्ह व ओपिनियन आदरेखून प्रसिद्धच करी.' - मंच १.२१४. (कों.)

**आदर्श** पु.१. चांगल्या आचरणाचा; एखाद्या विषयातील श्रेष्ठपणाचा नमुना; ज्याचे अनुकरण करावे असा माणूस, असे ध्येय, उद्दिष्ट इ. २. कित्ता; नमुना. ३. एखाद्या ग्रंथावरील टीका; भाष्य. ४. आरसा : 'अंधास आदर्श जसा दिसेना ।'- सारुह २.१२.३ [सं. आ+दृश्]

**आदर्शअंबारी** स्त्री. आरशाची अंबारी : 'गजपृष्ठीं आदर्शअंबारी ।' - ऐपो २६६.

**आदर्शनिष्ठ** आदर्शावर आधारलेला.

**आदर्श परिवर्तित** न. (विअ.) आवर्तनांच्या संख्येत बदल करून व्होल्टेजमध्ये अपेक्षित असा बदल करण्याकरिता उपयोजिलेले नमुनेदार उपकरण. [सं.]

**आदर्शलक्षी** वि. (तत्त्व) आदर्श विषयक, आदर्शोन्मुख.

**आदर्शवाद** पु. आदर्शावरील निष्ठा; आदर्शांचे अनुसरण करण्यावर भर देणारे मत; ध्येयवाद; कल्पनानिष्ठ विचार; कसे आहे, यापेक्षा कसे असावे यासंबंधी केलेला विचार. [सं.]

**आदर्शवादी** पु. (तत्त्व.) आदर्शवादाच्या मताचा पुरस्कर्ता. [सं.]

**आदलदोदल** क्रिवि. इकडे तिकडे करणे; खालीवर करणे; हलवणे; घोळणे : 'फुटाणे आदलदोदल केले जातील.' - वानगी ५०.

**आदला** रांगेतील पहिला किंवा सर्वांत पुढचा, आरंभीचा, आधीचा, अगोदरचा.

**आदवड** न. चामडी रापविण्यासाठी पाणी ठेवण्याचे कुंड. (कु.)

**आदवसाण** स्त्री. आशा; फायदा; फल; परिणाम.(गो.) [सं. आदि+अवसान]

**आदवेचो-आदवो** वि. १. प्रथम, पहिल्याने परिचय झालेला, प्रथम परिचयाचा. (गो.) २. अपरिचित. [सं.आद्यवत्]

**आदसून** क्रिवि. आवर्जून; हटकून.

**आदसेरी** स्त्री. पहा : **अडशेरी** : 'हरजिनस येईल त्याची आदसेरी घ्यावी.' - पेसाप ७६.

**आदळ** पु. स्त्री. १. धक्का; हेलकावा; घाव. 'विषयाचे आदळ रोकडे । चुकवूनि धडपुडे । काढिती तीरा ।' -एभा २.३१६. २. झोंबी; झुंज; टक्कर; हातघाई : 'मग दोंहीं दळां आदळु जाला । तो कैसा सांगौ ।'- शिव १०४१.

**आदळआपट, आदळउपट, आदळउफळ, आदळधोपट, आदळाआदळ** स्त्री. रागाच्या भरात चीजवस्तूंची फेकाफेक, दंगा, धिंगामस्ती. त्राग्याने वस्तूंची (भांड्याची) फेकाफेक.

**आदळणे** अक्रि. जोराने आपटणे; आघात होणे; तुटून पडणे.

**आदळणे** उक्रि. १. कोसळणे; धडकणे; थडकणे; आपटणे. २. चालून जाणे; तुटून पडणे, जोराने हल्ला करणे. इ. (ल.) अधाशीपणाने खाणे; (दाताखाली) रगडणे.

**आदळाआदळ** स्त्री. मारामारी; झटापट : 'भागडचुडी घायाळ होता आदळाआदळ झाली ।।'-मब ४८.

**आदंतर** वि. आगाऊ. (गो.)[सं. आदि+अंतर]

**आदा** पु. आवक; उत्पन्न. पहा : **अदा** : 'दुसालां मिळोन खर्च भारी झाला, आदा नाहीं'– ऐलेसं४.१८३३.

**आदाता** पु. पैसे घेणारा; दान स्वीकारणारा; धनादेश किंवा पैसा जिच्या नावे दिला जातो अशी व्यक्ती. [सं.]

**आदान** न. १. कुयोग; अशुभसूचक प्रसंग. २. (ल.) ज्यातून निभावणे–जगणे कठीण असा आजार किंवा अपघात; पुनर्जन्म देणारे संकट : 'म्यां भोगिलीं आदानें । गर्भवासी अपार ।' – मुरंशु ४२५. (क्रि. येणे, जाणे, चुकणे, टळणे, करणे.) [सं.आ+धान]

**आदान** न. घेणे; स्वीकारणे; बळेच देणे; मिळवणे. [सं. आ + दा]

**आदानप्रदान** न. देवघेव; विनिमय; दळणवळण. [सं.]

**आदापावती** स्त्री. (सावकारास) काही रोख व काही हवाल्याने दिलेल्या रकमेची पावती. भरणा केलेली पावती. रक्कम अदा केल्याची पावती.

**आदाब** स्त्री. १. वंदन; मुजरा (क्रि. बजावणे) : 'सर्वांनी आदाब बजावली.' – ऐटि १.१२. २. भेटीचे जवाहीर, अलंकार, नजराणा : 'नवाबांनीं मोत्याच्या कंठ्या तीन व जिगा कलगी वगैरे अकरा आदाब इनायत केले.'– मइसा ५.१९१. [फा. अदब]

**आदाब अर्ज** स्त्री. १. वंदन, मुजरा. २. भेटीच्या वेळी सलाम करावयाच्या वेळी म्हणावयाचे शब्द.

**आदाबबंदगी** स्त्री. वंदना; अभिवादनपूर्वक विज्ञप्ती : 'आदाबबंदगी ऐसी जे'– ऐलेसं ११.५९१८.

**आदाम** पु. १. बायबलमधील सृष्टीच्या उत्पत्तीच्या कथेतील प्रथम मानव. २. येशुख्रिस्त : 'त्यानें (देवानें) त्यास आदाम हें नाव दिले.'– उत्प ६.२. [इं. ॲडॅम]

**आदाय** पु. नफा; फायदा; मिळकत. पहा : **अदाई** [सं.]

**आदायक** ग्रहण करणारा; स्वीकार करणारा.

**आदारी** स्त्री. भंडारा ठेवण्याची कातड्याची पिशवी. (माण.)

**आदाव** पु. ॲडम; आदम : 'देवें आदिपुरुसु आदावो रचिला । आपुलें प्रतिस्वरूपी घडिला ।' – क्रिपु १.३२.

**आदाव** पु. हशील; फायदा; आदा. (गो.)

**आदावल** स्त्री. १. दोष; आळ; दोषारोप. २. गुन्हा; जबाबदारी : 'सटावटा करून आपला उलगडा करून आदावळ आम्हावरी घालून गेले.'– पेद ३.१०२.[फा.] (वा.) **आदावल घालणे** – आरोप करणे; तुफान येणे : 'दरबारी अवांतर गृहस्थ मंडळी पुण्य खर्च करून आदावली घालीत आहेत.' – वै. ४ स १७४५.४

**आदाळो–दोळी–दोळो** स्त्री. विळी; किसणीसह विळी.(गो. कु.)

**आदि–दी** स्त्री. १. आरंभ; उगम; मूळ; प्रारंभ; पहिला भाग : 'म्हणोनि नाहीं ऐसिया भवा । आदि कैची ।' –ज्ञा १५.२३५. २. उद्भव; उत्पत्ती; मूळ उत्पत्तिस्थान. ३. (ल.) खाण; झरा. ४. मालेतील पहिली संख्या किंवा वस्तु; (लीळेचा) मथळा, शीर्षक : 'लीळाचिया आदि केलिया.' – ज्ञाप्र १२.१५ (ग.) श्रेणीतील प्रथमपद. ५. वंश; चरित्र.

वि. १. प्रमुख; अग्रणी. २. सामासिक शब्दांत या शब्दाचा मूळ अर्थ कायम राहतो तरी तेथे इत्यादी असा त्याचा विशेष अर्थ होतो. जसे :– इंद्रादी देव; रंभादी स्त्रिया, कामक्रोधलोभादी षड्रिपू. ३. सामासिक शब्दांत या शब्दास क प्रत्ययही लागतो. जसे:–अकारादिक वर्ण, ब्राह्मणादिक जाती, आकाशादिक भूते. सामा. शब्द – आदिकाव्य, आदिदेव, आदिधर्म, आदिभाषा इ. [सं.]

**आदिअवसान** क्रिवि. आद्यंत; आरंभापासून अखेरपर्यंत : 'तिमाजी व्यंकटाद्रि यानें शपथपूर्वक मंडळात उभे राहून आदिअवसान करीना (हकीकत) सांगितला.' –ऐलेसं ८३१०.

**आदिअंत** पु. आरंभ आणि शेवट; प्रारंभ आणि समाप्ती; अव्वल आणि अखेर; शेंडा आणि बुडखा. [सं.]

**आदिक** वि. अधिक; जास्त, 'ऐसें तें निज ठेवणें । कदापी पालटों नेणें । अथवा नव्हे आदिक उणें । बहुतां काळें ।'– दास १.९.९.

**आदिकरून** क्रिवि. एका समुदायातील काही विवक्षित वस्तू प्रमुख धरून ती वस्तू प्रथम असे समजून ती व त्याबरोबर इतर; इत्यादी, वगैरे.

**आदिकवि–वी** वि. पु. १. पहिला कवी, काव्यकर्ता. २. (ल.) श्रेष्ठ, आद्य कवी; ब्रह्मदेव, वाल्मीकी यांना आदिकवी म्हणतात. [सं.]

**आदिकारण** न. निदान; आद्यबीज; पहिले कारण; मुख्य कारण; विश्व ज्यापासून निर्माण झाले ते तत्त्व. [सं.]

**आदिकालीन** वि. फार प्राचीन.

**आदिकुमारी** स्त्री. दुर्गा देवी : 'आदिकुमारी येऊनि जाण । कृष्णासी तेल लावी आपण । बांधोनि दृश्याचें कंकण । जीवें जीव म्हणतसे ।'–एरुस्व १५.७३. [सं.]

**आदिगादी** स्त्री. मूळ सिंहासन, तक्त; राज्यसंस्थापकाची गादी किंवा तक्त; मूळ स्थान; पीठ.

**आदिग्रंथ** पु. शीख लोकांचा मुख्य धार्मिक ग्रंथ. यासच ग्रंथसाहेब म्हणतात. ग्रंथ या नावानेही याचा उल्लेख होतो. हा ग्रंथ वाचणाऱ्यास ग्रंथी म्हणतात. [सं.]

**आदिघराणे** न. १. वंशाचे मूळचे कुटुंब; अगदी पहिले कुटुंब. २. संस्थापकाचे, मूळ पुरुषाचे गृह किंवा कुटुंब. [सं. आदि–गृह]

**आदिजीव** पु. (प्राणि.) सर्वात खालच्या कोटीतील एकपेशीय प्राणी, हे सूक्ष्मदर्शक यंत्रातून पाहिल्याशिवाय दिसत नाहीत; मूलरूप प्राणी.

**आदित** क्रिवि. प्रथमत:; आरंभापासून; पहिल्यापासून; मुळापासून; उगमापासून. [सं. आदित:]

**आदित** पु. सूर्य. (गो.)[सं. आदित्य]

**आदितत्त्व** न. मूळ तत्त्व. [सं.]

**आदितवा** पु. आदित्यवार; रविवार. [सं. आदित्यवासर]

**आदिताल** पु. (संगीत) संगीतातील एक ताल. विशेषत: दाक्षिणात्य संगीतात याचा वापर होतो. [सं.]

**आदित्य** पु. १. सूर्य; रवि : 'वीरांच्या अभिमाना झाला अस्त । माध्यान्हीं आला आदित्य ।' – एरुस्व ७.६४. २. बारा आदित्य (देवता). धातृ, मित्र, अर्यमन्, रुद्र, वरुण, सूर्य, भग, विवस्वत, पवन, सवितृ, त्वष्ट्ट व विष्णू ही बारा महिन्यांतील सूर्याची बारा रूपे आहेत. ३. अदिति पुत्र; (सामान्यत: देवता किंवा देव.) ४. सूर्यफूल : 'आदित्याचीं झाडें । सदा सन्मुख सूर्याकडे ।'– ज्ञा १८.८६५. [सं.]

**आदित्याची छत्री** स्त्री. अळंबे; एक वनस्पती.

**आदित्याची तुळस** स्त्री. तुळशीसारखी एक वनस्पती.

**आदिधन** न. (ग.) गणित किंवा भूमितीश्रेढीतील प्रथमपद. [सं.]

**आदिना** पु. शुक्रवार. [अर.]

**आदिनाथ** पु. १. शंकर : 'देवांचे दैवत । तुज नमिलें आदिनाथें । ये वो कृपावंतें । भोगा माझ्या धावत ।'– तुगा २८६. २. नाथपंथाचा संस्थापक; मच्छेंद्रनाथाचा गुरू : 'नमस्कार माझा तया आदिनाथा ।'– नाथनामावली. [सं.]

**आदिनारायण** पु. आदिकारण; भगवान विष्णू; क्षीरसमुद्रात शेषावर निजलेले भगवत्स्वरूप : 'परब्रह्म असतां निश्चल । तेथें संकल्प उठिला चंचळ । तयास बोलिजें केवळ । आदिनारायेण ।'–दास १३.३.३. [सं.]

**आदिपद** पहा: **आदिधन** [सं.]

**आदिपश्चात्** क्रिवि. १. जरा अलीकडे पलीकडे; आजूबाजूस; जवळपास; आगेमागे. २. लवकर किंवा उशीरा; काही दिवस अगोदर किंवा काही दिवस नंतर. ३. अस्तावस्त; एकांत एक मिसळून. ४. उलटापालट; इकडचा तिकडे, तिकडचा इकडे; क्रमरहित. [सं.]

**आदिपीठ** न. देवतेचे मूळ स्थान; प्रारंभीचे ठिकाण; आद्यस्थान. [सं.]

**आदिपुरुष** पु. १. परमेश्वर : 'तें देखोनि आदिपुरुष । विस्मितु ।'– ज्ञा १.१५९. २. मूळ पुरुष; कुळातील पहिला पुरुष. [सं.]

**आदिपृथक्करण** न. (रसा.) प्राणिज किंवा उद्‌भिज पदार्थांचे मुख्य घटक एकमेकांपासून वेगळे करणे.

**आदिबिंदु–दू** पु. (ग.) संदर्भव्यूहाचे स्थान दर्शविणारा आधारबिंदू. [सं.]

**आदिबीज** न. ज्याच्यापासून विश्व निर्माण झाले ते तत्त्व. मूळ उगम, कारण, तत्त्व; आदिकारण; परमेश्वर; प्रणव; ओंकार: 'तें मियां श्रीगुरूकृपा नमिलें । आदिबीज ।'– ज्ञा १.२०. [सं.]

**आदिभाव** पु. स्वत:ची इच्छा; प्रेरणा : 'जयाचेनि आदिभावें । हें राष्टर त्यजिलें देवें'– ज्ञाप्र १०४६.

**आदिभूत** सूक्ष्म पंचमहाभूतापैकी प्रत्येक.

**आदिभैरव** पु. माया; पराशक्ती; चैतन्य. [सं.]

**आदिम** वि. १. पहिला; मूळचा; आद्य; प्राथमिक स्वरूपातील, अविकसित. २. ओबडधोबड; संस्कार न झालेला; असंस्कृत. ३. (प्राणि.) शरीराच्या मध्यरेषेच्या जवळ असणारा. ४. (वै.) आद्यस्थितीतला; पहिल्या पायरीवरील (त्वचा, पेशी). [सं.]

**आदिमग** क्रिवि. १. आरंभी किंवा मागाहून; लवकर अथवा उशीरा; आधी किंवा नंतर. २. पुढचा मागे मागचा पुढे; उलटसुलट.

**आदिमध्यांतरहित** वि. ज्याला प्रारंभ, मध्य, शेवट या तीन अवस्था नाहीत असा (परमेश्वर). [सं.]

**आदिम पूजासंप्रदाय** पु. (समाज.) आदिवासी समाजात रूढ असलेली निसर्गपूजा; समाजातील गूढे, सूर्य, चंद्र, वीज, वृक्ष, प्राणी इ. ची पूजा करण्याचा प्रघात. [सं.]

**आदिम रूप** न. आरंभीचे रूप; प्रथम नमुना; पहिली प्रतिकृती. [सं.]

**आदिम समाज** पु. (समाज.) संस्कृतीचे व सभ्यतेचे संस्कार न झालेला समाज; रानटी समाज; विकासाच्या प्रथमावस्थेतील समाज. [सं.]

**आदिम संघ** पु. (प्राणि.) अतिसूक्ष्म प्राण्यांचा संघ; गोडे व खारे पाणी, पाणथळ जमीन आणि ओला कुजका पाला यांत मुख्यत: हे प्राणी उत्पन्न होतात. पहा: **आदिजीव** [सं.]

**आदिम साम्यवाद** पु. समाजाच्या प्राथमिक अवस्थेतील समता मानणारा विचार; समाजाच्या प्राथमिक अवस्थेतील वर्गविरहित समाजा संबंधीचे विचार. [सं.]

**आदिमळ** पु. सृष्टिरचनेच्या वेळी मायेच्या तमोभागातून बाहेर पडल्यावर जीवाने लावून घेतलेला मळ : 'तैसा परमेश्वरप्रवृत्ती जीवासि आदिमळु लागला असे'– दृपा १९.

**आदिमाता** स्त्री. (उत्ख.) स्त्री देवतेची प्राचीनतम प्रतिमा. ही बहुधा मातीपासून बनविलेली असे. निसर्गातील सर्जनशक्तीचे प्रतीक. [सं.]

**आदिमानव** पु. आरंभीचा माणूस; सर्वांत प्राचीन माणूस.

**आदिमानव युग** न. मनुष्याच्या प्राथमिक वा प्रारंभिक अवस्थेचा कालखंड.

**आदिमाया–माता** स्त्री. १. आदिप्रकृती; मूळमाया; विश्व निर्माण करणारी शक्ती; सर्व संसाराला, प्रपंचाला कारणभूत अशी देवता. २. आदिपुरुषाची स्त्री; पार्वती; शक्ती : 'तूंचि आदिमायेचा निजवर ।'– हरि १.२ [सं.]

**आदिमूर्ति–र्ती** स्त्री. १. मूळ पुरुष; ईश्वर; नारायण: 'आदिमूर्ती निश्चिता । होतें वटपत्रशयनीं ।' –गुच २.४०. २. श्रीकृष्ण : 'हेम सिंहासनीं आदिमूर्ती । बैसला असे सहज स्थिती ।'– एरुस्व ३.२१. [सं.]

**आदिमूल** न. (वन.) प्रथम मूळ; बीज रूजताना आलेले मूळ. [सं.]

**आदिरस** पु. (जीव.) जीवनरस; जीवरस. [सं.]

**आदिराजा** पु. पहिला संस्थापक राजा. (राज्यस्थापक पहिला पुरुष). [सं.]

**आदिरिद्धि–द्धी** स्त्री. संपत्ती; समृद्धी : 'जेहातें गृहदेवता आदिरिद्धी ॥'– राज्ञा ६.४४५.

**आदिरूप** न. मूळ रूप; मूल प्रतिमा; मूळ नमुना. [सं.]

**आदिरेषा** स्त्री. (ग.) संदर्भासाठी घेतलेली रेषा. [सं.]

**आदिल, आदील** वि. पहिले; मूळचे; प्रथमचे; अव्वलचे : ' जैसा दीपें दीपु लाविजे । तेथ आदील कोण हें नोळखिजें ।'– ज्ञा ९.४२८. [सं. आदि]

**आदिल** पु. न्यायाधीश. [फा.]

**आदिवदन** न. गणित किंवा भूमितीश्रेढीतील दोन टोकांच्या पदांपैकी पहिले पद. पहा : **आदिधन** [सं.]

**आदिवस्तु** स्त्री. आद्य सत्त्व : 'आपलींच आपन स्तुति करी । आदिवस्तु जे ।'– ऋम ४३१

**आदिवंत** वि. १. मूळचा; पहिला; आदिल. २.(ल.) मिरासदार : 'महासुखक्षेत्रीं । आदिवंत ।'–ज्ञा ६.४४९.

**आदिवासी** पु. (समाज.) १. मूळचे रहिवासी; मूळची जमात; प्राथमिक अवस्थेतील लोक. २. भारतीय संविधानाप्रमाणे 'अनुसूचित जमाती'त समाविष्ट केलेले लोक; डोंगरदऱ्यांत राहणारे लोक. [सं.]

**आदिशक्ति–क्ती** पहा : **आदिमाया**

**आदिशरीर** न. लिंगदेह.

**आदिशून्य** न. १. आदिशक्ती; माया: 'भरे आदिशून्याचा गाभारा ।

नाणेयांसी ।'– ज्ञा ७.२४. २. मुळात ज्या वेळी काहीच अस्तित्वात नव्हते ती अवस्था. ३. आकाश. ४. आदिसृष्टि जल. [सं.]

**आदिष्ट** वि. १. आज्ञा, हुकूम केलेला; सांगितलेला; आज्ञप्त; कथित. २. (ग.) दुसऱ्याच्या स्थानी त्याच्याऐवजी घातलेला. [सं.]

**आदिष्ट पदार्थ** पु. एखाद्या वस्तूबद्दल येणारी दुसरी वस्तू; बदली पदार्थ.

**आदिसंकल्प** पु. ब्रह्माच्या ठिकाणी उत्पन्न होणारी, 'एको ऽ हं बहुस्याम्' (मी एक आहे, अनेक असावे) ही मूळ, पहिली इच्छा : 'पैं निर्विकल्पाचिये बरडीं । फुटे आदिसंकल्पाची विरूढी ।'– ज्ञा ८.२२. [सं.]

**आदिसिद्ध** वि. प्रारंभी असलेले; शाश्वत. [सं.]

**आदि सिद्धांत** पु. (न्या.) मूळ सिद्धान्त.

**आदिसोयरा** पु. पहिला सोयरा, नातलग; ईश्वर.

**आदी** क्रिवि. आधी; प्रथम; अगोदर.
शअ. पूर्वी; पूर्वीचा; मागचा. [सं.]

**आदीकर–कारी** पु. अधिकारी; सुभेदार. [सं. अधिकारी]

**आदीचेबिदी–आदीबिदी** क्रिवि. १. सर्वांच्या आधी; सर्वांच्या अगोदर, लवकर. २. पुष्कळ अगोदर; बऱ्याच आधी. [आदीचे द्वि.]

**आदु** पु. साखळी.

**आदुफ** न. मोठी खिडकी. (गो.)

**आदृत** वि. १. आदर केलेला; मान दिलेला. २. स्वीकार केलेला; ग्रहण केलेला (नजराणा, बक्षीस इ.) [सं.]

**आदे** वि. अर्धे. (गो.)

**आदेय** वि. ग्राह्य; मान्य; संमत; स्वीकार करण्यास योग्य. [सं.]

**आदेश** पु. १. आज्ञा; हुकूम; फर्मान; विधी; नियम: 'दास म्हणे आदेश तयाला ।'– दावि २७४. २. उपदेश. ३. अतिदेश या अर्थी चुकीने योजला जातो. ४. कानफाटे; नाथपंथी (गोसावी) लोक परस्परांस नमस्कार करताना उपयोगात आणतात तो शब्द : 'अलक्ष आदेश जल्पतसे ।' – नव ८.११०. ५. (भाषा) मूळ अक्षराबद्दल दुसरे योजले जाणारे अक्षर (प्रतिनिधी). ६. बदली वस्तू, पदार्थ; प्रतिनिधी. ७. (राजनीति) हुकूम; आज्ञा; फर्मान. [सं.]

**आदेशक** पु. (व्यापार.) हुंडी (विपत्र) काढणारी व्यक्ती किंवा संस्था; हुंडी लागू करून पैसे घेणारा. [सं.]

**आदेशन** न. (ग.) दुसऱ्याच्या जागी त्याच्याऐवजी घालण्याची क्रिया. [सं.]

**आदेशप्रकरण** न. भाषेतील ध्वनीस होणाऱ्या विकृतीबद्दलचे विवेचन.

**आदेशप्रधान** वि. (भाषा.) ज्यात शब्दांची रूपे बदलतात अशा सप्रत्ययी भाषा (संस्कृत, लॅटीन इ.)

**आदेशभंग** पु. अवज्ञा; हुकूम न मानणे; आज्ञेचे उल्लंघन करणे. [सं.]

**आदेशिका** स्त्री. न्यायालयात हजर राहण्याचा हुकूम देणारे पत्र. [सं.]

**आदेशिती** पु. (व्यापार) हुंडी ज्या व्यक्तीच्या किंवा संस्थेच्या नावे काढली जाते ती व्यक्ती किंवा संस्था. ज्याच्यावर हुंडी लागू करायची ती व्यक्ती किंवा संस्था.

**आदेस** पु. अर्धा दिवस. (गो.)[सं. अर्ध+दिवस]

**आदेस** पु. जोगी एकमेकांना करतात तो नमस्कार : 'जोगु नाही । जुगुतीं नाही । सीक्षा नाही । आदेसु नाही'– लीचपू २०६.

**आदेसूद** वि. हस्तगत; जमा: 'त्याणी जगंनाथ चिमणाजीस आज्ञा केली कीं लाख रुपयांस तुम्हांस आदेसूद जाहलें असेल तें वजा करून बाकी ऐवज घेणें.'– मइसा ३.३२

**आदैच** पु. दावाग्नी: 'आदैच वडवानळु : दानवांसी' –शिव ७१५.

**आदो** न. आर्दा नक्षत्र. (गो.) [सं आर्द्रा]

**आदोगर** क्रिवि. अगोदर. (ग्रा.)[सं. आदौ]

**आदोड** वि. अधाशी; हावरा; खादाड; अधोडी. (गो.)

**आदोडा** पु. अधाशी; खादाड. पहा: **आदोड** : 'आदोडा उपाशी आदोड्याचा जीव टोपलीपाशी.'– एहोरा ६.११.

**आदोळणे** क्रि. पहा: **आंदोळणे** : ' तेया पावनाचेनि बळें । आदोळुनु ब्रखेआंचे टाळे ।'– क्रिपु ४.९७.

**आदोंदी** खाचर; खारवट शेताचा तुकडा. (गो.)

**आदो** क्रिवि. प्रथमारंभी; सुरुवातीस; आरंभी; पहिल्याने; अगोदर[सं.]

**आद्य** वि. १. पहिला; आरंभीचा; अगोदरचा; उपक्रमास सुरुवात करणारा (वेळ, स्थळ संबंधी). २. मुख्य; प्रमुख; सर्वोत्कृष्ट. ३. आदी; प्रभृति.
पु. १. आदिपुरुष; परमेश्वर : 'ॐ नमोजी आद्या ।' –ज्ञा १.१. २. घराण्याचा मूळ पुरुष. [सं.]

**आद्यअंत्र** न. (प्राणी.) अन्ननलिकेचा जठरानंतरचा प्रारंभीचा भाग.[सं.]

**आद्य ऐतिहासिक युग** न. (पुरा.) इतिहासपूर्व कालखंड व ऐतिहासिक कालखंड यांच्या मधला कालखंड. (यात प्रामुख्याने भारतातील हरप्पा संस्कृतीचा (इ.स. पू. ३०००) समावेश करतात.)

**आद्यकवि–वी** पहा: **आदिकवी**

**आद्यकारण** पहा: **आदिकारण**

**आद्य कार्य** न. (समाज.) एखाद्या समाजोपयोगी कार्याची सुरुवात, आरंभ, आरंभीचे काम, उपक्रम. [सं.]

**आद्यगोदान** न. मुख्य अनुष्ठान करण्यापूर्वी प्रायश्चित्तातील एक विधी म्हणून करावयाचे गाईचे दान. [सं.]

**आद्यग्रह** पु. पहिल्या प्रथम एखाद्याविषयी असणारी, होणारी भावना, ग्रह, ठसा, पूर्वग्रह.

**आद्यजननपेशी** स्त्री. (वै.) गुणसूत्रांचे विकसन करणाऱ्या पेशी. [सं.]

**आद्यजंतु–तू** पु. (प्राणि.) पहा: **आदिजीव**

**आद्यनाडी** स्त्री. (ज्यो.) पहा : **नाडी** नऊ नऊ नक्षत्रांचा एक अशा एकूण नक्षत्रांच्या तीन भागांपैकी पहिला भाग.

**आद्यपर्ण** न. (वन.) पूर्वपर्ण; पहिले पान; दलिकेनंतरचे (पहिले) पान; आदिकोरकापासून बनलेले पान. [सं.]

**आद्यपीठ–स्थान** १. संप्रदायाचा प्रारंभ झालेले ठिकाण. पूर्वजांची भूमी किंवा स्थळ. २. देवता जेथे प्रथम अवतीर्ण किंवा उपलब्ध झाली ते स्थान. ३. प्राचीन व पूज्य असे क्षेत्र, नगर, स्थळ. [सं.]

**आद्यपुरुष** पहा:**आदिपुरुष**

**आद्यप्रवर्तक** पु. एखाद्या गोष्टीस प्रारंभ करणारा; प्रथम सुरू करणारा; उपक्रम करणारा. [सं.]

**आद्यभ्रूण** पु. (वै.) अगदी सुरुवातीचा मेटॅझोअन पोकळीयुक्त गर्भ.[सं.]

**आद्यमज्जापेशी** स्त्री. (वै.) नेहमीच्या रक्तामध्ये असलेली फार परिपक्व

नसलेली कणीपेशी; पेशीद्रव्याच्या कणिकायनामुळे ती वेगळी ओळखता येते. त्याचे केंद्र वृक्कग्रंथीच्या आकाराचे असते. [सं.]

**आद्यमळ** पु. पहा : **आदिमळ**

**आद्यमुद्रित** न. (ग्रं.) मुद्रित-कलेच्या प्राथमिक अवस्थेतील म्हणजे इ. स. १८७० पूर्वीची मराठी भाषेतील पुस्तके. [सं.]

**आद्यवर्णागम** (सास.) पहा : **आद्यस्वरागम**

**आद्यवेद** पु. ऋग्वेद.

**आद्यवेदी** वि. ऋग्वेदी शाखेचा. – गुच १७.१७

**आद्यस्वनागम** (सास.) पहा: **आद्यस्वरागम**

**आद्यस्वरागम** पु. (भाषा) उच्चार सुलभपणे करता यावा म्हणून शब्दाच्या आरंभी जोडले जाणारे अक्षर; जोडला जाणारा स्वर. उदा. स्क्रू > इस्क्रू , स्कूल > इस्कूल. [सं.]

**आद्यज्ञान** न. १. प्रारंभीचे, मूळ ज्ञान; शहाणपण. २. उपजत, अंगचे अथवा जातीचे शहाणपण; नैसर्गिक बुद्धी. ३. मूळ कल्पना. ४. नवीन शोध, शक्कल; प्राथमिक युक्ती, प्रयुक्ती. [सं.]

**आद्यंक** पु. (ग.) त्रैराशिकातीत पहिले पद. [सं.]

**आद्यंत** पु. आरंभ आणि शेवट; संपूर्ण; समग्र : 'बोलिलिसे आद्यंतीं । परमात्मास्थिती निजबोधू ।' – एभा १.१९७. पहा: **उपजनिपज** क्रिवि. आरंभापासून शेवटपर्यंत; अवल अखेर; अथपासून इतिपर्यंत. [सं.]

**आद्या** पु. नफा; फायदा. पहा : **अदा**

**आद्याचार** पु. पूर्वापार चालत आलेली रूढी, रीतिरिवाज; वहिवाट.[सं.]

**आद्याक्षरमुद्रा** स्त्री. खाजगी मालकी दर्शवण्यासाठी वापरण्यात येणारा, एकात एक गुंफलेली, नावाची आद्याक्षरे असलेला शिक्का. [सं.]

**आद्याक्षरसंयोग** पु. संक्षिप्त नावाचा शिक्का, आकृती; एकाक्षरी शिक्का. मूळ एकाक्षरी सहीचे चिन्ह; दोन किंवा अधिक अक्षरे एकमेकांत गुंतवून तयार केलेली आकृती. अंगठी, शिक्का इ. वर कोरतात.

**आद्याक्षरसंज्ञा** स्त्री. आद्याक्षरे एकत्र करून होणारे नाव. उदा. मसाप=महाराष्ट्र साहित्य परिषद. [सं.]

**आद्याक्षरी** स्त्री. आपल्या संपूर्ण नावातील शब्दांची आरंभीची अक्षरे मिळून होणारी स्वाक्षरी. उदा. गदिमा = गजानन दिगंबर माडगूळकर.

**आध** वि. अगाध : 'आध अगोचर । ब्रह्मादिकां' – ऋम ७७२.

**आध** क्रिवि. खाली : 'भारें धरा हे आध जाऊं पाहे ।' – दावि १२७. [सं. अधस्]

**आध** वि. अर्धे; अपुरे : 'हरे चंद्रमा आधा ऐसा । वाहिजत असे शिरसा । निरंतर ।' – राज्ञा ९.४८२. [सं. अर्ध]

**आधडणे** क्रि. खूप जेवणे; अधाशीपणाने खाणे. (व.) [सं. अद्]

**आधडा** वि. मूर्ख; अडाणी; अर्धवट: 'नकरी तो अधडा दुराग्रही ।' – दावि २.४९. [सं. अर्ध]

**आधण** न. १. विस्तववावर तापविल्यामुळे कढत होऊन उकळू लागलेले पाणी; उकळण्यासाठी विस्तववावर ठेवलेले पाणी: 'जरि अमृत घालूं आंधणा । कापुरु मेळउ इंधना ।' – ऋ ५१. २. त्या प्रकारची पाण्याची अवस्था; उकळी; कढ (क्रि. येणे). ३.गूळ, काकवी वगैरे करिता काहिलीत कढण्यासाठी घातलेला उसाचा रस. ४. (ल.) राज्य, एखादा कारभार, संसार इत्यादी व्यवस्थित चालविण्याविषयीची जबाबदारी किंवा भरवसा (सामान्यत:) ओझे; भार (क्रि. ठेवणे). : 'विठ्ठलराव कोरेगांवकर आले असता करार करून गेले आहेत. त्यावरी याणी आधण ठेविले आहे.' – पेद ८.४५. ५. विसंबणूक; भरवसा. पहा : **आधाण** [सं. आदहन ] (वा.) **जिवावरचे आधण उतरणे** – आलेले मोठे संकट आपोआप नाहीसे होणे; टळणे. **आधण निववणे** – मकरसंक्रांतीच्या दिवशी सुवासिनी स्त्रीने ब्राह्मणाच्या घरी जाऊन त्याच्या चुलीवर ठेवलेल्या आधणात (भाताच्या भांड्यात) सोन्यारूप्याचा तुकडा घालून तांदूळ वैरणे.

**आधण** अपमृत्यू.

**आधणणे** क्रि. आधण येणे; उकळी येणे.

**आधधणी** वि. अर्धवट जेवलेला; अर्धपोटी; अर्धतृप्त : 'आधधणी कदा नूठिं ।'–ज्ञा १६.३०.

**आधपलिप** वि. अर्धवट भाजलेला; होरपळलेला : 'आधपलिपिं तंवकें । इंद्रियें धरिली ।' –राज्ञा १२.४६.

**आधमण** पहा: **अदमण**

**आधमर्ण्य** न. कर्जदाराची परिस्थिती, कुवत.

**आधमुसा** वि. अर्धमेला; आदमुसा: 'त्यांचा जीव आधमुसा झाला.'– जमा १४.

**आधरणे** क्रि. आदरणे; स्वीकारणे : 'तो होवावोया भ्रतारू । आधरीला नेम आचरू ।'– श्रीकृच ११.८.

**आधरून** क्रिवि. हटकून

**आधल** न. पितळेचे पातेल्यासारखे उभट भांडे. याचा उपयोग धार काढताना करतात. (खा.) [सं. आ+धा]

**आधला** पु. एक पैसा. पहा: **अधेला** (खा.) [सं. अर्ध]

**आधला** स्त्री. अधोली; दोन शेरांचे माप: 'आधलानी खीर, गावभवते फीर.'– एहोराभा ६.५.

**आधला** वि. पूर्वीचा; पहिला. पहा: **आदला** : 'आतां होताति आधलें । कृष्णमूर्तीलागीं ।'– ज्ञा ११.६०६. [सं. आदिल]

**आधला–आधलो** पु. अधेला; बिनविषारी सापाच्या जातीचा प्राणी.

**आधव** स्त्री. उत्कट इच्छा: 'फळाचिये आधवे । ऐसें कर्म करी ।'– ज्ञा ५.७३.

**आधवडी** पहा : **अधोडी.** पशूचे कातडे. [राजकोश संपा. मराठे.]

**आधस्त** वि. पु. हीन प्रतीचा: 'ऐसा जात्यंध आधस्तु: वरि भवरोगी ग्रहस्तु' – ऋव ७.

**आधळा** वि. ज्यातील पाणी आटले नाही असा कोवळा (नारळ). पहा : **आडसर** (कों.)

**आधंतर** क्रिवि. अधांत्री; वरच्या वर; अर्धवट : 'कानाचेनि गवाक्षद्वारें । बोलाचें रश्मि आधंतरें ।'– राज्ञा ७.१९५.

**आधा** वि. अर्धा; निम्मा: 'हरें चंद्रमा आधा ऐसा । वाहिजत असे शिरसा ।'

– ज्ञा ९.४८६. [सं. अर्ध]

**आधा** पु. भोपळ्याचा तुंबा : 'एकी दोणां आधांचा मधु घालीति' – लीचपू ४१.

**आधाइणे** क्रि. भिणे : 'मृत्यूसि आधाइलें ।' – राज्ञा १३.२४.

**आधाटी** स्त्री. (आघाटीबद्दल चुकीने प्रयोग). एक वाद्य. पहा: **आघाटी** : 'हातीं घेउनियां आधाटी ।'– उषा १८१३.

**आधाड** वि. डोंगराच्या उतरणीवरील : 'आधाड तरु निरुपण' – लीचउ ११२.

**आधाड–डा** पु. तुटलेला कडा : 'जिये ब्रम्हाचळाचा आधाडा ।'– ज्ञा ७६९.२. मध्यभाग.

**आधाण** पहा : **आधण** : 'बाईसीं आधाण ठेविलें'– लीचउ १०५.

**आधाण–न** न. अपमृत्यू, मोठे अरिष्ट; जिवावरचे दुखणे; मरण प्राप्त होण्यासारखे मोठे भयंकर संकट. पहा : **आधण** ५. (क्रि. येणे, जाणे, चुकणे, टळणे, वारणे, निवारणे). [सं.]

**आधातुर** वि. अर्धतृप्त; अर्धभुकेला; अर्धपोटी : 'जेथ चैतन्यें आधातुरें । करूनि असिजे ।'– ज्ञा ६.२८०. [स अर्ध+ आतुरे]

**आधातुरी** स्त्री. आंथरूण; शय्या. आथरी : 'विरहानलाचा भरी । आंबे पालवे यांची करौनि आधातुरी ।' – शिव २८३. [सं. अर्ध:+आस्तरण]

**आधातुरे** वि. अर्धतृप्त; अतृप्त.

**आधाधिणे** क्रि. भिणे; भीती घेणे : 'मृत्यूनि आधाधिलें । तिहीं निरंजन सेविलें ।'– ज्ञा १३.२३. [सं.]

**आधान** आधाण; अपमृत्यू; मोठे अरिष्ट. पहा **: आधण**. ५. : 'शेवटी तितक्याही आधानातून पार पडून आपल्या कुटुंबात येऊन पोहोचला.'– बाळ मित्र २.२०४.

**आधान** न. १. स्थापना; प्रस्थापना; ठेवणे. २. अग्निहोत्र ग्रहणाचा संस्कार, अग्न्याधान. ३. गर्भाधान या शब्दाचे संक्षिप्त रूप. ४. एखादी वस्तू धारण करणारा; समाविष्ट करून घेणारा. [सं.]

**आधायक** वि. ठेवणारा; स्थापन करणारा. [सं.]

**आधार** पु. १. आश्रय; टेका; धीर; (अक्षरश: व लाक्षणिक) धारण करण्याची, सहन करण्याची शक्ती; दिलेला आश्रय.२. निर्वाहाच्या साधनांची मदत; आश्रय; आसरा. ३. (ल.) फूस; मदत; कृपा; संमती; मान्यता; अधिकार. ४. प्रमाण; बळ, ५. (योग.) षटचक्रांपैकी पहिले; शिश्न व गुद यांच्यामधील मूलाधारचक्र; याचा रंग तांबडा व पाकळ्या चार असून पाकळ्यांवर 'वं, शं, पं, सं' हे वर्ण असतात : 'मग कुंडलिनियेचा टेंभा । आधारीं केला उभा ।'–ज्ञा १२.५१. ६. (व्या.) सप्तमी विभक्तीचा अर्थ अधिकरण (आत, वर, कडे). ७. बांध; धरण. ८. (भूशा.) गृहीत किंवा सिद्धांतात मूलभूत धरलेली गोष्ट. [सं.](वा.) **आधार लावणे**–आश्रय देणे; मदत करणे; पाठपुरावा घेणे. **आधारास लागणे**– (एखाद्या गोष्टीच्या) मुळापर्यंत जाणे; धाऱ्यास लागणे. **आधारास लावणे–** (एखाद्या गोष्टीचा) शेवटपर्यंत छडा–तपास –शोध करणे, लावणे.

**आधारक** पु. पाया.

**आधारकमळ, चक्र, द्रुम** न. पहा : **आधार** ५ : 'आधारचक्रीं सूक्ष्म प्राण'– एभा १२.३.११२.

**आधारकाम** न. (स्था.) बांधकामाचा साचा.

**आधार किंमत** स्त्री. (कृषि) पिकाचा उत्पादन खर्च लक्षात घेऊन ठरविलेली किंमत. ही शेतकऱ्यांना मिळवून देण्याची हमी शासन घेते.

**आधारतत्त्व** न. मूलतत्त्व; गृहीत तत्त्व. [सं.]

**आधारतल** पु. (भूशा.) आधाराची, तळाची समपातळी. (ही पृथ्वीच्या आसाला समांतर अथवा आडवी असते). [सं.]

**आधारतंतु–तू** पु. (वै.) स्नायूंना आधार म्हणून तयार झालेला आंतरपेशीय तंतू.

**आधारनक्षी** स्त्री. (स्था.) कंसाकृती, खांबासारखी पल्लेदार, नक्षीदार कमान.

**आधारपटल** न. (वै.) (मस्तिष्कावरणाच्या (कवटीच्या) स्नायूंना) आधार देणारे पटल. [सं.]

**आधारपट्टी** स्त्री.(यंअ.) यंत्राच्या एखाद्या भागाला आधारभूत असणारा जाड पत्रा.

**आधारपत्र** न. १. पत्रावळीस मधोमध लावलेले लहानसे वेगळे पान; ताटाखालचे पान. २. पोथी–पुस्तकात दोन्ही बाजूस लावलेला जाड कागद वगैरे; पुष्टिपत्र. ३. प्रमाणपत्र; आधारवचन. [सं.]

**आधारपाट–आधारपट्ट** पु. (स्था.) तळपाटी.

**आधारफळी** स्त्री. इजा झालेल्या अथवा हाडे मोडलेल्या भागात हालचाल होऊ नये म्हणून बांधण्यात येणारी न वाकणारी पट्टी.

**आधारबहाल** न. ज्यावर छपराचा सर्व भार असतो ते लाकूड, तुळई इ.

**आधारबिंदु–दू** पु. तरफ; टेकू.

**आधारभंग** पु. (स्था.) तलभंग, पायाभंग. [सं.]

**आधारभुज** पु. (स्था.) बंधन, बंध, बरमा; पकड; कैची. [सं.]

**आधारभूत** वि. (राज्य.) मूलभूत; मुळाशी, पायाशी संबंधित असलेले; पायाभूत; आधार म्हणून असलेले, मानलेले; आधार झालेले.

**आधारभूत उद्योग** पु. (अर्थ.) विविध उद्योगधंद्यासाठी लागणारी यंत्रसामुग्री आणि रसायने तयार करणारा उद्योग. यामुळे इतर अनेक उद्योगधंदे चालू शकतात व अर्थव्यवस्थेवर चांगला परिणाम होतो.

**आधारमुद्रा** स्त्री. योगशास्त्रापैकी दहा मुद्रांतील एक: 'शोधूनि आधारमुद्रा बरवी ।'–ज्ञा ८.४९. [सं.]

**आधारमूळ** न. (वन.) १. मोठ्या वृक्षांना जमिनीजवळ खोडाला आधार देण्याकरिता बुंध्यापासून निघालेले व जमिनीत गेलेले मूळ. उदा. गुलमोहोर, गोरखचिंच, सावर, रबर, इ. २. वनस्पतीला आधार देणारे खोडापासून निघून हवेतून जमिनीत गेलेले टेकूसारखे मूळ. उदा. केवडा, मका इ. [सं.]

**आधाररेषा** स्त्री. (स्था.) तलरेषा, संदर्भरेषा. [सं.]

**आधारवर्ष** न. आकडेवारी, निर्देशांक इत्यादीसाठी आधारभूत धरलेले वर्ष.

**आधारविधान** न. अगोदरच सिद्ध म्हणून गृहीत धरलेले विधान; युक्तिवादात, विवेचनात आधारभूत म्हणून घेतलेले विधान. [सं.]

**आधारवृत्त** न. (यंअ.) दाते असलेल्या अंतर्वलित चक्राचे वर्तुळ.

**आधारशक्ति–क्ती** स्त्री. १. (योग.) मूलाधारचक्र; पहा : **आधार.**५ : 'आधारशक्तीचिंया अंकीं ।'– ज्ञा १२.५. २. अधिष्ठान; माया; ब्रह्म.

**आधारसंरचना** स्त्री. (राज्य.) एखाद्या संघटनेचे किंवा व्यवस्थेचे मूलभूत

घटक; आर्थिक विकासासाठी आवश्यक समजली जाणारी रस्ते, वीज, शाळा, कारखाने इत्यादी साधनसामग्री; विकासासाठी आधारभूत असलेली सामग्री. [सं.]

**आधारसामग्री** स्त्री. एखाद्या विषयाचा संशोधनात्मक अभ्यास करण्यासाठी जमविलेली आवश्यक माहिती. अशा माहितीचे शास्त्रीय दृष्टिकोनातून विश्लेषण करून निष्कर्ष काढले जातात. [सं.]

**आधारस्तंभ** पु. १. ज्याच्या मदतीने इमारत टिकून राहते असा खांब. २. (ल.) भक्कम पाठिंबा देणारा (मनुष्य); धुरीण; अग्रणी; नेता.[सं.]

**आधारस्थिरांक** न. मोजमापासाठी गृहीत धरलेला अंक (राशी.) (लांबी अथवा उंचीच्या मोजमापात वापरतात). [सं.]

**आधारास पंथ** पु. एखादी गोष्ट समजण्यासाठी, सिद्ध करण्यासाठी लागणारी कारणपरंपरा, साधन, लक्षण; विशेषतः नकारात्मक उपयोग. क्रि. लावणे, लागणे, दिसणे, असणे.

**आधारांक** पु. (ग.) घात करण्याची क्रिया ज्या अंकावर केली जाते तो अंक. उदा. $अ^{५}$ यात ५ हा घातांक व अ हा आधारांक आहे. [सं.]

**आधारित** स्त्री. आधार असलेली लांबी.

**आधारी** स्त्री. खिडकीच्या आधारासाठी उपयोगात आणलेले लाकूड : 'सहा भंडाऱ्या (कपाटे किंवा फडताळे)विटालीसुद्धा अकरा तुळईची तोडे व सात खिडक्यावरील आधाऱ्या.'– पुनसं २.१५८.

**आधारी** स्त्री. बंदीखाना : 'लोभाचिए आधारिए घातले ।'– वछा ४२६.

**आधारी** स्त्री. थैली; झोळणा : 'कव्हणा एका माहात्मेयाचीए आधारीए परीसु होता.'– लीचपू ४४७. दृपा ५४.

**आधारीएचा** वि. जवळचा; ताब्यातला : 'आधारीएचा परीसु ।'– दृपा २८.

**आधावती** वि. मूळ कारण असणारी : 'त्या संसाराची आधावती । गुणसाम्यें तोचि प्रकृति ।'–एभा २८.२०१. [सं. अधस्+वर्ती]

**आधांतुरे** क्रिवि. अधांतरी; अंतराळी; निराधार. [सं.अर्ध+अंतर]

**आधि–धी** पु. स्त्री. मानसिक दुःख; भीती, शोक, चिंता इत्यादिकांपासून होणारे दुःख : 'ते बुडाले द्वंद्व संधी । आधि व्याधि महार्णवी ।' – एभा २.२८९.

स्त्री. १. (व्यापक.) पाठीमागे लागणारे लचांड, पीडा, उपाधी, कुलंगडे, खेंकटें. २. (ल.) उत्कंठा : 'हा बोलु आइकत खेवीं । अर्जुना आधि न माये जीवीं ।।'– ज्ञा १७.३२६. [सं. आधि]

**आधि–धी** पु. करार; गहाण; वायदा.

**आधिकरणिक** पु. न्यायाधीश.

**आधिक्य** न. १. अधिकपणा; मोठेपणा; बहुलता. २. अतिरेक. [सं.]

**आधिदैविक** वि. १. इंद्रियाधिष्ठित देवतांसंबंधी; स्वर्गातील देवांसंबंधी; देवतोपदिष्ट; अधिदेवतेच्या कक्षेतील, सामर्थ्यातील. अधिदेवता २. देवकृत; दैवी; परमेश्वरी प्रेरणेने उत्पन्न झालेले. [सं.]

**आधिदैविक ताप** पु. देवांकडून, निसर्गाकडून शीत, उष्ण, अतिवृष्टी, अनावृष्टी, भूकंपादींमुळे होणारे दुःख: 'देवापासूनि तो आधिदैविक । मानसताप तो अध्यात्मिक ।'– एभा २२. ३०९. [सं.]

**आधिदैविक विवेचन** न. सर्व परमेश्वरकृत आहे असे स्पष्टीकरण : 'पांचभौतिक सूर्याच्या जड किंवा अचेतन गोळ्यात तदधिष्ठात्री सूर्य या नावाची एक देवता असून तीच जड सूर्याचे व्यवहार चालवते असें जेव्हां आपण मानतों तेव्हा त्यास आधिदैविक विवेचन म्हणतात.'– गीर ६२. [सं.]

**आधिनी** स्त्री. अजीजी; आर्जव; विनवणी : 'त्याणी बहुत आधिनी करून गुन्हेगारीबाबत २५ लाख रुपये याचा निशा देऊन तेथून कूच करविले.' – होकै १६.

**आधिपत्य** न. १. स्वामित्व; मालकी; अधिकार; धनीपणा. २. प्रतिष्ठा; गौरव; बडेजाव. [सं.]

**आधिविधी** क्रिवि. अगोदर; सर्वांच्या आधी.

**आधिभौतिक** वि. १. अधिभूतासंबंधी; प्राण्यासंबंधी; जड किंवा गोचर जगासंबंधी. २. आद्यतत्त्वासंबंधी. ३. जड; स्थूल; पंचभूतात्मक; द्रव्यात्मक; प्राकृतिक.

**आधिभौतिक ताप** पु. स्वशरीराहून भिन्न अशा चक्षुगोचर प्राण्यांपासून होणारे दुःख. पहा : **त्रिविधताप**

**आधिभौतिक विवेचन** न. जड सृष्टीतील पदार्थ आपल्या इंद्रियांना ज्याप्रमाणे गोचर होतात त्याचप्रमाणे ते आहेत. त्यापलीकडे काही नाही अशा दृष्टीने त्याबद्दल विचार करणे. [सं.]

**आधिराज्य** सार्वभौम अधिकार.

**आधिल** वि. पहिला; अगोदरचा : 'परपुरुषीं रतलें मन । आधिला भ्रतार नावडे जाण.'– कथासारामृत ११.११०. आधीचे; पूर्वीचे: 'आधिली घरिचे पुत्त' – लीचपू ४९८. [सं. आदिल]

**आधिला** वि. अर्धा. [सं. अर्ध]

**आधिवेदनिक** न. नवऱ्याने दुसरी बायको करताना पहिल्या बायकोला (तिची समजूत घालण्याकरिता) दिलेले स्त्रीधन. [सं.]

**आधिव्याधि–धी** स्त्री. मानसिक व शारीरिक दुःख. [सं.]

**आधी** क्रिवि. अगोदर; पूर्वी; मुळात : 'आधींच समुद्र पाहीं । तेथ दुवाडपण कवणा नाहीं ।' – ज्ञा १.११७.

**आधीन** वि. स्वाधीन; ताब्यातील; नियंत्रित : 'देखे इंद्रियांआधीन होईजे ।'– ज्ञा २.११९.

**आधील** वि. अगोदरचा; पूर्वीचा; पहिला. [सं.]

**आधीविधी चे बि– दी** – सर्वांच्या आधी; अगोदर; लवकर.

**आधुक** वि. अधाशी; खाखा करणारा : 'मुरक चढती कुणी भूक म्हणती द्वीज आधुक तशा ब्राम्हणी ।' – राला १०८. [सं. अद्=खाणे]

**आधुत** शीर्ष न. (नृत्य) डोके एकदाच किंचित वाकडे करणे व मग उंच करणे. गर्व, असंभाव्य गोष्ट घडून येणे वगैरे गोष्टींचा द्योतक अभिनय. [सं.]

**आधुनिक** वि. अलीकडचा; नूतन; सांप्रतचा; आताचा. [सं.]

**आधुनिकीकरण** न. १. जुन्या गोष्टी, आचार विचार इ. ना चालू काळात ग्राह्य ठरेल असे रूप देणे; नवे आचारविचार, राहणी इत्यादींचा अंगीकार. २. (अर्थ.) एखादे अत्यंत नवीन, प्रगत तंत्रज्ञान उत्पादनपद्धतीत आणणे. [सं.]

**आधृत** वि. (कायदा) वर आधारलेले.

**आधेय** वि. १. ठेवलेला, स्थापिलेला; निहित. २. आश्रय दिलेला; आश्रित; आधार देण्यास योग्य: 'अभय मी आधारु । आधेय मी ।।' –

ज्ञा १८.११९५. ३. आत असलेला; भरलेला; व्यापलेला. ४. स्थापायचा; ठेवायचा. ५. गहाण, ठेव म्हणून ठेवायचा. [सं.]

**आधेले** न. एका जातीचा बिनविषारी साप.

**आधेले** न. अर्ध्या ताटात जेवणे; नवराबायकोने एकाच ताटात जेवणे.

**आधोपर** न. (डोंगराची) उतरण : 'दुर्गाचां आधोपरी एकि रिंगणी फुलली होती'– लीचउ ४३२.

**आधोरण** पु. हत्तीचा महात, माहूत. [सं.]

**आधोरी** क्रिवि. अर्ध्या मार्गात.

**आधोले** न. अधेला; एक साप.

**आधोळी आधौळी** स्त्री. धूळधाण : 'ऐसी आधोळी झाली पायाळांची : तिये वेळे' – रुस्व २३२९.

**आधौडि** वि. आंदोलित : 'परागाचा धुळिरा... अधौडि जाली ।'– उगी ४८.५.४३७.

**आध्मान** न. पोटात वात धरणे; गुबारा धरणे; पोट फुगणे : 'पक्व द्राक्षे.... रक्तपित्त व आध्मान यांचा नाश करतात ?'– फचि १०६. [सं.]

**आध्यात्मिक** वि. १. अध्यात्मज्ञानविषयक; तत्त्वज्ञानासंबंधी. पहा : **अध्यात्म** २. ईश्वर; परब्रह्म, आत्मा या संबंधी; पारमार्थिक : 'जे सात्विकाचेनि वडपें । गेलें अध्यात्मिक खरपें ।'– ज्ञा ६.४९०. ३. धार्मिक. ४. मानसिक; बौद्धिक. [सं.]

**आध्यात्मिक ताप** पु. देह, इंद्रिये व प्राण यांच्यापासून होणारे दु:ख; स्थूल व सूक्ष्म शरीरांमध्ये होणारे आधिव्याधिरूप दु:ख. [सं.]

**आध्यात्मिक मार्ग** पु. आत्म्याच्या उन्नतीसाठी धार्मिक आचरणाचा किंवा तत्त्वज्ञानाने निर्दिष्ट केलेला मार्ग. [सं.]

**आध्यात्मिक संस्कृती** स्त्री. अपार्थिव संस्कृती [सं.]

**आध्यान करणे** सक्रि. आधीन करणे : स्वाधीन करणे : 'मग ज्ञानोजी बोलिला कीं माझी तिसरी तक्षिम माझा भाऊ लाखोजी आहे. त्याचे आध्यान केले.'– शिचसा ५.२३६.

**आध्यास** पु. ध्यास, छंद, नाद : 'आसो हें, मज हाचि आध्यासु । जो वानावा चिदमेसु'– ऋव ६७९.

**आध्येन** वि. अज्ञानी : 'चोभा म्हणे मी आध्येन'– उह २२९५.

**आध्वर्यव** न. अध्वर्यु नामक ऋत्विजाने करावयाचे श्रौतस्मार्त विषयक कर्म. [सं.]

**आध्वाचा** क्रिवि. १.आधुनिक; अलीकडचा. २. उपटसुंभ; उपऱ्या.

**आन** स्त्री. वक्त; संकटप्रसंग. (व.)

**आन** स्त्री. मानमर्यादा; प्रतिष्ठा : 'श्रीमंतांनी आमची आन राखून घ्यावे. आम्ही लेकरें आहोंत'– पेद २५ पत्र २५५.
सना. तो.

**आन** न. अन्न : 'भीक्षेचे आन उरले. सींकां ठेवितो' – पंचो ६९.१५.

**आन** स्त्री शपथ. पहा : **आण**

**आन** अ. ऐन; अतिशय; सपाटून. उदा. आन महागाई– उन्ह–पाऊस इ. [फा. ऐन]

**आन** उदा. आणि. पहा : **अन्, अन** : 'म्हणौनि आठै सात्विकांचा मेळावा केला आन गेलो.'– ऋ ६०.
वि. १. दुसरे; निराळे; भिन्न; वेगळे; अन्य; अन्यथा : 'मग आन कांहीं आहे । पापांवाचुनी ।'– ज्ञा १.२४८. २. (ल.) विचित्र : 'नाभी बाळे आन करीन.'– उषा २८.१०. [सं. अन्य]

**आनआन** क्रिवि. स्वतंत्रपणे; निरनिराळे : 'न करितां सद्‌गुरू भजन । नव्हे भववृक्षाचें छेदन । जरी कोटी कोटी साधन । आनआन केलिया ।'– एभा १२.४७२.[अन्यचे द्वि.] (वा.) **आन आन करणे–** वेगवेगळे पदार्थ करणे : 'बाई : श्रीप्रभुचां ठाइं आनआन करा.'– लीच २.२०.

**आनआने** अ. निरनिराळ्या प्रकारे.

**आनक** पु. १. नगारा. २. गर्जणारा मेघ. [सं.]

**आनकदुंदुभी** पु. नगारा; नौबत.

**आनकार** पु. प्रकार : 'तो गाये बैसे नाचे । तितुके आनकार तयाचे ।'– श्रीकृच १३.१८५.

**आनखशिख** अ क्रिवि. पायाच्या बोटाच्या नखापासून शेंडीपर्यंत; सर्व शरीरभर; नखशिखान्त. [सं. आ+नख+शिखा]

**आनखाग्र** क्रिवि. संपूर्ण; नखाच्या टोकापासून : 'राम आनखाग्र पाहिला'– एवाका २३६.

**आनत** वि. १. वाकलेला. २. वंदन करणारा; नम्र. [सं.]

**आनती** स्त्री. (यंअ.) १. वाक; लवण. २. क्लंडलेली, उताराची अवस्था. [सं.]

**आनती** स्त्री. (भौ.) क्षितिजसमांतर किंवा क्षितिजलंबरेषा यापासून झालेल्या विचलनाचे मोजमाप. [सं.]

**आनत्व न** भिनत्व : 'आनत्व जाला आपणचि'– नाम ४६०.

**आनद्धवाद्य** न. कातड्याने मढविलेले वाद्य; याचे प्रकार – पखवाज, नाल, तबला, बाह्या, डफ, संबळ, नगारा, चौघडा, ताशा, ढोल, मरफा, खंजिरी, डौर, कुडबुडे इत्यादी. [सं.]

**आनन** न. १. तोंड; मुख. २. चेहरा. [सं.]

**आनबान** स्त्री. प्रतिष्ठेबाबत तेढ, चुरस : 'दरबारांत व तमाम गांवांत अफवा कीं, सासूसुनेसी आनबान कीं, मातुश्रींचे चित्तामध्यें अंबिकाबाईनें निराळा पराक्रम न करावा.'– पेद ४०.५९.

**आनभाष** स्त्री. आणभाक; आणशपथ : 'त्याची व मोगलाची आनभाष झाली की साल दरसाल घासदाणा जे देता ते घ्यावे इजाफा कोठें न घ्यावयाची.'– पेद २०.४४.

**आनमन** न. (भौ.) वाकण्याचा, वळण्याचा, स्थितिस्थापकत्वाचा गुणधर्म, अवस्था. [सं.]

**आनमान** क्रिवि. १. अनिश्चितपणे; संशयाने; कुंठित होऊन : 'इंग्रज बहाद्दर याचा बाजीरावासाहेब याची फौजेची नोकानोकी होऊन आपले जागी आनमान राहिले.'– पेद ४१.१९६. २. काचकूच; कसूर : 'बारा बैलांचं काम करून घ्या की, आनमान केलं तर इचारा ।'–रैत २५.

**आनम्य** वि. सहज लवणारा, वाकणारा, वळणारा, नरम; मृदू; लवचीक. [सं.]

**आनम्यता** स्त्री. (भौ.) लवचिकपणा; हवे तसे वळण्याचा, वाकण्याचा गुणधर्म. [सं.]

**आनयन** न. १. आणणे. २. उपनयन. [सं.]

**आनर्थक्य** न. निरुपयोगीपणा. [सं. अनर्थक]

**आनव** स्त्री. देवताचक्रातील कर्मभूमी, अष्टौ देवयोनी, अंतराळ आणि स्वर्ग या स्थानातील देवता : 'बहात्तरी कोडी आनव' – सूत्रविद्या १०.

**आनवा** पहा : **अनवा** : 'नवरत्नामधि चंद्र पाहिला तेजस्वी आनवा ।' – सला ५३.
वि. सर्वोत्कृष्ट; अमौलिक. [सं. नव]

**आनस** भात. पहा : **अन्न** (कों.)

**आनसा** वि. दुसरा; निराळा; इतर. [सं. अन्य + सदृश्]

**आनसारिखे** वि. अन्यथा; खोटे; अन्यसारिखे; विरुद्ध : 'उपाध्येपण आपण खात आलो आहे. यासी आनसारिखे होये तरी आपण गोताचा अन्यायी'–ऐसंसा १.११५.

**आन होणे** क्रि. पारखा होणे; दुरावणे : 'तैसा हा एथचिया जवळिका आन जाला असे.'– लीचउ २७२.

**आनंतर्य** न. १. अंतर नसणे; दोन गोष्टींमध्ये अंतराचा अभाव; अखंडपणा; एकसूत्रीपणा; अत्रुटितपणा (जागेचा अथवा वेळेचा). २. सातत्य; सान्निध्य. [सं.]

**आनंत्य** न. १. शाश्वतपणा; अपरंपारपणा (कालाचा किंवा स्थलाचा). २. अमर्यादपणा. पहा : **अनंतत्व** २. (ग.) मूळ ठिकाणापासून कितीही मोठे अंतर घेतले तरी त्या मर्यादेत बसू शकणार नाही असा 'काल्पनिक' बिंदू वा स्थान. [सं.]

**आनंद** पु. १. हर्ष; सुख; संतोष; उल्हास; समाधान; उत्साह; आल्हाद; प्रमोद. आत्मानंद, ब्रह्मानंद, विषयानंद, विद्यानंद व योगानंद हे पाच आनंद पंचदशीत सांगितले आहेत. २. संन्यासी व गोसावी यांचा एक संप्रदाय : 'हा (विठ्ठल) भीमातीर दिगंबर । आदिपुरुष परात्पर । आनंद सांप्रदाय थोर । तेथूनिया वाढिला ।'– हरि. ३६.१९७. ३. साठ संवत्सरांतील ४८ वे संवत्सर. ४. आपल्याला हवे ते घडल्यामुळे होणारी मनाची अवस्था. ५. सुखाची भावना. ६. (ज्यो.) एक शुभयोग.
न. ब्रह्म; ईश्वर : 'स एको ब्रह्मण आनंद ।' – तैत्तिरीय उपनिषद् २.८.३.६. [सं. आ+नन्द्] (वा.) **आनंद गगनात न मावणे** – कमालीचा आनंद होणे. **आनंद पिकणे–** अतिशय आनंद होणे : 'आनंद पांडुचा पिकला ।'– मोआदि २०.१ **आनंद ब्रह्मांडात न मावणे**– अतिशय आनंद होणे; आनंदाने बेहोष, बेभान होणे. **आनंदाचे भरते येणे–** अतिशय आनंद होणे; आनंदाने ऊर दाटणे : 'आनंदाचें भरतें तेणें राजाला लोटलें'– विक २७. **आनंदाने टाळी पिटणे**– अतिशय आनंद होणे; आनंद व्यक्त करणे.

**आनंदकंद** पु. आनंदाचा उगम; मूळ; गड्डा; झरा; परमेश्वर : 'आनंदकंद ऐसा । हा हिंद देश माझा ।'– टेकाडे आनंदगीत. [सं.]

**आनंदकोश** पु. आत्म्याच्या आवरणाच्या पंचकोशांपैकी शेवटचा कोश; अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय असे पाच कोश मानतात. सद्वर्तन आणि चांगलेपणा ठेवून त्यात आनंद मानण्याचा धर्म. या कोशाची देहाशी (कारणदेह किंवा अविद्या यांच्याशी) सांगड आहे : 'चित्त जेव्हा वृत्तिशून्य । ध्येय ध्याता न दिसे अन्य । अनुभवा आलें शुद्ध चैतन्य । आनंदकोश ते समयीं ।'– निगमागमसार ८.२७. [सं.]

**आनंदघन** वि. १. पूर्ण व शुद्ध आनंदाने परिपूर्ण; केवळ आनंदाने बनलेला. २. (ल.) ब्रह्म; परमेश्वर : 'जेथे भेटे आनंदघन केवल ब्रह्म ।' [सं.]

**आनंदणे** अक्रि. हर्ष पावणे; सुखी होणे; उल्हासित असणे.

**आनंदन** न. आनंद; सुख; आनंद देणे–पावणे.
वि. आनंददायक; आल्हाददायक : 'वरी आनंदीनी श्रीकृष्णकथा ।'– वच्छाहरण २७. [सं.]

**आनंदबाजार** पु. मनोरंजनासाठी, करमणुकीसाठी भरवलेली जत्रा; मौजमजा, खाणेपिणे इत्यादींसाठी योजलेला उत्सव. [सं.]

**आनंदभैरव (वटी)** पु. (वै.) एक रसायन; बचनाग, मिऱ्ये, पिंपळी, टाकणखाराची लाही व हिंगूळ यांचे समभाग चूर्ण करून केलेली वडी. [सं.]

**आनंदभैरवी** स्त्री. (संगीत.) एक राग, गानसमय प्रात:काल. हा भैरवाचाच एक प्रकार आहे. [सं.]

**आनंदमय** वि. हर्षयुक्त; संतुष्ट; आनंदाने भरलेले.

**आनंदमय कोश** पु. कारण–शरीर; सत्त्वप्रधान ज्ञान. पहा : **आनंदकोश**

**आनंदराडी चालणे** क्रि. घरी कुलदैवतेसमोर विस्तवाच्या खाईत तीन पावले पुढे जाऊन तीन पावले मागे येण्याचा नवस. [मा.तं.कों पृ. ३८]

**आनंदवणे** क्रि. आनंद देणे; सुख देणे; संतोषित करणे : 'तूं सुखानें भावी युवराजांसह त्यांना आनंदविशील.'– राचं १६५.

**आनंदवन** न. काशी क्षेत्र : 'दंडकारण्य बृहद्वन । नैमिषारण्य आनंदवन ।'– एभा १८.१५५. [सं.]

**आनंदवनभुवन** न. रामदासांनी महाराष्ट्राकरिता वापरलेले आलंकारिक नाव : मोडली, मांडली क्षेत्रे आनंदवनभूवनीं ।'– राक. [सं.]

**आनंदवल्ली** स्त्री. १. (ल.) भांग. २. तैत्तरीय शाखेच्या उपनिषदांपैकी एक उपनिषद. [सं.]

**आनंदवृत्ति–त्ती** स्त्री. आनंदी स्वभाव.
वि. रंगेल; आनंदी. [सं.]

**आनंदाचे युद्ध** न. प्रेमकलह; मित्रकलह. [सं.]

**आनंदातिशय** पु. अतिशय आनंदाची अवस्था; अत्यानंद; अत्यानंदस्थिती. [सं.]

**आनंदाश्रु–श्रू** पु. अतिशय आनंदामुळे डोळ्यातून येणारे पाणी. (क्रि. येणे, आणणे.). [सं.]

**आनंदित** वि. संतुष्ट; सुखी; हर्ष पावलेला; ज्याला आनंद झाला आहे असा. [सं.]

**आनंदी** वि. हर्षयुक्त; रंगेल; उल्हासी; हास्यमुख.

**आनंदीआनंद** पु. पूर्णानंद; अतिशय आनंद; जिकडेतिकडे सर्वत्र आनंद.

**आनाकानी** स्त्री. दुर्लक्ष; कानाडोळा; चालढकल; डोळेझाक; टंगळमंगळ; अळंटळं; टाळाटाळ; निष्काळजीपणा. (हिं.)[सं. अनाकर्णन]

**आनागुना** पहा : **आनाकानी** (व.)

**आनाड** वि. १. अज्ञानी; अडाणी : 'चि. माधवरायासी लेकुरपणापासून आमची सवे आणि तो आनाड.....येणेकरून चैन पडत नाहीं.'– चंद्रचूड १३२. २. नास्तिक : 'तीर्थी भाव फळे । येथें अनाड ते

वळे ।।' – तुगा १.११४.

**आनाद** पु. पहा : **आनंद** (कात.) [आनंदचा अप.]

**आनाधार** पु. भोजन : 'तयाचे घरीं आम्ही आनाधार करूं' – पंचो १४७.१४

**आनान** वि. वेगवेगळा; भिन्नभिन्न. : 'एन्हवीं दीपाप्रति काई आनान । प्रकाशु आहाती ।।' – ज्ञा ५.२७. [सं. अन्य+अन्य]

**आनार** न. डाळिंब.

**आनारिसे** वि. निराळे; वेगळे; भलते : 'जें विरहिणींचा मनीं वसें । तें बोलतां होए आनारिसें ।' – रुस्वन ३६.

**आनासारिखे** वि. वेगळा; इतरासारखा; निराळा : 'दोघेही चिद्रूपें सारिखें । कंहीं न होती आनासारिखें ।' –एभा ११.१६४.

**आनाह** पु. १. मूत्रावरोध. २. मलावरोध. [सं.]

**आनिक** स्त्री. इतर : 'ते जगद्वंद्याची अंतौरी : अनिका बाइलांचिया परी : उमैठा बोली सांघैन तरी : जाणतां कोपावें ना' – रुस्व. ७४.

**आनिकी** स्त्री. द्वैत; भ्रम; भ्रांती.

**आनित्य–आनीत्य** न. अनीती : 'बहु आनित्य अविचार । या नावं बद्ध ।' – दास. ५.७.२८. [सं. अनीति चा अप.]

**आनी, आतीक, आनींग** वि. आणिक; आणखी. २. विचित्र; निराळा : 'जे समयास धोंडोजीस मुख्याने स्वामीकडे पाठविले तो समये आनीक होता.' – पेद १०.६०.

**आनी** पहा : **अणी** : 'सीताला सासुरवास काट्याच्या आनीवरी' – जसा २८५.

**आनीआन** क्रिवि. भलतेच : 'येर मातें नेणौनि भजन । तें वायां चि गा आनीआन ।' – राज्ञा ९.३४६.

**आनीत** वि. आणलेले; जाऊन आणलेले. [सं.]

**आनीबे** पु. (कृषी.) पानवेलीवरील एक रोग.

**आनु** पु. १. अन्नाचा कण : 'ऐसे आनुआनु सांडावे ते काइ तुमचे दाइ?' लीचउ २१९२. क्षण : 'आनु न विसंबे हरि जगत्रय जीवना ।' – ज्ञागा ७५.

**आनु** वि. थोडे; अल्प; किंचित : 'येंक म्हणती येकिच खरे । आनुहि नाहीं दुसरें ।' – दास ८.२.४२. [सं. अणु]

**आनुकूल्य** न. १. अनुकूलता; युक्तता. २. (ल.) कृपा. [सं.]

**आनुचित्य** न. (विप्र.) अनौचित्य. अयोग्यपणा; योग्य नसणे. [सं. अनुचित]

**आनुता** क्रिवि. दुसरीकडे : 'एकु बैल आनुता गेला.' – लीचउ २०३.

**आनुपम्य** न. श्रेष्ठपणा; उत्कृष्टपणा; कोणी बरोबरी करू शकत नाही, विरोध करू शकत नाही अशी स्थिती; एकमेवाद्वितीयता. [सं.]

**आनुपूर्वी, आनुपूर्व्य** स्त्री. १. (एकापुढे एक असा) क्रम; शिस्त; टापटीप; पद्धत; व्यवस्था. २. संगती; एकवाक्यता; एखाद्या ग्रंथावरील टीका, टीप, भाष्य. [सं.]

**आनुभविक** वि. १. अनुभवास आलेले. पहा : **अनुभविक** २. ज्याला अनुभव आला आहे असा (मनुष्य); वहिवाटलेला. ३. (शिक्षण) अनुभव किंवा प्रयोग यांच्याशी संबंधित; अनुभवसिद्ध; प्रयोगसिद्ध; अनुभवाधिष्ठित; अनुभवाश्रित. [सं.]

**आनुमत्य** मताची एकरूपता; संमती; पसंती. [सं. अनुमत]

**आनुमानिक** वि. तर्क केलेले; अंदाजित; कार्यकारणसंबंध लक्षात घेऊन अटकळ केलेले : 'बंधमोक्षाचे ज्ञान केवळ आनुमानिक नसावे....' – एवाका २५०. [सं. अनु+मा]

**आनुरूप्य** न. अनुरूप असणे; अनुरूप असण्याचा धर्म.

**आनुलोम्य** न. १. योग्य क्रम. २. अनुकूलता. [सं.]

**आनुल्ही** स्त्री. रांजणवाडी, आंजरली. (गो.)[सं. अंध]

**आनुल्हे** न. चौघांनी वाहून नेण्याजोगे, मेण्यासारखे परंतु वरील भाग उघडा असलेले, गोव्यात रूढ असलेले एक वाहन; माचील, मंचील.(गो.)

**आनुवंशिक** वि. १. अनुवंशामुळे प्राप्त झालेला; आईवडील व इतर पूर्वज यांच्यामुळे अपत्यांमध्ये उतरलेल्या गुणदोषांमुळे निर्माण झालेला. २. पिढीजात; वारशाने मिळालेला; वडीलोपार्जित. (धन, वतन इ.).[सं.]

**आनुवंशिक घटक** पु. (वै.) मागच्या पिढीतून पुढच्या पिढीत संक्रमित झालेले गुण, दोष किंवा शरीर मूलांश. [सं.]

**आनुवंशिकता** स्त्री. १. वंशपरंपरागत प्राप्त अशी स्थिती; पिढीजातपणा. २. प्राणिज व उद्भिज या कोटीतील व्यक्तींमध्ये आपापल्या मातापितरांच्या ठायी वसत असलेले गुणदोष प्राय : उतरतात. त्यावरून जी अनुमाने काढता येतात. ती ज्यात समाविष्ट केली आहेत ते शास्त्र.

**आनुश्रविक** न. (तत्त्व.) १. वेदांत सांगितलेले कर्मानुष्ठान. २. परंपरेनुसार जे आपण ऐकलेले विचार, कथा इ. [सं.]

**आनुषंगिक** वि. १. बरोबर असणारे; सहस्थित; अनुषंगाने बरोबर येणारे. २. कार्यकारणसंबंधी; तत्संबंधी; तन्निमित्त; अनुसारी; परिणामकारक. ३. योग्य प्रमाणाचा; सदृश; तुल्य; बेताचा. ४. गौण. ५. आसक्त; परिणामस्वरूप. ६. मुख्य विषयाशी संबंधित पण दुय्यम महत्त्वाच्या गोष्टी. [सं.]

**आनुषंगिक अग्रिम** (अर्थ.) ठेवीच्या पुष्ट्यर्थ जादा दिलेली आगाऊ रक्कम.

**आनुषंगिक आकार खर्च** नैमित्तिक, प्रासंगिक किंवा प्रसंगोपात खर्च.

**आनुषंगिक कार्यवाही** स्त्री. अनुषंगाने केलेली कार्यवाही; समांतर कार्यवाही, त्यातून उद्भवलेली कार्यवाही. [सं.]

**आनुष्टणे** सक्रि. आचारात आणणे : 'ऐसी निरालंबता आनुष्टे ऐसा कवण असे ?' – लीचउ ६१६.

**आनुसाइपण** न. एकनिष्ठा : 'की निरुती हन मुके। आनुसाइपणा' – अमृ ४६७.

**आनृण्य** न. कर्ज देणे नसणे; कर्जमुक्त असणे. [सं.]

**आने** वि. अन्य. हा वेव्हार कृपासिंधु ।आनें तुटेना ।।–ऋ ४३.

**आनेआन** क्रिवि. १. दुसरे; अन्य; निराळे; भलतेच, विपरीत : 'तरि तियेसी प्राणी न भजोन । मध्येंचि करिती आनेआन ।'–स्वादि. ७.२.५१. २. परस्पर. [सं. अन्योन्य]

**आनेग** अनेक. पहा : **अनेग**. 'नाना परींची तीर्थें आनेगे । दृष्टीस पाहे मनोवेगे ।' – संतलीला २४५.

**आनैगा** पहा : **आणेगा**

**आनोज** (आनोज्) पु. अंकुर.

**आनोज** न. भीतिदायक दृश्य : 'तें आनोज देखौनि निस्वास : उठी कासिराजु भोमासुरू' – रुस्व २३५.

वि. भयभीत : 'तेव्हळीं आनोज जाला सौल्येवीरु देखौनि पातला बल्बलु आसुरु ।' रुस्व २३६९.

**आनोजणे** अक्रि. गांगरणे; बुचकळ्यात पडणे : 'ऐसे बोलतां बोलतां कवीश्वर बास नावेक आनोजले'– वृद्धाचार २६. [सं. अज्ञान]

**आनोविन** वि. वाटेल तसे; अशास्त्र रीतीने'; 'बसता एकत्र आनोविन । होईल जघन्य निमीषें'– निमा २८५.

**आनौति–ते** क्रिवि. दुसरीकडे; अन्य ठिकाणी : 'सौंदर्या आनौती वासु । पाहों नेदी ।'– ऋ ८९.

वि. दुसरी; अन्य : 'गुरुवांचोनि निरंतरीं । चिंता न करी आनौती ।'– एभा १०.१३५. [सं. अन्यत्]

**आन्वयिक** वि. १. कुलीन; चांगल्या कुळातील. २. व्यवस्थित; अनुक्रमाने आलेला. [सं.]

**आन्वयिक पोचवणी** स्त्री. (व्यापार.) प्रत्यक्षात न पोचलेल्या परंतु उभयपक्षांकडून पोचवला गेल्याचे मानण्यात आलेल्या मालाची, मालमत्तेची पोचवणी, हस्तांतरण; आनुमानिक पोचवणी.

**आन्वीक्षिकी** स्त्री. १. राजनीति शास्त्राच्या (आन्वीक्षिकी, त्रयी, वार्ता व दंडनीति) चार प्रकारांपैकी पहिला प्रकार. विचार करून, अनुमती देऊन केलेला बेत किंवा काढलेली युक्ती; तर्कशास्त्र. 'आत्मानात्मविवेक केवळ । ते आन्विक्षिकी विद्या कुशल'–एभा १६.२०५. २. अध्यात्मविद्या; आत्मानात्म विचार : 'करितां त्वंपदाचें शोधन । होय तत्पदीं समाधान । हे आन्वीक्षिकी विद्या जाण । विवेकसंपन्न पावती ।'– एभा २०.२८५. [सं. अनु+ईक्ष=पाहणे]

**आन्हिक** न. १. रोजचे धार्मिक कृत्य; नित्यकर्म. २. (सामान्यत:) नित्यकृत्य; (ल.) रोजचा उद्योग. [सं. अहन्=दिवस]

**आन्हिकी** स्त्री. दैनंदिनी; दैनिकी; रोजनिशी. [सं.]

**आप** न. उदक; पाणी; जल. [सं. अप]

**आप** सना. १. आपण स्वत : २. (ल.) आपला; स्वकीय; स्वजातीय. [सं. आत्मन]

वि. आपले; आपले स्वत:चे. सामा. शब्द – आपहस्ते; आपसुखे; आपखुषीने : 'आपकार्याहून जीवीं । परकार्यसिद्धी ।'– दास २.७.६५.
न. आपण; स्वत:; अहं. सामा. शब्द आपमर्जी, आपढंग.

**आप** पु. आप्त. (गो.)

**आप** वि. प्राप्त; स्वाधीन; स्वायत्त; आपल्या ताब्यातील : 'एथ पृथ्वीतल आपु होईल । हें महेंद्रपदही पाविजेल । परिमोह हा न फिटेल । मानसींचा ।'– ज्ञा २.६५. [सं. आप्=मिळणे]

**आपअपर** पहा : **आपपर**

**आपअवसान** न. आश्रय; थारा; स्थान : 'आपल्यास आपआवसान कोठें कांहीं लागेना'– सनदापत्रे ७१.

**आपआप, आपजात** क्रिवि. आपण होऊन; आपखुशीने; आपोआप आपल्या आपण.

**आपआपणिया** वि. आपण आपल्याला : 'आपआपणिया देखणें । सभाह्याभ्यंतर समदृष्टि ।' – एरुस्व १.५९.

**आपआपला, आपापला** वि. प्रत्येकाचा; स्वत:चा; ज्याचा त्याचा.

**आपआंगे** क्रिवि. स्वत:; स्वांगे : 'तिथें चालत जाईन आपआंगे स्वतां.'– होला १४९.

**आपई** स्त्री. १. आपलेपणा; आपलेपणाचे द्योतक कृत्य. २. परस्थळी असलेल्या मित्रास फळे, वस्त्रे इत्यादिकांची पाठविलेली भेट; देणगी; नजराणा. ३. ठेव. [सं. आत्मन्]

**आपकमाई** स्त्री. स्वत:च्या कष्टाची मिळकत : 'आमच्यातले मिळवते आपकमाईची...भाऊबीज अंबूच्या ताम्हनात टाकीत.' – गाणे २८.

**आपकाज** न. स्वत:चे काम 'तया आपकाणार्थी प्रार्थी' – ज्ञाप्र ३३०

**आपकार** पु. आजार; विकार : 'छ २८ रमजानी सेनाधुरंधर यास पित्ताचा आपकार जाला.' – नागभो २.१५२.

**आपकारणे** अ. १. स्वाभाविकपणे; नैसर्गिकरीत्या; अपघात किंवा काही विपरीत प्रकार न घडता. २. आकस्मिकपणे : 'रा. आनंदराऊ पवार यांसी आपकारणे देवाज्ञा जाहली म्हणून वर्तमान आहे.'– मइसा ११.३०.

**आपखरा** पहा : **अपक(ख) रा**

**आपखुद** वि. स्वतंत्र; दुसऱ्यावर कोणत्याही प्रकारे अवलंबून नसलेला : 'ते गृहस्थ आपखुद स्वतंत्र आहेत.'– पेद ४३.६३.

**आपखुदी** स्त्री. १. आपण स्वत:; खुद्द. २. स्वसामर्थ्य : 'तो खावंद त्या पाणियांतील आपखुदीनें होऊन.'– चित्रगुप्त ८३.

**आपखुशी–षी** स्त्री. आपली मर्जी; स्वत:ची मर्जी, इच्छा; स्वेच्छा : 'तूं आपखुषीनं माझी वस्तु मला देऊन टाक.'– के १२.७.३०.

**आपखुषीने** क्रिवि. (कायदा) स्वत:च्या मर्जीनुरूप; आपण होऊन; स्वयंप्रेरणेने; अन्य कोणीही सक्ती न करता; स्वत:च्या इच्छेने.

**आपगरजी–आपगर्जी** वि. स्वार्थी; आप्पलपोट्या; मलतबी : 'प्राणाशीं प्राण देणार नव्हे आपगर्जी राव जी जी ।'– होला १७५.

**आपगंड** वि. हट्टी; स्वच्छंदी; मनस्वी; स्वेच्छाचारी.(राजा.)

**आपगा** स्त्री. नदी : 'मला निरखितां भवच्चरणकन्यका आपगा । केका १०. [सं.]

**आपघर** न. १. आपले घर. २. नवऱ्याचे घर; सासर : 'मग आपघर त्यागूनि बापघरीं केली वस्ती ।'– सप्र ११.४९.

**आपच्छंद** पु. स्वैराचार; स्वैरवर्तन.

**आपच्छंदी** वि. स्वैर; स्वच्छंदी; नादिष्ट; मनाला येईल तसे वागणारा; मनस्वी.

**आपछ** वि. कठीण : 'आपछु काळु जाला आसतां वैरी पराभवीते'– पंचो १३९.१७.

**आपजणे** अक्रि. १. उपजणे; उत्पन्न होणे; घडणे; घडून येणे : 'पंचभूतांचे धान्य निपजें । तयाचा अन्नरस आपजे ।'– विसिंपु ६.१०. २. भासणे; वाटणे : 'जैसे स्वप्नामाजीं देखिजे । ते स्वप्नींचि साच आपजे ।'– ज्ञा २.१३९.

**आपजविणे** सक्रि. १. उत्पन्न करणे. २. तयार करून घेणे : 'माझी मूर्ति आपजवी । घराचां कोनिं बैसवी ।'– राज्ञा १३.८१३. ३. प्रयत्नपूर्वक मिळवणे : 'आपजवितां (भिक्षा) न मिळे तरी काइ?' – लीचपू २२३. [आपजणे चे प्रयोजक]

**आपजुक्** न. नवल; आश्चर्य; अप्रूप : 'व्हय त्यात काय अपजुक हाय' – रैत

**आपजेवणा** मिळवणारा : 'बटिका : हे काइ : आपजेवणेयाचे शब्द :' – लीच २.१७.

**आपटणे** उक्रि. १. आदळणे; पाडणे; जोराने टाकणे, पडणे, फोडणे; वस्तू खूप जोराने खाली टाकणे. २. मारणे; हाणणे; हाणामारी करणे. ३. (ल.) वादात पराजय करणे; हरविणे. ४. खाली येणे; आपला हट्ट सोडणे; दुसऱ्याचे म्हणणे (अटी) कबूल करणे; वादात हरणे. ५. खेटणे; शिवणे; स्पर्श करणे. (बे.) [सं. आपमन] **आपशेच अपटणे** दुसऱ्याने विनवले असताही जी गोष्ट केली नाही तीच पुढे आपण होऊन करणे.

**आपटणेधोपटणे** उक्रि. जोराने ठोकणे; आदळआपट करणे; निष्ठुरपणे मारणे.

**आपटधोपट, आपटूनधोपटून** क्रिवि. जोराने मारून ठोकून; बळजबरीने.

**आपटधोपट, आपटाआपट–टी, आपटाधोपट–टी** स्त्री. जोराने, आवेशाने मारणे; आदळ आपट; हाणमार.

**आपटबार** पु. आपटल्यावर स्फोट होणारा शोभेच्या दारूचा गोळा; शोभेच्या दारूच्या गोळ्यावर आघात करून केलेला स्फोट.

**आपटा** पु. एक वृक्षविशेष. (दसऱ्याच्या दिवशी या झाडाची पाने सोने म्हणून ज्येष्ठांना, इष्ट मित्रांना देतात.)

**आपटी** स्त्री. धक्का; पराभव; खाली पडणे; नुकसान.(वा.) **आपटी खाणे –** पराभूत होणे. [सं. आपत्]

**आपठौळ** वि. १. चहाटळ; गुंड. २. बेपर्वा; स्वच्छंदी; अपगंड; अठवर; नाठाळ; आज्ञा मोडणारा : 'कीं आपठौळ आज्ञापालनीं । मी स्थीर नव्हे ।'– ऋ. ५०.

**आपड–आपाड** स्त्री. स्पर्श; विटाळ; शिवाशीव : 'पानी वर्च्यावर भर आनि इकडे तिकडे उडवू नको. आमच्या भांड्यास्नी आपड व्हयूल ।'– अउआ ११९.

**आपडणे** अक्रि. शिवणे; स्पर्श करणे.

**आपडाधापडी** स्त्री. मारपीट : 'कुणीं तोंड उघडलं तर आपडाधापडी करू लागले'– बाविबु १४७.

**आपडी–आपडाआपड** स्त्री. शिवाशीव. (गो.)

**आपडी थापडी** स्त्री. लहान मुलांचा एक खेळ.

**आपडीशी** स्त्री. विटाळशी; रजस्वला. (कु.)

**आपढंग** पु. स्वेच्छाचार; जाणूनबुजून केलेल्या खोड्या; वेडेचार; चाळे. [हिं.]

**आपढंगी** वि. ढंगी; उनाड; स्वच्छंदी; दुर्वर्तनी.

**आपण** सना. १. स्वत:; हे सर्वनाम मी, तू, तो, आम्ही, तुम्ही, ते किंवा मी स्वत:, तू स्वत:, तो स्वत:, आम्ही स्वत:, तुम्ही स्वत: या बद्दलही योजतात. जसे : 'म्या त्याला जेऊ घातले मग आपण (स्वत:) जेवायला बसलो.' याप्रमाणेच अनेकवचनी रूपे –'आपण (तुम्ही) येत असाल तर मी येईन.' इ. २. दरबारी भाषेत बोलणारे राजे, सरदार, मोठे लोक, संपादक वगैरे प्रथमपुरुषी एकवचनी बहुमानार्थी स्वत: या अर्थी व सत्कारपूर्वक भाषणात तू या अर्थी आपण हा शब्द वापरतात.(वा.) **आपणावर आणणे, वर्तविणे–** केलेल्या कृत्यांचे यश किंवा श्रेय आपल्यावर घेणे : 'सांगतो हळूहळूच अचाटे । आपणाचवरि वर्तवितो ।' **आपणावरून जग ओळखावे –** जी आपली वृत्ती किंवा प्रवृत्ती तीच लोकांचीही असे समजावे किंवा गृहीत धरून चालावे. **आपणास म्हणविणे –** आपण मोठ्या योग्यतेचे, मोठे हुशार, निष्णात असे मिरविणे; प्रौढी सांगणे.

**आपण** पु. बाजार किंवा दुकान : 'क्षेत्र म्हणिजे शेत गहन । हाट उत्पन्न द्रव्य आपण ।' – एभा २७.३७९. [सं.]

**आपणपा–आपणपे** सना. आत्मस्वरूप; जागृती; स्वत: आपण; आपल्याकडे; आपल्या ठायी : 'जया आपणपें सांडूनि कहीं । इंद्रियग्रामावरी येणेंचि नाहीं ।'–ज्ञा ५.१०५.

**आपणया–आपणिया** सना. आपणाला; स्वत:ला; आपणपां–पें : 'आत्मा बोले भेटला । आपणया' – अमृ ६.८.

**आपण होऊन** क्रिवि. आपखुशीने; आत्मसंतोषाने; स्वत:च्या प्रेरणेने.

**आपणालेया** अ. एकट्याने; आपण होऊन : 'गोरूवें आपणालेया गेलीं'– लीच १.२६.

**आपणावणे** क्रि. आपलासा करणे; स्वीकारणे जवळ करणे : 'आता बहुतेक आर्यसमाजीय प्रचारक हिंदू शब्दास आपणावीत असतात.'– ससावा २.७०४.

**आपणुन** क्रिवि. आपण होऊन : 'आपणांत आपणुन करी रीघ ।'– दावि २९७.

**आपणे** क्रि. १. पावणे. २. प्राप्त होणे. [सं. आप्=मिळणे]

**आपत्** स्त्री. आपदा; दुर्दैव; पीडा; विपत्ती. [सं.]

**आपत** वि. नातलग; संबंधी; लाग्याबांध्याचे.[सं.आप्त] (वा.) **आपत आणि घातक–** आपल्या आप्तेष्टांचा – नातलगांचा घात करणारा दुष्ट मनुष्य; माणुसकी नसलेला.

**आपतन कोन** पु. (भौ.) प्रकाशकिरण जेव्हा एखाद्या पृष्ठभागावर पडतो तेव्हा त्या पृष्ठभागाशी पडताक्षणी त्याने केलेल्या लंबाचा कोन.

**आपतन** बिंदू आपाती किरण वस्तूच्या पृष्ठभागाच्या ज्या बिंदूवर पडतो तो.

**आपतविषयी** पु. नातलग; संबंधी; ऋणानुबंधी; सगेसोयरे. [सं. आप्त+विषय]

**आपतंत्री** वि. स्वैर; स्वतंत्र; स्वत:च्या मर्जीप्रमाणे वागणारा.

**आपती** स्त्री. आपत्ती; संकट, 'त्वरित बहुत घाई होतसे आपतीची ।'– सारुह ३.६०. [सं. आपत्ति]

**आपतृत्व** न. आपलेपणा : 'गोसावी तेयासि आपतृत्व करीति'– लीचउ २१.

**आपत्काळ** पु. प्रतिकूल; अनिष्ट; हलाखीचे वाईट दिवस. [सं. आपत्काल]

**आपत्ति–त्ती** स्त्री. १. (दारिद्र्यामुळे, आजारीपणामुळे, दुर्दैवामुळे आलेले) संकट; अडचण; हाल; दुर्दशा. (अप.) आपत्; आपत्य. २. (समाजात) प्राप्ती; मिळणे; प्राप्त होणे. उदा. सुखापत्ती, इष्टापत्ती, दु:खापत्ती, अनिष्टापत्ती. ३. अपराध. ४. तक्रार. [सं. आपत्ति]

**आपत्पुरवणी** स्त्री. वादविवादात एखादी गोष्ट घसरली किंवा बिघडली तर तिची कशीतरी संपादणी करणे; चुकीचे समर्थन करणे.

**आपत्य** न. पहा : **आपत्ती** [सं.]

**आपद्** स्त्री. विपत्ती.

**आपदणे** क्रि. रखडणे; कष्टणे; शिणणे : 'नेणतां कोणी येक ते । आपदों लागती ।'– दास १८.५.१९. [सं. आ+पद्]

**आपदा** स्त्री. १. संकट; अरिष्ट; आपत्ती : 'आपदा गिधीं चुंबिजत । उधवला ठायीं ।'– ज्ञा ७.८७. २. दु:ख; क्लेश; खाण्यावाचून किंवा दुखण्यामुळे होणारे हाल; कष्टावस्था; दुर्दशा : 'उपकारी नाहीं देखत आपदा । पुढिलाची सदा दया चित्तीं ।'–तुगा १९०३. [सं.]

**आपदार्थ** पु. वस्तू नाही असा पदार्थ : 'परमेश्वरेविण आवघेचि आपदार्थ'.

**आपदावणे** अक्रि. अडचणीत, दु:खात, संकटात, दुर्दैवाच्या फेऱ्यात सापडणे; कुचंबत राहणे. [सं. आपदा]

**आपदृष्टी** वि. स्वार्थी; मलतबी; आपल्या पुरते करणारा; पहाणारा, अप्पलपोट्या.

**आपदेश** पु. स्वदेश; आपला प्रदेश, प्रांत.

**आपद्ग्रस्त** वि. आपत्तींनी, संकटांनी गांजलेला, पीडलेला; संकटात, आपत्तीत सापडलेला. [सं.]

**आपद्धर्म** पु. वर्णाश्रमधर्मविहित कृत्य करण्याला कालाच्या प्रतिकूलतेमुळे, जो असमर्थ त्यासाठी सांगितलेला गौणमार्ग अथवा कृत्य; निरुपायास्तव करावयाची गोष्ट. [सं.]

**आपधाक–आपधाकणे** हे शब्द 'अ' मध्ये पहा : 'आपधाकें विघ्नें पळती जाण ।' – एभा ४.२०६.

**आपन्न** वि. १. विपत्तिदशा पावलेला; आपत्तीने घेरलेला; हाल–अपेष्टेत पडलेला; कष्टी. २. मिळविलेला; कमावलेला; संपादन केलेला; प्राप्त; व्याप्त. [सं.]

**आपपर** वि. १. आपला आणि दुसऱ्याचा; आपले व परके; द्वैत : 'जेथ आपपरु ऐसा । भागु नाहीं ।।'– ज्ञा ९.४०७.

**आपपरकी–आपपरकीय** वि. आपला आणि दुसऱ्याचा; स्वत:चा व परक्याचा; आपपर.

**आपपरभाव, बुद्धि, भेद, मत, वृत्ति, विचार, दृष्टि** १. आपल्या आणि दुसऱ्याच्या वस्तूंमध्ये भेद राखणे; आपले इष्टमित्र, नातलग व इतर जन यांमध्ये भेद पाहणे. २. द्वैताभाव; दुजाभाव (क्रि. पाहणे). [सं. आत्मन्+ पर]

**आपबळ** क्रिवि. आपोआप; आपण होऊन. पहा : **अपबळ**
न. स्वत:ची शक्ती; स्वसामर्थ्य; आपले स्वत:चे बळ.

**आपमतलबी** वि. स्वार्थी; आपलपोट्या; स्वत:पुरते पाहणारा : 'ज्याला मोठेपणा हवा असेल त्यानें आपमतलबी लोकांच्या कोल्हेकुईकडे लक्ष पुरविले पाहिजे.'– लोटिकेले २.५४.

**आपमती** वि. आपल्या बुद्धीने चालणारा : 'पुसौ जावें ऋषींप्रती । तंव ते सदां आपमती । आपलें मत प्रतिष्ठिती । अन्यथा देती शापातें ।'– एभा ७.१८०.
क्रिवि. आपल्या बुद्धीने : 'आपमतीं भजतां राया ।' – एभा ३.८०७.

**आपमरण** न. आपोआप येणारे मरण; आपमौती.

**आपमुखत्यार** वि. स्वतंत्र; स्वैर; अनियंत्रित.
पु. धनी.

**आपमुखत्यारी** स्त्री. स्वतंत्रता; अनियंत्रितपणा; धनीपणा; मालकी.

**आपमुरे** वि. पूर्ण टणक न झालेले; पूर्ण न बनलेले : 'मोतियें होति आपमुरीं ।'– रुस्व ७१.

**आपमोती–मौती** स्त्री. आपोआप वृद्धपणामुळे आलेले मरण.

**आपयणे** अक्रि. बोलावणे. (गो.)

**आपरस** पु. फळांचा अथवा पानांचा (पाणी न मिसळता काढलेला) आंगचा रस. उदा. ओल्या खोबऱ्याचे पाणी न घालता काढलेले दूध; नारळाचा रस.

**आपरंग** क्रिवि. आपण होऊन; आपोआप. (ना.)

**आपरापिपरी** स्त्री. (व्यायाम) एक प्रकारचा खेळ.

**आपरिवर्तन** न. (राज्य.) रचना, स्वरूप किंवा उद्देश यांत केलेला, करावयाचा बदल. [सं.]

**आपरूक–ग** न. अप्रुप; विशेष; नवल : 'मग त्यात लेका तू काय आपरूक सांगितलंस ?' – भूज ४७.

**आपरूप** न. आत्मरूप; ब्रह्मरूप.

**आपरूपी** वि. ज्याचा चेहरा, तोंडावळा बापासारखा किंवा आईसारखा नाही, निराळ्या प्रकारचा आहे असे (मूल.).

**आपलकी, आपलीक, आपलपणा, आपलेपणा** स्त्री. पु. १. मालकी; आप्तसंबंध; सोयरगत, स्नेह इ. मुळे आलेला आपलेपणा; आपलेपणामुळे उत्पन्न झालेला अभिमान, माया, पक्षपात, कैवार : 'मानिसिल झणीं आपलिक कांहीं । येरझार पाही न चुके कदा ।' – तुगा २६९७. २. (क्व.) मीपणा; अहंकार. ३. स्वाभिमान; ममता. [सं. आत्मन्] (वा.) **आपलकी लावणे, दाखविणे, माजविणे**– दृढ संबंध अथवा नाते गोते सांगणे, स्थापणे; तुम्हापैकीच मी एक आहे असे दाखवणे किंवा तशी स्वत:ची वर्तणूक ठेवणे. **आपलेपणात येणे**– वयात, उमेदीत येणे; शरीराची पूर्ण वाढ होणे : 'मी जेव्हां आपलेपणांत येऊं लागलें तेव्हां नव्या भावना खळखळूं लागल्या.' – गुपचुप (रसिकरंजन माला)

**आपलदारी** पु. मालक, स्वामी, मुख्य : 'आपलदारी अनाधिकारी असोन कर्माचारी संकरकारी.' – पेद ३४.७६.
वि. स्वार्थी.

**आपलपोटाऱ्या, आपलपोट्या** वि. स्वार्थी; स्वत:पुरते पाहणारा.

**आपलमती** अ. आपोआप; आपल्याआपण : 'बोलन बोलन आन् तोंड थकलं मंजे आपलमती चुपचाप बसन्...'– धग १०६ (व.)

**आपलवलणे** क्रि. आपुलकी वाटणे : 'सर्वज्ञें भणीतलें : कां : जावाइयाचेनि आपलवलेति'– लीचउ ३२.

**आपला** सना. १. स्वत:चा; मालकीचा. आपण या शब्दाप्रमाणे याचाही प्रयोग तिन्ही पुरुषी, दोन्ही वचनात करतात. २. कित्येकदा हा शब्द निरर्थक, वाक्यपूरणार्थक येतो. उदा. 'मी आपला येथून उठलो.' आपला हा शब्द पुष्कळ वेळा आपण या अर्थी वापरण्यात येतो. जसे:– आपल्यास किंवा आपल्याला= आपणांस (आपणची षष्टी) [सं. आत्मीय] (वा.) **आपला, आपलासा म्हणणे, समजणे–** एखाद्यास आत्मीय भावनेने किंवा मित्रत्वाच्या भावनेने वागविणे; प्रिय समजणे. तू

**आपला ऐस –** तू आपले स्वत:चे काम पहा. **आपली वाढवून खाणे**– आपमतलबीपणाने आपलेच घोडे पुढे ढकलणे; आपल्या हिताकडेच पाहणे. **आपलीशी करणे–** १. आपले म्हणणे (पक्ष, मत) सिद्ध करणे, प्रस्थापित करणे; आपली सरशी करणे. २. वश करणे; ताब्यात आणणे : 'प्रपंच वैरी मारावा । अथवा आपलासा करावा ।' – विसिंपू ७.१४४. ३. स्वत:च्या मनाप्रमाणे वागणे. **आपलेच घोडे पुढे दामटणे**– स्वार्थ साधण्याचा प्रयत्न करणे; इतरांच्या आधी आपले काम करून घेण्याचा प्रयत्न करणे : 'जो तो आपल्या गांवचं घोडं पुढं दामटू लागला.' – फगो १. **आपल्याच पायावर धोंडा पाडून घेणे**– स्वत:चे नुकसान होईल असे वागणे : 'असे ठराव करून कॉंग्रेस आपल्याच पायावर धोंडा पाडून घेत आहे.'– नौने १७९.

**आपला तुपला** वि. १. माझा तुझा; स्वत:चा व परक्याचा; आपपर. २. आपली; मालकीची; आपली; म्हटलेली (मिळकत, जिन्नस वगैरे.) आपपर किंवा आपअपर याच्यासारखेच आपला तुपला यापासून सामासिक शब्द बनतात.

**आपला माणूस, मनुष्य** पु. विश्वासाचा माणूस; प्रेमाचा मनुष्य : 'आपल्या मनुष्याला कोणी कमी कां करतो ?' – करंज्याचा फार्स २२.

**आपलाला** वि. आपआपला; ज्याचा त्याचा स्वत:चा.

**आपलिक** न. अभिमान.

**आपलूक** स्त्री. आपलेपणा; स्वकीयता. (चि.)

**आपले आपण** क्रिवि. आपखुशीने; स्वयंप्रेरणेने; आपण होऊन.

**आपलेपणा** पु. स्वाभिमान; ममता.

**आपल्या अंगी, अंगे, अंगाने** स्वत:; खुद्द.

**आपल्या आपण** क्रिवि. अंगच्या जोरावर; दुसऱ्याच्या मदतीशिवाय; स्वत:च; आपसूक.

**आपल्यात** सना. स्वगत(भाषण). जुन्या नाटकातून स्वगत या अर्थी आपल्यात हा शब्द योजीत असत : 'भीमराव :– (थांबून आपल्यांत)' – रत्नकांता २४.

**आपवणी** न. आपोआप वाहत येणारे पाणी; पाटातून वाहणारे पाणी (भांड्यातून नव्हे); बागाईत शेतीमध्ये याचा उपयोग करतात.

**आपवणे** अक्रि. बोलावणे; आमंत्रण देणे. 'आपविल्या द्विजा । अष्ट देवतांची करिती पूजा ।।' – वसा ३२.

**आपवर्ग** पु. आप्तवर्ग; नातेवाईक : 'आपवर्गि सांडिलों, गोत्रजां तुटलो' – नाम १५७१.

**आपवाद** पु. निंदा; दोष : 'बहुत दिवस म्या तुझा आपवादु आइकला होता' – पंचो १९४.

**आपशुद्धि–द्धी** स्त्री. १. स्वत:ची शुद्धी : 'आपशुद्धि नेणती ।' – दावि ४९६. २. आत्मानात्मविचार : 'दृढ करूनियां बुद्धी । आधीं घ्यावी आपशुद्धी ।।' – दास ६.१०.१२. [सं. आत्मन्+शुद्धि]

**आपशेच अपटणे** क्रि. (ल.) एखादी गोष्ट दुसऱ्याने विनवले असताही न करणे, पण ती मग स्वत: होऊन करणे.

**आपसमेळ** पु. कर्ज वगैरेचे समायोजन; तडजोड.

**आपसमेळ विलेख** पु. उभय पक्षांच्या सहमताने तयार झालेला; तडजोडीचा दस्तऐवज.

**आपसया** क्रिवि. आपसूक; आपोआप : 'तृण नाहीं तेथें पडिला दावाग्नि जाय तो विझोनि आपसया ।।' – तुगा ३४२४.

**आपसंत** वि. स्वत: पसंत केलेले : 'वडील माणसांचे विचारावाचून आपसंतपणाने केलेल्या कृत्याचे फळ भोग आतां.' – रत्नकांता २६.

**आपसा आपसांत, आपसा आपस–सी, आपसामध्ये** क्रिवि. परस्परास; आपआपल्यात; एकमेकांशी; आमच्या आमच्यात; तुमच्या तुमच्यांत, त्यांच्या त्यांच्यात; एकमेकांत.

**आपसुक–ख, आपसूक–ख** क्रिवि. आपोआप; आपण होऊन; स्वत:च्या खुशीने; राजीखुशीने.

**आपसे** क्रिवि. आपोआप; सहज; अनायासे : 'कवणाचें मन आपसें अभिलाष न करी ।' – भाए ३४.

**आपसोशी** क्रिवि. १. मन मानेल त्याप्रमाणे; कोणाचा अडथळा न मानता; स्वेच्छेने; यथेच्छ; या शब्दाचा प्रयोग ठोक देणे, इजा करणे, उट्टे काढणे इ. अर्थाच्या क्रियापदाबरोबर करतात. (राजा.) २. निर्भयपणाने; नि:शंकपणाने; परिणामाकडे लक्ष न देता; चैनीत. वि. लोभी; आपमतलबी.

**आपस्तंब** पु. १. कृष्ण यजुर्वेदावरील चार सूत्रांपैकी एका सूत्राचा प्रवर्तक ऋषी. २. आपस्तंब–सूत्राचे अनुयायी ब्राह्मण. [सं.]

**आपस्तुती** स्त्री. स्वत:ची प्रशंसा; आत्मस्तुती : 'आपस्तुतीनें दाविती थोरीव' – दावि ४८४.

**आपस्वरूप** न. आत्मस्वरूप; ब्रम्हस्वरूप : 'मग अखंड उरे आपस्वरूप ।' – दावि १२५.

**आपस्वार्थ** पु. १. (स्वार्थ याच अर्थाने आपस्वार्थ हा शब्द वापरतात) आपला स्वार्थ; स्वत:चा मतलब. २. स्वत:चे कल्याण, सोय पाहणारा.

**आपहस्तक–की, आपहस्ती–स्ते** क्रिवि. आपल्या हाताने; आपल्याकडून; आपल्या सामर्थ्याने; आपल्याच्याने; आपल्या वकुबानुरूप.

**आपंगणे** सक्रि. १. आश्रय देणे; प्रेमाने वाढविणे, संभाळणे, पोसणे, बाळगणे; आपलेसे म्हणणे : 'जे जे शरण आले । ते ते आपंगिले । पवाडे विठ्ठले ऐसे तुझे ।' –तुगा १६३६. २. स्वीकारणे; अंगीकारणे; आश्रय करणे : 'मग येथ अथवा स्वर्गी । जेथे जे देह आपंगी ।' – ज्ञा १५.३६८.

**आपंगिता** वि. आश्रयदाता; पोशिंदा : 'ज्यांसि आपंगिता नाहीं । त्यासि धरीं जो हृदयीं ।' – तुगा २२१५.

**आपा–आप्पा** पु. १. जार; ठोल्या; यजमान. (कर.) २. एक वाद्यविशेष. ३. पाणी; आग. ४. आपण स्वत: : 'आपा नूकौनियां खांडा ।' – राज्ञा १७.२५९. ५. पहा : **अप्पा**

**आपाआप** आपोआप, आपलेआपण, आपणहून.

**आपाड** वि. अपार; अत्युत्तम : 'तयांची उमाणितां कीर्ती । उणीव दिसे आपाडे ।' –मुआदि ११.९३.

पु. १. आधिक्य; मोठेपणा; महत्त्व. २. भिन्नता; अंतर : 'आरसा आरिसेयां पाहांतया । अपाडु येतुला ।।' – ज्ञा १८.२७४.

**आपातकाल** पु. (राज्य.) आणीबाणी; ज्यावर तात्काळ उपाययोजना केली पाहिजे असा आकस्मिक व अनपेक्षित घटनांचा काळ. [सं.]

**आपाततः** क्रिवि. १. खोटे ठरेतोपर्यंत, खोडून टाकीतोपर्यंत टिकणारा, चालू (मुद्दा, उलगडा, अनुमान, उपपत्ति). २. प्रथमदर्शनी; अगदी आरंभी; प्रथमच; चटकन; तत्क्षणी. ३. योगायोगाने : 'खुनाच्या प्रकरणात आपातत : गोवली गेलेली एक दुर्दैवी मुलगी ।'– प्रतिनिधी १३१.

**आपातरमणीय** वि. १. आपापतः, आरंभी चांगले दिसणारे; तात्पुरते ग्राह्य (विधान, सिद्धांत इ.). २. दिसण्यात खरे किंवा सबळ.

**आपाती** (वि.) गौण; चिल्लर.

**आपात्ती** वि. (भौ.) एखाद्या गोष्टीवर आपटणारे किंवा पडणारे (सपाट पृष्ठभागावर पडणाऱ्या प्रकाश किरणांसाठी वापरतात).

**आपाद** क्रिवि. पायापर्यंत; पायापासून : 'आपाद पां गुंतलें । पुलकांचलें ।' –ज्ञा ११.२४२. [सं. आ+पाद]

**आपादकंचुकित** वि. पायापासून मस्तकापर्यंत अंगवस्त्र घातल्यासारखे; संपूर्ण अंगावर : 'वाचा पांगुळली जेथिंची तेथ । आपादकंचुकित रोमांच आले ।।' – ज्ञा ९.५२७ [सं. आ+पाद+कंचुकी]

**आपादणे** सक्रि. १. स्वीकारणे; घेणे; मिळविणे; संपादन करणे : 'आणि आपुलालिये चाडे । आपादिलें हें मांडे ।' – ज्ञा ३.५१. २. कर्म करणे : 'करचरणें आपादिजे । घेईजे जें जें कांहीं ।' – रंयोवा ७.११६. ३. समजून घेणे : '(साधने) कव्हणे प्रयोजनें । यैसे आपादिजे ।' – विसिं १३.१७.

**आपादतलमस्तक आपादमस्तक** क्रिवि. पायाच्या तळव्यापासून डोक्यापर्यंत; नखशिखांत.

**आपादता–दिता** क्रिवि. आपाततः; प्रथमच; अगदी प्रारंभी; तत्क्षणी: 'यालागीं माझा वेद जगद्गुरु । दावी आपादतां व्यवहारू' – एभा २१.७६; 'तैसी जीवासि कर्तव्यता । सत्य नाहीं गा सर्वथां । दिसे जे कांहीं आपादितां । ते अध्यासकता मिथ्यात्वें ।' – एभा १०.२६२.

**आपादन** न. संपादन; मिळवणी; प्राप्ती : 'ऐसें ठेलें आपादन । शास्त्राचें जया ।' – ज्ञा १७.३८. [सं.]

**आपाप–आपापा** क्रिवि. १. आपोआप. : 'पापात्मबुद्धी । धरूनी मरती अपापां ।' – वामन विराटपर्व ५.१८. २. काही खटपट न करता, श्रम न करता.

**आपापला** क्रिवि. स्वतःचा, प्रत्येकाचा.

**आपार** पु. टाकाचे टोक; निब. (गो.)[पोर्तु. आपारो]

**आपाल** पु. घारगा. (व.ना.)

**आपालिपा** लपालपीचा, लपंडावाचा खेळ.

**आपांपरी** स्त्री. दुर्दशा; अव्यवस्था : 'ऐसें आपांपरी होती जाली । शरीरग्रामीं ।।' – ज्ञा ११.६६५.

**आपितर** बदमाश; खोडकर; उनाड.

**आपिक्षीर** स्त्री. गव्हल्याच्या पिठाच्या पापडीची खीर.

**आपी** पु. नातेवाईक.

**आपु** वि. १. स्वाधीन; स्वकीय; प्राप्त; हितकर्ता : 'हा सदा दुर्लभु मना । आपु नोहे साधना ।' – ज्ञा २.१४९. २. स्वतःसारखे; आपले; आप्त : 'तेणें संसरलेनि करीं । आपु विश्व ।' – ज्ञा ७.१३५.

**आपुभेदीया** पु. शरीरावर शस्त्र चालविले तरी ते आरपार निघून जाते, पण शरीर भग्न होत नाही अशी सिद्धी असणारा : 'देहावरि खर्ग घालिजे आणि पाणियां आंतौनि निगोनि जाए ऐसें जाए : यातें आपुभेदीया ऐसे म्हणिजे' – लीचपू १९८.

**आपुयिणे** क्रि. गांजणे.

**आपुलकी, आपुलिक** १. आपलेपणा; आत्मीयता. २. माया, ममता.

**आपुलेपण** न. अहंभाव.

**आपुल्याकून**क्रिवि. १. आपल्याकडून; आपणाकडून; स्वतःकडून. २. आपण होऊन. (ग्रा.)

**आपूर**वि. अपुरा; अपूर्ण : 'तरी तुमची वर्णितां स्तुती । आपूर असे माझी मती ।' – नव २२.११२. [सं. अ+पूर्]

**आपूरणे** सक्रि. भरणे; फुंकणे : 'जेथ महाशंख आपूरिले । कृष्णादिकीं ।।' – राज्ञा १.१६०.

**आपूरित** वि. पूर्ण : 'तुझेनि यशेंमही । आपूरित सुरां दिली ।' – मस्तो ६५.७. [सं. आ+पूर]

**आपूशन** न. अपोष्णी. आचमन; भोजनापूर्वी व भोजनोत्तर ब्राम्हणांनी करावयाचे आचमन : 'सुंदरमूर्ति आपूशन । करून सौमित्रानंदन ।' – वेसीस्व १.१३.

**आपेआप** क्रिवि. १. आपल्या आपण; आपण होऊन; स्वतःच : 'जरी आपेंआप आम्हासि वरी । तरी ते गोष्ट बहु बरी ।' २. स्वभावत; सहज : 'ऐसिया आपेंआप लाघविया । नमों तुज ।' – ज्ञा १४.६.

**आपेट घोडा** घोडी न दाखविलेला घोडा.

**आपैणे, आप्वणे** सक्रि.१. आमंत्रण करणे : 'तो आपैता.' (गो. कों.) २. स्वीकारणे : 'तयाचा अनरसु आपैजे' – विसिं ६.१०.

**आपैता, आपैतिया–ती, आपैते** वि. १. स्वाधीन; अनुकूल : 'तैसीं इंद्रियें आपैतीं होतीं ।' – ज्ञा २.३०२. २. प्राप्त : 'हा भिक्षुगीतार्थ धरितां चित्तीं । शांति आपैती साधकां ।' – एभा २३.९६८. ३. (चुकीने) आयते; आपोआप. [सं. आप् = मिळणे]

**आपैतिया** वि. प्राप्त.

**आपैते** वि. आयते, आपोआप.

**आपैस–सा–सी–से** क्रिवि. आपल्या आपण; आपोआप; सहज; आपसूक. पहा : **अपशांच** : 'मग समाधी विसर्जन आपैसा ।' – विसिं ११.९३.

**आपैसा** वि. आपलासा; वश; स्वाधीन. (क्रि. करणे) : 'समाधि भंगोनि कामकळे । भुलवोनि करी अपैसा ।' – मुरंशु १२.

**आपैसेया** अ. आपोआप : 'येतुलेनि आपैसेयाचि भवबंधु बिघडे : गुणचित्ताचा.' – उगी ९०.६८४.

**आपोआप** क्रिवि. १. एकदम स्फूर्तीने. २. आपल्या आपण; प्रयत्नावाचून; खटपट न करता. [आपचे द्वि.]

**आपोक्लीम** न. (ज्यो.) जन्मकुंडलीत वापीयोग होण्यासाठी ज्या चार

स्थानी सर्व ग्रह असावे लागतात असे एक स्थान. केंद्रापासून तिसऱ्या म्हणजे ३,६,९,१२ या स्थानास आपोक्लीम म्हणतात.

**आपोड असणे** १. एखाद्यावर अवलंबून राहणे. २. गुंता.

**आपोमाता** स्त्री. नदी; नदी हीच माता. उदा. गंगामाई, गोदामाई : 'परंतु ह्या आपोमातांचे पय पाहिजेच.' – भासं. १७५.

**आपोशण-न, आपोष्णी** पहा : **अपोशन** : 'हातू न माखितां सर्वापोशन । रसनेविण सेवितू ।' – एभा ११.३०८.

**आपोष्णी** स्त्री. भोजनापूर्वी व नंतर ब्राम्हण जे आचमन करतात ते.

**आपोहिष्ठा** पु. (ल.) चट्टामट्टा; फन्ना; संपविणे. (व.)[सं.]

**आपौणे** न. मोट, रहाट याच्याशिवाय आपोआप मिळणारे पाटाचे पाणी. सक्रि. बोलावणे; आमंत्रण करणे. (गो)[सं. अपायन]

**आप्त** वि. १. संबंधी; एका रक्तामांसाचा; नातलग; नातेवाईक; सोयरा : 'आप्तांचीं नच मुखें भलासुकवी ।' – मोमंभा १.५३. २. आपला असा मानलेला इष्टमित्र; हितकर्ता : 'रुचोकृति सभाग्य तूं सुनय आप्त का मातशी ।' – केका ३८. ३. विश्वासू; प्रामाणिक; विश्वासार्ह; प्रमाणभूत; भरवशाचे : 'आप्त म्हणजे विश्वसनीय पुरुष होय.' – गीर ४०७. ४. हितकर. ५. (समासात) प्राप्त. जसे :- पर्याप्त, समाप्त. ६. गुरू; पूज्य पुरुष; सन्माननीय व्यक्ती; यथार्थ वक्ता; ज्याचे वचन ईश्वर वचनासारखे प्रमाण मानतात तो.

**आप्तई** स्त्री. आपत्ती; संकट : 'आक्रुर हें नामाभिधान सांगून पाही । आक्रुरें निष्ठुरपणें केली गोकुळांत आप्तई ।' – होला ११. [सं. आपत्ति]

**आप्तउक्ति-क्ती** पहा : **आप्त वाक्य**

**आप्त एकक** न. (ग.) प्रमाणभूत म्हणून घेतलेली किंमत.

**आप्तकाम** पु. संतुष्टता; पूर्णकाम; इच्छापूर्ती : 'जशी पृथुक तंदुलप्रसृति आप्तकामा तशी ।' – केका ३८. [सं.]

**आप्तकाल** पु. (ज्यो.) प्रमाणवेळ. विस्तृत प्रदेशातील भिन्न भिन्न ठिकाणांच्या स्थानिक वेळा वेगवेगळ्या असल्या तरी त्या सर्व ठिकाणच्या घड्याळांनी, संकेतानुरूप दाखवलेली एकच वेळ.[सं.]

**आप्तकी** स्त्री. आप्तपणा : 'श्रीमंत नानासाहेबांच्या स्नेहाच्या गोष्टी बहुत सांगितल्या. बहुतच आप्तकी व घरोबा सांगितला. – पेद २९.२०३.

**आप्तभाव** पु. निकटता; आत्मीयता; स्नेहभाव. [सं.]

**आप्तमान्य** वि. शिष्टसंमत; समाजातील श्रेष्ठ व्यक्तींनी मान्य केलेले. [सं.]

**आप्तमित्र** पु. अव. नातलग; भाऊबंद; इष्टमित्र सर्व मिळून. [सं.]

**आप्तवचन, आप्तवाक्य** नं. १. विश्वसनीय, साधार, प्रमाणयुक्त वचन (भाषण, शब्द); थोरांचे वचन. २. हिताची गोष्ट सांगणाऱ्याचे म्हणणे. ३. एक शब्दप्रमाण. [सं.]

**आप्तविवाह** पु. आपल्याच कुलातील व्यक्तीशी केलेले लग्न. [सं.]

**आप्तविषय** १. नातलग, सोयरा; २. नाते; संबंध : 'आप्तविशई मुले बायकोहि जेवावयासी जातात…' – पेसाप १३०.

**आप्तविषयी, संबंधी** वि. स्नेहभावाने बांधलेले, नात्यागोत्याचे; नातेसंबंधी; संबंधी; आप्तपणा : 'एका गलबतावर आमची आप्तविषयी बाई जाणार आहे.' – पाव्ह ६६.

**आप्तास्वकीय** पु. नातलग; इष्टमित्र इ. [सं.]

**आप्तफितरती** स्त्री. अस्मानी सुलतानी; दुष्काळ; अतिवृष्टी; परचक्र.[फा.]

**आप्ति-प्ती** स्त्री. १. आपत्ती : 'त्याच प्रमाणे पीकपाण्याचीही दिवसेंदिवस अधिकच आप्ति पडूं लागली.' – धर्माजी ३२. २. अडचण; कमतरता; वाण. [सं. आपत्ति]

**आप्तेष्ट** पु. अव. नातलग आणि जवळचे लोक : 'आप्तेष्ट काय म्हणतील.' – बंप १२.

**आप्तोर्याम** पु. अग्निष्टोमादी सप्त सोमसंस्थांपैकी एक संस्था; सोमयज्ञ. [सं.]

**आप्पा** पु. आपा हे टोपण नाव बहुमानार्थी. आजच्या प्रमाणे पूर्वीच्या काळीही वापरात होते. चिमाजी बल्लाळ पेशवे, चिमणराव सांगलीकर, जयाजी शिंदे वगैरेंना 'आप्पा' असे संबोधीत.

**आप्पा** पु. रव्याच्या तळून केलेल्या गोड वड्या किंवा गोड भजी.

**आप्य** वि. १. पाण्यासंबंधी; जलमय. २. पाणचट; पाणी पाणी जास्त झालेला [सं. अप्=पाणी]

**आप्य** वि. मिळण्याजोगे; संपादण्याजोगे : 'जय जय देव श्रीगुरो । अकल्पनाप्य कल्पतरो ।' – राज्ञा १८.१०. [सं. आप = मिळणे]

**आप्यायन** न. १. पोषण; पुष्टता. २.शरीरपोषक द्रव्य; भक्ष्य; आहार; खाद्य; जीवन. ३. सुग्रास अन्नाचे सेवन; दुग्धप्राशन. ४. अपहार; अभिलाष; पैसा खाणे. [सं.]

**आप्रवासी** पु. परदेशी रहावयास जाणारा; देशांतर करणारा. [सं.]

**आप्रांत** वि. अमर्याद. [सं.]

**आप्रीसूक्त** न. ऋग्वेदातील या नावाची सूक्ते. ही दहा असून पशुसंबंधी प्रयाजयागामध्ये गोत्रपरत्वे यांचा विनियोग करतात. [वै. सं.]

**आप्रुक** न. नावीन्य; नवलाई : ' मग असं काय आप्रुकीचं हाय ते बोल की !' – आपा ७१.

**आप्रुवाई** वि. आश्चर्यमिश्रित कौतुक; अपूर्वाई : 'तोंडाकडं आप्रुवाईनं बघत …' – टाफु १६३.

**आप्रोस** पु. नारळाचा अंगरस, दूध. (गो.)

**आप्लव** पु. १. स्नान. २. (पाण्यात) बुडणे. [सं. आ+प्लु]

**आप्लविणे** सक्रि. १. बुडवणे : 'तेवीं आब्रम्ह कुळ अवघें । आप्लविजे ।।' – ज्ञा १.२५६. २. व्यापणे. [सं. आप्लव]

**आप्लुत** वि. भिजलेला; बुडलेला; सिंचिलेला.

**आप्लैच करून** क्रिवि. अहमहमिकेने; ईर्षेने : 'परंतु लगटामुळे आप्लैच करून जालेस उत्तम नार्हीतर शेंपन्नास माणूस जायां होईल ऐसा अर्थ आहे.' – पेद १५.४६.

**आप्सर** वि. १. मोठा २ पाजी; हलकट; आडदांड. (व.)

**आप्सुलाद** वि. स्वतंत्र वृत्तीचा; स्व मताने वागणारा. (गो.)

**आफड** स्त्री. शिवाशीव; भ्रष्टाकार. (कु.) [सं. आ+स्पृश्]

**आफडणे, आफुडणे** स्त्री. शिवणे; विटाळणे; ओवळे करणे; विटाळणे. (गो.)

**आफडी** स्त्री. विटाळशी स्त्री. (गो.)

**आफत-आफत** स्त्री. १. संकट; आपदा; गोंधळ; दुर्दैव; अडचण; क्लेश; अरिष्ट : 'पादशाहीवर आफत पडली ऐसें झालें.' – चित्रगुप्त

३५. २. (ल.) दुष्काळ; अनावृष्टी : ‘रयतेस आफतीच्या वेळी धान्य आणून पुरविलें.’ – विक्षिप्त २.५३. (क्रि. पडणे, येणे, गुदरणे). ३. तोटा. [अर्. आफत, सं. आपत्ति]

**आफत अस्मानी** स्त्री. दैवी आपत्ती (अवर्षण, अतिवृष्टी इ.) दुष्काळ : ‘मुलूक जागिरा आहेत त्यांत आफत आस्मानी जाली.’ – दिमरा १.१०५.

**आफत सुलतानी** स्त्री. सरकारकडून अगर खास राजाकडून येणारे संकट.

**आफताग** पु. सूर्य, ऊन. [अर.]

**आफताब** सूर्यप्रकाश; सूर्य. [अर.]

**आफताबा** पाणी ठेवण्याची प्रवासी झारी.

**आफरी** वि. १. अव्यवस्थित; बंडखोर. २. नाखूष. [फा. इफ्राद् किंवा अफरीत = दैत्य]

**आफरी तहसीचा शुका** पु. स्तुतीचे, अभिनंदनाचे पत्र.

**आफलाक** वि. कितीही; केवढाही; नि:शेष.

**आफळणे** उक्रि. १. आदळणे; खाली आपटणे; उसळणे : ‘नातरी उदकाचिये भूमिके। आफळिलेनि कंदुकें।’ –ज्ञा १७.२८०. २. (एखाद्या वस्तूवर) जोराने मारणे; ठोकणे; प्रहार करणे : ‘भुजदंड आफळी क्रोधायमान।’ – हरि. ११.४९. [सं. आ+स्फल्]

**आफळणे** शिवणे. पहा : **आफडणे**

**आफळसाफळ करणे** १. शोक करणे. २. आदळआपट, त्रागा करणे : ‘एकि आफळसाफळ करी ।।’ – दृपा ४४.

**आफावणे आफाविणे** सक्रि. बोलावणे; आदरसत्काराने आमंत्रण करणे. आपौणें; आप्वणें (गो.) : ‘ते वेळीं देवें आफाओनु। भीमा दीन्हला सर्व मानु।’ – शिव ९२४. [सं. आप्]

**आफिम–फीण** स्त्री. अफू : ‘मी या आफिमीच्या तारेंत काय करत असतो .. याचं मला कांहीं भानच नसतं !’ – रूरा ६५.

**आफीयत** स्त्री. १. वृत्त; गोष्ट. २. खुशाली.

**आफीर** वि. नाखूष; बेजबाबदार; हावभरी : ‘आपले राज्यांतील माणूस आफिर होऊन परराज्यांत चाकरीस जाऊं देऊं नये.’ – शिदि १५६.

**आफेत** स्त्री. आफत; संकट : ‘यांजमुळे आफेत पडली आहे.’ – बाबारो ३.२१७. [फा. आफत]

**आफ्तत–आफ्तर** वि.१. बेवारशी. २. निकृष्ट स्थितीचा : ‘केशवपंताचा मामला आफ्ततर पडला.’ – पेद ५.

**आफ्तर** वि. उजाड; बेचिराख; नष्ट. [अर. अबतर]

**आफ्तागीर** पहा : **अबदागीर**

**आफ्ताफिरती** स्त्री. आपत्ती; आपदा; अनावृष्टी; नापीक : ‘आफ्ताफिरती झाली.’ – बाबारो २.२४१.

**आफ्ताबा** पु. लोटा; पाणी ठेवण्याची प्रवासी झारी.[आफ्+ताबा फा.]

**आफ्रीन** स्त्री. स्तुती; प्रशंसा : ‘बहुत खुश्वक्त होऊन आपल्या तद्बिरेस व जुरतेस तहसीन व आफ्रीन फर्माविली.’ – पया ४८९. [फा.]

**आब** पु. न. १. पाणी. २. (सामान्यत:) (तोंडावरील) पाणी; तेज; डौल. ३. (ल.) प्रतिष्ठा; अब्रू : ‘आब राखून सलूख करून निघावें’ – इमं २८१. ३. इज्जत; योग्यता; महत्त्व : ‘त्यांत त्यांचा बराच आब रहात जाईल.’ – निमा ३७८. ४. पत; ख्याती; लौकिक (खरेपणा, सचोटी, विद्वत्ता, संपत्ती इ. विषयी); वजन : ‘नायकीस आब पडे असें कोणीं नव्हतें.’ – मइसा ३.४१९. ५. ढबदार; झोकदार वर्तणूक; वचक बसण्यासारखे वर्तन किंवा ऐट (मनुष्याची, धंद्याची किंवा व्यवहाराची). ६. काळजी (सामानसुमानाची); बोज. ७. आवाका : ‘कोन्तई काम मान्सानं आपल्या आबीत ठेवलं मंजे...’ – वानगी ३९. [फा.]

**आबई** स्त्री. १. एक फूलझाड : ‘तो पुलींग परसैय्या। जेथ मुळ बांधलें आबइया।’ –ऋ ७२. २. चपटे वाल; लांबट व चपट्या शेंगा येणारा घेवड्यासारखा वेल.

**आबक दुबक** वि. विटी दांडूच्या खेळातील शब्द. एक, दोन या अर्थी.

**आबका** पु. हाताने केलेला पाण्याचा जोराचा मारा; शिडकावा.[सं.आप]

**आबकार** पु. दारू गाळणारा कलाल. [फा. आब्कार]

**आबकारी** स्त्री. १. दारू, अफू वगैरे मादक पदार्थांवरील जकात, कर. २. मद्य काढणे, अफू, गांजा, तयार करणे इ. धंदे. ३. मादक पदार्थासंबंधीचे खाते; या खात्याचे उत्पन्न वगैरे.
वि. मादक द्रव्यासंबंधी; अबकारी खात्याविषयी. [फा.]

**आबखरा–खुरा** पु. करवलीच्या हातातील भांडे.

**आबखाऊ, आबघेण्याणा** वि. इज्जत, अब्रू घेणारा; इज्जतखाऊ; पत घालवणारा.

**आबखुरा** पेला; प्याला.

**आबखोटा** पाण्याची झारी : ‘आबखोटा व प्याला सोनेरी रंग, हारयेक धातूचे, जहराची बाधा न होय याकरिता भोजनास व पाणी पिन्यास ..’ – पुणे अखबार १.९८.

**आबगार** न. तूप : ‘भातावर आबगार वाढल्याशिवाय अन्न शुद्ध होत नाही.’ (व.) [सं. अभिचार]

**आवडचावड** वि. बेडौल. पहा : **ओबडधोबड**

**आबताब** पु. स्त्री. तेज; प्रतिष्ठा; अब्रू; छाप (अधिकार, विद्वत्ता किंवा संपत्ती यामुळे लोकांवर पडलेली) : ‘पुढेंहि आमची आबताब रक्षण करणार स्वामी समर्थ आहेत.’ – दिमरा २.१८३. [फा. आब्ताब् = तेज]

**आबदर** वि. प्रतिष्ठित; अब्रूदार : ‘माझे सासरे खरोखरच आबदर माणूस होते.’ – माचू ५१८.

**आबदा** हाल; त्रास. पहा : **आपदा** : ‘पूर्वीं पाण्याची आबदा चहुंकडे। तलाव कोरडे।’ – गापो ३९.

**आबदाब** पु. इज्जत, वजन, प्रतिष्ठा, लौकिक. (क्रि. राखणे, संभाळणे, सोडणे, गमावणे, उडवणे).

**आबादाबाने** क्रिवि. इभ्रत आणि लौकिक यांच्या जोरावर; मान्यतेने; लौकिकाने; अब्रूने.

**आबदार** क्रिवि. अल्लाद; हळूच. (वा.) **आबदार उचलणे, धरणे**– हलक्या हाताने, अलगत उचलणे, धरणे. (माण.)

**आबद्ध** वि. १. अचल. २. बांधलेला. ३. कायमचा बंदिस्त केलेला. [सं.]

**आबधाकणे** क्रि. भीती वाटणे.

**आबनधबका** पु. निव्वळ तर्क, कल्पना : 'मी आबनधबका सरळ घरावरच उतरलो.' – पंवा १२२.

**आबनूस** पु. एक झाड; टेंभुर्णी. टेंभुर्णीच्या आतला काळा नार.

**आबवाब** पु. अजमास; सुमार : 'तेव्हां बोलिलो कीं फौजेचा आबवाब किती लिहावा?' – पेद २८.४४.

**आबष्मानी** कागदाचा प्रकार (आकाशी रंगाचा कागद).

**आबस** वि. व्यर्थ; निष्फळ : 'फौज माघारे फिरोन अर्ध्या मार्गात येईल तेव्हा लिहिणे आबस आहे.' – नाग भो १.२३८.

**आबसोल** न. कच्च्या आंब्याचा वाळविलेला गीर व सालपट.

**आबहवा** स्त्री. हवामान; हवापाणी : 'ठिकाणही मातबर नाही; परंतु आबहवा मात्र कांहींशी बरी.' – मइसा १.११५. [फा.]

**आबळ–आबळा** स्त्री. आबाळ; हयगय; हेळसांड; हलगर्जीपणा; उपेक्षा : 'ज्याची सारखी आबळा चालली आहे.' – नि. १०६९. (क्रि. होणे, करणे).

**आबळा गोबळा** वि. १. सर्व दिशांना व्यापून असणारा.
क्रिवि. एकंदर. २.आपला आपण.

**आबा** पु. वडील माणसास आदरार्थी संबोधन. २. बाप.

**आबागणे** क्रि. स्वच्छंदीपणे वागणे; वाटेल तसे वागणे : 'चैताच्या महिन्यात देव जोतिबा आबागला.' – जसा ६७.

**आबाद** वि. १. समृद्ध; संपन्न; वसवलेले; साधनसमुग्रीयुक्त; भरभराटलेले (शहर, देश, वस्ती, लागवड) : 'दिल्लीहून सरंजाम आणवून सारें लष्कर आबाद करावें.' – भाब १११. २. सुरक्षित; स्वस्थ (प्रांत) : 'आपला जागा आबाद ठेवितो.' – दिमरा २.१५७. ३. सुखासमाधानाने सारा येणारा (प्रदेश).
स्त्री. १. समृद्धी; भरभराट; स्वास्थ्य : 'ह्याप्रमाणें हे योद्धे जिंकलेल्या लोकांनीं आबादींत आणलेल्या प्रांतांचे एकदम जमीनदार व सुभे बनले.' – इंरामू २६. २. एखाद्या भरभराटलेल्या शहराच्या किंवा एखाद्या मनुष्याने वसविलेल्या शहराच्या नावाच्या शेवटी लावतात. जसे :– औरंगाबाद, हैदराबाद इ. ३. लष्करासाठी रसद, साहित्य इ. चा पुरवठा होऊ शकेल असे स्थळ वा ठाणे. [फा. आबाद्]

**आबादाणी, आबादाबी, आब्बादब्बा** स्त्री. चिंध्यांचा चेंडू एकमेकांस मारून खेळण्याचा एक खेळ.

**आबादान** वि. १. सुरक्षित : 'वरकड जिन्नस सर्दी न लागे असे आबादान ठेवावे.' – मराआ ३५. २. समृद्ध; संपन्न; भरभराटलेले (शहर, लष्कर इ.) : 'सरंजाम ही येऊन पोहोचेल; लष्कर आबादान झाल्यावरी पुन्हा गिल्च्यांचे पारिपत्य करूं' – भाब १११. [फा. आबादान्]

**आबादाना–नी, आबादी** स्त्री. १. (दाट वस्ती, लागवड, पिकाऊ जमीन इत्यादींनी युक्त असा) सुखाचा अंमल, राज्य : 'आबादी जालिया हा प्रांत कोडीचा आहे.' – इम २६७. २. शांतता; संपन्नता; विपुलता (देश, प्रांत वगैरेंची) : 'रयतेची आबादानी होण्यास व रयतेस तगाई देण्यांत आधीं बहुत यत्न करावा.' – ऐस्फुले ५६. ३. जमीन महसूल : 'आठ वर्षात आबादी ९१६६ ।॥। वाढली.' – विक्षिप्त २.५३. ४. लावणी; पीक. [फा.]

**आबादाबात** क्रिवि. १. लौकिकाच्या, अब्रूच्या जोरावर; आपल्या वजनाने : 'फजिती होण्यापेक्षा आबादाबांत वेळ मारून न्यावी हें चांगलें.' – सूर्योदय २२८. २. (ल.) चोरूनमारून; लपून छपून : 'प्रथम हें सर्व आबादाबात चालत होतें.' – हाच का धर्म २७.

**आबादी** १. लोकवस्ती; दाटवस्ती : 'पुणे शहरात आबादीत जागा जागा नाके आहेत तेथे हजार पाचशे स्वार तयार होऊन उभे राहत आहेत.' – पुअभा ३.१०९. २. समृद्धी; उत्कर्ष; वैभव. ३. स्वास्थ्य.

**आबादी आबाद** स्त्री. अतिशय भरभराट; जिकडे तिकडे समृद्धी, शांतता. [फा.]

**आबाधा** स्त्री. (ग.) त्रिकोणाच्या शिरोबिंदूपासून पायावर काढलेला लंब पायाला (किंवा वाढवलेल्या पायाला) ज्या बिंदूत मिळाला असेल त्या बिंदूची पायाच्या दोन्ही टोकापासूनची अंतरे.

**आबाधुबी** पहा : **आबादाणी, आबादाबी, आब्बादब्बा**

**आबाय–अज्दाद** पु. बाप–आजे; बापजादे; वाडवडिल; पूर्वज : 'अज् कदीमूल् अय्याम व आबाय अज्दाद मोक्र असे.' – बाड सनदा १४०. [फा.]

**आबालवृद्ध** क्रिवि. लहानापासून थोरापर्यंत; सर्व–लोक; जनता. [सं.]

**आबालसुबोध** वि. लहान मुलापासून तो जाणत्यापर्यंत सहज कळणारा : 'तेणें आबालसुबोधें । वोवीयेचेनि प्रबंधे ।' –ज्ञा १८.१७४३. [सं.]

**आबाशाई, आबाशी** वि. गहिरा, गर्द तांबडा व काळसर – अब्बास फुलासारखा रंग.

**आबाळ–ळी** स्त्री. १. हेळसांड; हयगय; निगेचा अभाव. पहा : **आबळ** २. अन्नवस्त्रादी पदार्थांच्या कमतरतेचे संकट, विपत्ती; आपत्काळ. ३. फजिती; दुर्दशा; हाल : 'करील आबाळी । माझ्या दातांची कस कसाळी ।।' – तुगा ५७७. [सं. अ+पाल्]

**आबाळ गोबळा** पहा : **आबळा गोबळा** : 'असो चहू देहावेगळा । जन्मकर्मासी निराळा । सकळ आबाळगोबळा । सबाह्य तूं ।' – दास ५.६.५६.

**आबाळणे** क्रि. हयगय करून, दुर्लक्ष करून वागविणे; हेळसांड करणे. [सं. आ+बाध्]

**आबाळ्या** वि. निर्बल; अशक्त.

**आबांब** कांगावा; थैमान; बोंबाबोंब.

**आबिल खेळू का तबिल खेळू** एक खेळ व त्या खेळाचे गाणे.

**आबी** वि. कालव्याच्या पाण्यावरील (शेती); पाणथळ.

**आबु** स्त्री. पत्नी; बायको : 'सर्वज्ञास सोळा सहस्त्र आष्टपाट मुख्य आबुआ'– श्रीकृच ६३.

**आबुखणे, आंबुखणे** क्रि. शिंपणे; पसरणे; टाकणे.

**आबुखा** पु. हाताने मारलेला पाण्याचा हपका; आबका; आपका; अबका. [सं. अप्]

**आबुट** पु. मेघ; ढग : 'ना तें ओळलें आबुट । मकरंदाचें ।' – शिव ६१६.

**आबुथणे** सक्रि. दिव्याची वात सारखी करणे; सरसावणे : 'ते वाति गेली : म्हणौनि बोटे आबुथिली' – लीचपू ८.

**आबुली** स्त्री. बायको; पत्नी : 'तयाची आबुली लेकरूवें जळत असति.' – आचार महाभाष्य १८३.

**आबेजाबे–जुबे** पहा : **अबेदबे**

**आबेळ** पु. अर्धा आणा किंवा रुपया. (बेळ, दुबळ आणि निबळ या शब्दांबरोबर वापरतात.)

**आबोल–ली** स्त्री. १. कोरांटीच्या जातीचे शेंदरी, बिनवासाच्या फुलांचे एक झाड. २. अबई.

**आबोले** न. १. पिवळ्या कोरांटीचे फूल. २. अबईचे फूल.

**आब्जाडणे** क्रि. लाथांनी; मारून जेरीस आणणे. (गो.)

**आब्दारखाना** पु. पिण्याचे पाणी साठविण्याची टाकी किंवा हौद वगैरे. [फा.]

**आब्बस** निर्भर्त्सना; फजिती; अपमान.

**आब्रह्म** क्रिवि. ब्रह्मलोकापर्यंत : 'तेवीं आब्रम्ह कुळ आवघें आप्लाविजे ।।' – ज्ञा १.२५६. [सं.]

**आब्रह्मस्तंभपर्यंत** क्रिवि. ब्रह्मलोकापासून पृथ्वीपर्यंत (त्यात निरनिराळी १४ लोकभुवने येतात) : 'आब्रम्हस्तंभपर्यंत । नाना योनि विकारवंत ।' – एभा २२.६१९.

**आभ** न. १. आकाश; आभाळ. (कों.) २. ढग; अभ्र; आभाळ येणे. ३. प्रतिबिंब. [सं. अभ्र]

**आभडणे** क्रि. बाळंत होणे : 'आभडली म्हणे.' – गोप्र २२.

**आभरण** न. १. दागिना; अलंकार; रत्न; जवाहिर : 'मुक्ताफळेंसीं आभरणें । सौभाग्यद्रव्यें कंठाभरणें ।' – एरुस्व ६.८७. २. शोभा; शृंगार; मंडन; विभूषण. [सं.]

**आभरणे** क्रि. १. नटणे; शृंगार करणे; अंगावर दागिने घालणे; मंडित करणे. २. तृप्त होणे : 'आत्मारामीं मन भरलें । स्वात्मसुखें मग आभरलें ।' – आभ ४८. [सं. आ+भृ]

**आभर्तण** न. प्रार्थना; विनंती : 'इस्वरनाएक आभर्तणीं रिधपुरा प्रयाण' – गोप्र २४७.

**आभलाख** इच्छा करणे. (गो.)

**आभंड, आभांड, आभय, आभर** वि. प्रचंड, फार, अतिशय.

**आभंडनार** स्त्री. भांडखोर, कजाग स्त्री.

**आभा** स्त्री. तेज; कांती; प्रभा; चकाकी. सामा. शब्द – अंजनाभ.[सं.]

**आभाइणे** अक्रि. बोलणे; भाषण करणे : 'तंव वैदर्भी आभाइली । सावासिनीतें ।' – शिव १९०. [सं. आ+भाष]

**आभाणक** म्हण.

**आभार** पु. १. उपकाराची जाणीव; कृतज्ञता; उपकाराचे ओझे मानणे. २. भार, ओझे : 'जळचरु जळाचा आभारु धरी ।' – ज्ञा ११.७९. ३. (ल.) जबाबदारी; भार; भीड : 'प्रसन्न होवोनि म्हणे शंकर । वन शाप न टळे दुर्धर । परि तुझे तपाचा आभार । जाहला मज ।।' – कथा १.१२.१५७.

**आभारण** न. १. राजाच्या परिवारातले महत्त्वाचे लोक : 'मग राजा शंकरदेव राणा महाराज (महाराजांनी) आपले पुरोहित प्रधान पंडित समस्त आभारणा पाचारिले व मुहूर्त पाहून मड्डिपाल देवराणा राजीं बसविला.' –विंब २. २. पालनपोषणाची जबाबदारी : 'तयां पांडवांचे आभारण घातलें : कवणा सांघे?' – उगी १७(३)११६.

**आभारणे** अक्रि. आभारी असणे; उपकाराच्या ओझ्याने दडपणे : 'तेणें उपकारें काय आभारेला । वधीं तयातें ।' – ज्ञा २.३७.
सक्रि. १. नटविणे; आभरण घालणे : 'तेव्हां आभारूनियां अति नवल । सभा यापरी सिद्ध केली ।' – कृकौ २.२६.(महा.कवि क्र. १७). २. उपकार करणे. ३. सेवा करणे : 'जोगिणी त्यातें बहुत दीस आभारिलें ।' – लीचउ २३७.

**आभारभरित** वि. (गेल्या शतकातील प्रयोग) आभारी; अत्यंत ऋणी असलेला; उपकारबद्ध; ऋणी.

**आभार मानणे** क्रि. उपकार केल्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करणे.

**आभारलेपण** न. ऋणी असलेली स्थिती; उपकारबद्धता : 'सर्वेश्वर आभारलेपणें ।' – विसिंपू ५.२४.

**आभारी** वि. ज्याच्यावर उपकाराचे ओझे आहे असा; कृतज्ञ; ऋणी.
पु. भार घेणारा : 'न मागतां आभारी । आपेआप होतो ।' – चोखा ३८.

**आभाव** तर्क; अटकळ. अंदेशा; शंका; अभाव. (कों.)

**आभावणी** पिकाचा अंदाज.

**आभाषण** न. संभाषण.

**आभास** पु. १. भास. २. सादृश्य; सारखेपणा; प्रतिकृती; ठसा; प्रतिबिंब : 'कां परता केलिया आरिसा । लोपु जाता तथा आभासा ।' – ज्ञा १५.३७८; 'श्रीमूर्तीचा आभासु जीवीं प्रसादला' – श्रीकृष्णच ५५. ३. कल्पना; अंदाज; अटकळ; विचार; ग्रह; समजूत; थोडा विश्वास; थोडा खरेपणा वाटणे : 'सांडिजे दुजया नामाचा आभासु ।' –ज्ञा ६.४०. ४. (तर्क.) प्रमाणसादृश्य; बरोबर वाटणारे पण चुकीचे मत, मुद्दा; चुकीची विचारसरणी. पहा : **उत्तराभास, रसाभास, हेत्वाभास, भावाभास, पक्षाभास.** इ. (तत्त्व.) ५. भासमान दृश्य विश्व. ६. मिथ्याज्ञान. [सं.]

**आभासक** पु. प्रतिबिंब. [सं. आभास]

**आभासणे** अक्रि. १. भासणे; प्रतिबिंबित होणे : 'मिथ्याचि आभासे । निरंतर पाहतां ।' – दास ६.८.३४. २. आहे असे वाटणे; कोणतीही अशाश्वत वस्तू शाश्वत आहे असे समजणे; नसलेले आहे असे वाटणे : 'जैसें तोयसंगे आभासे । भानुबिंब ।।' –ज्ञा ३.७२.

**आभासन** न. भास; आभास : 'दृश्य मृगजळ आभासन ।' – परमा ५.३३. [सं. आभास]

**आभासी** वि. १. वरकरणी; दिखाऊ. २. छायारूप; आभासात्मक.[सं.]

**आभासी चाप** पु. (स्था.) दर्शनी चाप; खिडक्या किंवा झरोका नसलेली कमान.

**आभासी नति** स्त्री. (भूशा.) वरकरणी दिसणारी उतरण किंवा वाकण.[सं.]

**आभासी प्रतिमा** स्त्री. (भौ.) एखादी वस्तू प्रत्यक्ष नसताना तिची दिसणारी आकृती. [सं.]

**आभासी भेद** पु. लक्षात येणारा फरक.

**आभासी स्फटिक** पु. (भौ.) एक प्रकारचा कठीण पदार्थ. सूक्ष्म दर्शकातूनसुद्धा हा स्फटिकासारखाच दिसतो. परंतु विवर्तनाच्या परीक्षेला

तो उतरत नाही (खऱ्या स्फटिकाची ही महत्त्वाची खूण आहे.)[सं.]

**आभाळ** न. १. आकाश; अस्मान. २. अभ्र; ढग; मेघपटल; काळोखी; ढगाने व्यापलेले आकाश; ढगाळपणा : 'कडकडित अभाळे । येऊनि आकाश झांकोळे ।' – एभा ७.४४९. ३. (ल.) संकट; बंड. [सं. अभ्र+आलय] (वा.) **आभाळ कोसळणे** – मोठे अरिष्ट येणे, गुदरणे. **आभाळ खराळणे** – जोराचा गडगडाट होणे.(व.) **आभाळ डोक्यास टेकणे, लागणे, दोन बोटे उरणे, ठसठसा लागणे, ठेंगणे दिसणे, होणे–** अति गर्विष्ठ माणसाबद्दल योजावयाचे प्रयोग. (उप.) कृतार्थ वाटणे, धन्य वाटणे. **आभाळ फाटणे–** मोठे अरिष्ट गुदरणे; सर्वच बाजूंनी संकटे येणे. **आभाळ येणे –** १. अभ्रे दाटून येणे. २. संकट येणे. **आभाळाचा गंड** (कृषी). अभ्राढगांची गर्दी. **आभाळाचा गाळ** – गर्द ढग; मळभ; ढगाची काळोखी. **आभाळाची सावली** अभ्रछाया; ढगांची सावली. (ल.) क्षणभंगुर गोष्ट; पाण्यावरील बुडबुडा; **आभाळावर आभाळ येणे –** एकावर एक संकटे येणे, ओढवणे. **आभाळावर चढणे** – १. वरचढपणाने अधिकाधिक मागणी करणे; एकसारख्या मागण्या करीत राहणे. २. अरेराव होऊ लागणे; आढ्यतेखोर बनणे. **आभाळावर थुंकणे** – निष्फळ प्रयत्न करणे किंवा आपल्याच अंगावर बाजू ओढवेल असे कृत्य करणे. **आभाळाशी भांडणे** – १. अति उंच होणे, असणे; गगनचुंबित असणे – (झाडे, इमारती वगैरे). २. भयंकर भांडखोर असणे; निष्कारण कलह करणे; वाऱ्याशी भांडणे. **आभाळास भोक पडणे** – अतिवृष्टीबद्दल योजावयाचा प्रयोग; मुसळधार पाऊस पडणे. संततधार लागणे. **आभाळाखाली, आभाळातळी** – पृथ्वीच्या पाठीवर; मृत्युलोकी; पृथ्वीवर. (भाव) **आभाळाला टेकणे** – वस्तू अतिशय महाग होणे : 'काडतुसाचा भाव आजच्या सारखा तेव्हा आभाळाला टेकलेला नव्हता.' – वाटा ४५.

**आभाळी** स्त्री. मेघपंक्ती; ढग. [सं. अभ्रावली]
वि. आकाशी : 'त्यांना (भिंतींना) मंद आभाळी रंग आहे.' – समाधी ७.

**आभिजात्य** न. अभिजातता; कुलीनपणा. [सं. अभिजात]

**आभिमुख्य** न. १. दिशा. २. समोर होणे, किंवा असणे.[सं. अभिमुख]

**आभिष** न. आमिष : 'आभिषगर्ता जाहिल्या फांसें ।' – मुआदि ३४.९५.

**आभीर** पु. १. गुराखी; गवळी; अहीर; गवळीजात. २. एक प्राचीन राष्ट्र.

**आभीर पल्ली** स्त्री. गौळीवाडा. [सं.]

**आभुग्न (वक्ष:स्थळ)** न. (नृत्य) नृत्यास उभे असता शरीराचा तोल थोडा मागे गेला असता खांदे किंचित पुढे येतात, पाठ वर येते व ऊर आत जातो अशी स्थिती; गोंधळलेली किंवा विषादयुक्त मनस्थिती दाखविणे झाल्यास हा अभिनय करतात.

**आभूट** न. धुळीचा लोट : 'आभूटीं धूळीरेवां ग्रसित सकळही देखिले....' गरा ३९.

**आभूषण** न. दागिना; अलंकार. [सं.]

**आभेळ** न. आभाळ; ढग; आकाश. (कों.)

**आभोग** पु. (संगीत) १. चीजेचा शेवटचा भाग, रागाच्या स्वरांची परिपूर्णता यात होते. याला दोन तुक(भाग) असतात, परंतु अस्ताई व अंत्रा यांना प्रत्येकी एकच तुक असतो. २. (कुबडी–चेंडू खेळ) सुमारे पंचवीस हात चौफेर प्रदेश. [सं. आ+भुज्]

**आभोरा** पु. ध्रुवपदाचा शेवटचा भाग.

**आभोळा** वि. अत्यंत भोळा.

**आभ्यंतर** वि. आतील; अंतर्गत.

**आभ्यंतर प्रयत्न** पु. (भाषा.) ध्वनी उच्चारताना तोंडाच्या पोकळीमध्ये होणाऱ्या हालचाली. याउलट बाह्यप्रयत्न; (संगीत) गाताना प्रत्यक्ष शब्दोच्चार किंवा स्वरोच्चारण करण्याअगोदर गवई कंठ अगर फुप्फुसे फुगवून साफ करतो ती क्रिया. स्पृष्ट, ईषत्स्पृष्ट, विवृत व संवृत असे आभ्यंतर प्रयत्नाचे चार भाग आहेत. [सं.]

**आभ्राम** पु. (भौ.) स्वत:च्याच अक्षाभोवती एखाद्या मूल कणाचे वेगाने फिरणे. [सं.]

**आभ्रेष** पु. (ज्यो.) १. पृथ्वीच्या कक्षीय गतीमुळे एखादा तारा तिच्या गतीच्या दिशेतच किंचित हललेला दिसण्याची स्थिती. २. दुर्बिणीची भिंगे किंवा आरसे यांच्या मध्यातून व कडेजवळून आलेल्या किरणांमध्ये झालेल्या अत्यल्प फरकामुळे प्रतिरूपात दिसणारी अस्पष्टता, अवांछित रंगछटा इ. दोष. [सं.]

**आम** वि. १. अर्धे कच्चे; अर्धवट शिजलेले. उदा.आमान्न. २. कच्चे; हिरवे; न पिकलेले. [सं.]
पु. १. आव; आमांश; खाल्लेल्या अन्नाचे चांगले पचन न झाल्यामुळे क्रमाने थोडा थोडा साठत जाणारा दूषित अन्नरस. हा मस्तक व शरीर यामध्ये पीडा उत्पन्न करतो. २. (शाप.) अर्धपक्व अन्न; आम रस.

**आम** पु. आंबा. [सं. आम्र]

**आम** न. पिकलेल्या फणसाच्या गऱ्यांतीलआठळ्या काढून साठे घालण्यासाठी तयार केलेला रस.

**आम** वि. सार्वजनिक; सामान्य; सरसकट. 'जलसा–इ–आम' आमजनता इ.

**आमकाठी** कैऱ्यांच्या वाळविलेल्या फोडी.

**आमखर** वि. आंबटसर; कुबट : 'त्याचा (लाकडाचा कीस) ओलसर आमखर वास दुकानाभोवती फिरत होता.'– बाविबु २६१.

**आमखास** क्रिवि. सर्रास : 'सदर्हूप्रमाणें धारण छ २५ रजबीं आमखास बाजारांत जाली.'– मइसा ७.१४७.
पु. संसदेचा दिवाणखाना दरबार; 'तैसेच आमखासमध्यें कुलवजीर मुस्तेद करून उभे केले.'– सब ३८. [फा.]

**आमगूळ** वि. आंबट–गोड; आंबूस; मधुराम्ल.

**आमचा–ची–चे** वि. आम्ही या सर्वनामाचे स्वामित्वदर्शक (चान्त विशेषणात्मक) रूप.

**आमची लिमची** लहान मुलांचा एक खेळ.

**आमचेपणा** पु. आपलेपणा : 'त्यांत आमचेपणा नाहीं'– टिव्या.

**आमच्याइथे, आमच्याइथली माणसे,आमच्या घरात** नवऱ्याबद्दल (नाव घ्यायचे नसते म्हणून) बहुमानाने असा वाक्यप्रचार योजतात :

'आमच्या इथे रात्रंदिवस काळजी लागली आहे.'– मोर १४; 'आमच्या घरांत देखील स्वभाव असाच पैशाचा लोभी.' – विवि ८.३.९.

**आमटी** चिंच-गूळ-तिखट-मीठ मसाला घातलेले पातळ वरण.

**आमडणे** सक्रि. हाकणे; घालवणे; हाकलून देणे.

**आमडी** अंबाडीचे पान; मोठ्या व तिखटपानाची नागवेलीची एक जात. एक मास : 'कुणास न मिळे भाजी कुणि राजी करडी मिळो आमडी जुनी ।'–राला १०८.

**आमण** न. चाकात ठोकलेले, वाटोळे, लोखंडाचे पंचपात्रे; आवण. यात आस फिरतो. (गो.) [सं. अक्ष]

**आमण** स्त्री. एक जंगली वृक्ष; आंबण. (कों.)

**आमद** स्त्री. उत्पन्न; आवक : 'दौलत आहे तेथें आमदही आहे व खिसाराही आहे.'– मइसा १०.१६६. [फा.]

**आमद** वार्ता, आवाई : 'कृष्णेस पाणी यावयाची आमद जाणून भाऊस लिहोन माघारी बोलाविले' – मशिंमांका ६२३.

**आमदन** न. येणे; आगमन : 'आं अमारत्पन्हाचें आमदन या जिल्ह्यास जल्दीने होय तें करावें.'– पया ३९४. [फा.]

**आमदनी–आमदानी** १. मिळकत; उत्पन्न : 'कराचे प्रमाण उद्योगधंद्याच्या आमदनीवर आधारित असते.'– लोवि १२६. २. कारकीर्द.

**आमदह** वि. आलेला; येऊन बसलेला [फा. आमदन=येणे].

**आमदाम** पु. मुलींचा एक खेळ.

**आमदार** पु. १. विधानसभा किंवा विधान परिषदेवर निवडून आलेले अथवा नियुक्त केलेले सदस्य. २. भले लोक.

**आमदारकी** स्त्री. राज्य विधिमंडळाचे सभासदत्व; आमदारांचे पद.

**आमद्रफ्त –आमद्रफ्ती** स्त्री. १. ये जा; रहदारी; दळणवळण : 'हजारों मनुष्यांची आमद्रफ्त, त्यांत असा चोरून जो येणार तो कोणे स्वरूपानें व कसा येतो हे कशावरून समजावे.' –मइसा ७.१३५. २. व्यापारी मालाची ने-आण व त्यावरील जकात : 'मार्गी येतां येतां आमद्रफ्तीचा उपसर्ग न लावणें'– मइसा १५. २३०. ३. रहदारीची परवानगी, मुभा, मोकळीक. [फा. आमद्=येणे+रफ्त=जाणे]

**आमन** पु. मद.

**आमनधपक्या** क्रिवि. पूर्वसूचना न देता : 'या आमनधपक्या हातात पडलेल्या हुकमानं तर माझ्यापुढं एकदम अंधार पसरला.'– आपा १२१.

**आमना** (आम्ना) स्त्री. १. कामना; इच्छा; मनीषा; हेतू. २. अंदाज; तर्क. (व.) ३. (ल.) (पैसे वगैरे देण्याची) कमालमर्यादा; आवाका. [सं. आ+मन्]

**आमनासामना–आमनेसामने** क्रिवि. समोरासमोर; तोंडास तोंड देऊन (झालेल्या गोष्टी, भांडण); समक्ष. [हिं.] [सामनाचे द्वि.]

**आमनेर** स्त्री. ज्वारीची एक जात. (व.)

**आमपाचन** वि. हगवण, आव वगैरे नाहीसे करणारे (औषध); आमांशावर उतारा. [सं. आ+पच्]

न. हगवण, आमांश या विकारापासून होणारी मुक्तता.

**आमय** पु. रोग; व्याधी; दुखणे; पीडा; आजार; विकृती. [सं.]

**आमरण–आमरणान्त** क्रिवि. मृत्यू येईपर्यंत; मरेपर्यंत. [सं. आ+मरण+अन्त]

**आमरस** पु. पिकलेल्या आंब्याचा पिळून काढलेला रस; आंबरस. [सं. आम्ररस]

**आमराई** स्त्री. आंब्यांच्या झाडांची बाग; आंबराई. [सं. आम्रराजी]

**आमरे** न. एक परोपजीवी वनस्पती. हिला सुंदर फुले येतात.: 'मी आंब्यावर लटकलेल्या आमऱ्या सारखा आहे.'– दिअहो

**आमल** पु. कारकून.

**आमलक** पु. आवळ्यांचे झाड व फळ.

**आमलकी** स्त्री.१.आवळी; आवळ्याचे झाड. ३. आवळकाठी.[सं.]

**आमलक्यादी चूर्ण** न. आवळकाठी, चित्रकमूळ, हिरडेदळ, पिंपळी व सैंधव यांचे चूर्ण. सर्व ज्वरांच्या नाशासाठी उपयुक्त.

**आमला** पु. कारकून वर्ग; अमलदार.

**आमलाफैला** पु. १. अमल, अधिकार, ताबा. २. कारकून, पांढरपेशा, इतर लोक, प्रजा : 'खैरखानाही आमलाफैला आमदरक्ती रूजू करून आपले घरीं बैसलेत.'– पेद २५.११३. [फा. आमल+फैल]

**आमली** स्त्री. चिंच. [हिं. इम्ली]

**आमली** स्त्री. कैरी; आंबली. (गो.) [सं. आम्र.]

**आमले खामले** पु. अव. मंगळागौरीच्या पूजेसाठी देवीच्या चार बाजूस कणकेचे चार खांब बसवतात ते. [खांबलचे द्वि.]

**आमवात, वायु** पु. संधिवात; एकदम कुपित झालेले आम व वात हे माकडहाड व सांधे यामध्ये शिरून सर्वांग ताठवितात तो विकार.

**आमविकार, विकृति–ती** पु. स्त्री. आमांशापासून होणारा रोग; आतड्यासंबंधी होणारा रोग. [सं.]

**आमशूल** पु. आमांशाच्या संचयामुळे जडणारी पोटदुखी; वातामुळे निर्माण होणारी पोटदुखी.

**आमसभा** स्त्री.सर्वसाधारण सभा; संयुक्त राष्ट्र संघटनेच्या सर्व घटकसभासद राष्ट्रांच्या प्रतिनिधींची सभा.

**आमसंग्रहणी** स्त्री. अर्धाकच्चा अन्नरस साठल्यामुळे होणारा रोग; आमांश : 'आमसंग्रहणीवर –बाळवेल, बडिशोप व सुंठ यांचा काढा द्यावा.' – फचि १५२.

**आमसंजनन** न. आव निर्माण होणे.

**आम संशोषक** न. आव शोषून घेणारे : 'कासीस भस्म आमसंशोषक असून मंदाग्नीला उत्तेजन देऊन मंदाग्निप्रदीपन करणारे आहे.' – सि २५.

**आमसाण–सूल–सोल** पहा : **अमसूल**

**आम सामग्री** स्त्री. (अर्थ.) कच्चा माल.

**आमळ** वि.१. अमंगळ : 'परि वाचेवीन आमळू (आंगळू) जाला.' – गोप्रच ९७. २. मंद.

**आमंटुक** क्रिवि. अंदाजाने : 'ज्वारी कशास मोजतोस, आमंटुकच दे म्हणजे झालें.' (व.)

**आमंत** पु. आमंत्रण : 'द्विजकुळासि केला आमंत ।।'– मब १२८.

**आमंत्रक** विशिष्ट कामाकरिता बैठक, सभा बोलावणारा मनुष्य, बैठक बोलावण्यासाठी नेमलेली व्यक्ती. [सं.]

**आमंत्रण** न. १. निमंत्रण; बोलावणे; पाचारण; आवतण; आवाहन. (क्रि. करणे, देणे). २. आमंत्रणाला निघालेली मंडळी. [सं.]

**आमंत्रणपत्रिका** बोलावणे करणारे पत्र, पत्रिका इ. [सं.]

**आमंत्रणे** उक्रि. १. बोलावणे. २. आमंत्रण देणे; आवतणे.

**आमंत्रण्या** वि. १. (जेवावयास) बोलावणे करणारा नोकर; बोलावणेकरी. २. कार्यप्रसंगी आमंत्रणास जाणारा; अक्षत घेऊन जाणारा (यजमान, आप्त वगैरे).

**आमंत्रिक** पु. मांत्रिक; मंत्र म्हणणारा : 'बोलवा वहिले आमंत्रिक'– नाम ८२.

**आमंत्रित** वि. ज्याला आमंत्रण, बोलावणे केले आहे असा; निमंत्रित; बोलावलेला. [सं.]

**आमा** पु. १. स्तन : 'हे तात काय जेथें न बहु मला दे मुखांत आमा जी ।' – मोस्त्री ४.४९.

**आमा** स्त्री. अमावास्या : 'आमचे येणे लवकर होत नाही. आमा जाहलियावरी अग्नीही (अग्निहोत्राचा) येथेच आणणार.' – पेठेद १.२८. पहा : **अमा** [सं. अमा]

**आमा** स्त्री. दाई; परिचारिका.

**आमाक** क्रिवि. अमळ; घटकाभर; थोडावेळपर्यंत. (व.) [सं. अम्=थोडे, लवकर]

**आमाजीर्ण** न. (आयु.) कफजन्य अजीर्ण. [सं.]

**आमाडा–डी** पु. केसांचा आंबाडा. [ग्रा.]

**आमाण** उद्गा. अ. सुरक्षित आहे; विश्वास आहे; रक्षण आहे : 'हे वर्तमान इंग्रजांस कळलियावरी आम्हांकडील कमाविसदारांस म्हणों लागले कीं, तुम्ही आमाण बोलून महाल सोडवून घेतले याचें कारण काय ?' – मइसा १०.२३२. [फा. अमान= सुरक्षितता]

**आमातिसार** पु. आव; हगवण; अतिसार; संग्रहणी. [सं. आम= अतिसार]

**आमाधिक** वि. (आयु.) ज्यात आमाचा अंश अधिक आहे असे.[सं.]

**आमानत** क्रिवि. दूर; बडतर्फ; स्थगित : 'उगयाच तुफानी गोष्टी सांगून आम्हास कामावरून आमानत केले आहे.'– पेद ४१.२७३.

**आमानी** १. ठेव; विश्वस्त वस्तू. २. कायम नसलेल्या अंमलदाराने चालविलेले. [अर्–अमानी]

**आमान्न** न. कोरान्न; शिधा; कच्चे अन्न; बिन शिजवलेले ब्राह्मणांना वगैरे देतात ते अन्न. [सं. आम+अन्न]

**आमाभामर** वि. जीव की प्राण अशी; अत्यंत प्रिय (वस्तू). (गो.)

**आमाल** पु. अमल; कामे. [फा.]

**आमाला** वि. चोहोकडून मारा करणारा : 'दाटदळेआं देवांचा आमाला । दापितेआं देवांचा जगदळा ।' –शिव १५५.

**आमाशय** पु. (वै.) अन्नपचनाची क्रिया करणारा शरीराचा भाग (जठर); पक्वाशय; कोठा; पोट. [सं.]

**आमाशिक–सिक** वि. अंमळसा; जरा; थोडा. (ना.)

**आमासक्** क्रिवि. थोडा वेळ; अमळ : 'आतां जेवन झालं, आमासक् आंग टाका.'– माणूस १.

**आमासे** वि. अमळसे : 'आमासे – सावकारी चलण धरा कीं आणीख दाहा परगण्याचे इजाऱ्याचा विश्वास पडे.'– हिंदखं २.१५.

**आमांश** पु. १. अपक्व अन्नाचा अंश; आतड्यात अगर पोटात पचन न होता राहिलेले अन्न. २. त्यामुळे आतड्यासंबंधी झालेले विकार, हगवण, आव इ. [सं.आम+अंश]

**आमिरह** १. सरदारी सत्ता, २. बडेजाव, मोठा थाट. ३. अमीराचा दर्जा. ४. उदारता.

**आमि–मी–ष** न. १. मांस; भक्ष्य. २. प्रलोभन; लालूच; लाच; बक्षीस; मधाचे बोट : 'जयासि भुकेलियां आमिषा ।' – ज्ञा ३.२४६. ३. माशास पकडण्याकरिता गळास लावलेली उंडी वगैरे खाद्यपदार्थ : 'जैसा गळीं मीनु आमिषें । भुलविजे गा ।।'– ज्ञा ३.२१३. ४. (ल.) बुद्धिबळाच्या खेळात प्रतिपक्षावर आपल्या मोहऱ्यांचा मारा जोराने चालावा म्हणून फुकट दिलेले मोहरे किंवा प्यादे. ५. (ल.) मोहक पदार्थ. (वा.) **आमिष दाखविणे**– मोह पाडण्याचा प्रयत्न करणे; लाच देऊ करणे.
स्त्री. धन इ. [सं.]

**आमिळ** पु. अमल करणारा : 'आमिळांस आज्ञा केली' – बाबारो १.२०५. [फा. आमिल]

**आमिक्षा** स्त्री. (वै.) कढत दुधात दही घालून होणारा पदार्थ. आमिक्ष=दही [सं.]

**आमी** क्रिवि. आता (भि.)

**आमीग** पु. मित्र; दोस्त. (गो.)[पोर्तु. आमीगु]

**आमीन** उद्गा. तथास्तु. [अर. आमीन]

**आमील** विश्वस्त, मोंगलाईतील वा पेशवाईतील एक अधिकारी.

**आमुख** न. (सास.) १. नाटकाची ओळख करून देणारा प्रवेश; नटी–सूत्रधाराचा प्रवेश. ३. नाटकाचा प्रारंभिक परिचय. [सं.]

**आमुडणे** उक्रि. हाकलणे; हाकून लावणे. (गो.)[सं. आ+मुच]

**आमुते** सना. आम्हास; आम्हाला; आम्हाकारणे : 'आमुतें जिंतिलें फुडे । नेणों केवी ।' – शिव ७२९. [सं. अस्मद्]

**आमुला** वि. संततिरहित; स्वत:चे मूलबाळ नाही असा : 'ते आमुला हे आमुली । ययां संगति नाहीं देखली । परि सकळ कुळवाडी जथिली । ययांचि दोघीं ।' – स्वादि १३. ३. ३२.
पु. १. नवरा : 'आमुलेया आबुलिये । संगति ना सोये । कां आबुलि जग विये । चोज आइकां ।।'– ज्ञा १३.९८०. २. आमोला; चोहीकडून मारा करणारा : 'तू मारूवाचा आमुला होंसी ।'– क्रिपुभा २.८.२७.

**आमुलार्थे** क्रिवि. आरंभापासून : 'आ यदा (था) आमूलार्थे सेवटि कंडारिली' –आंबे शिला १४७.

**आमुष्मिक** वि. दुसऱ्या जगातील; पारलौकिक.

**आमूलचूड** क्रिवि. मुळापासून शेवटपर्यंत; आरंभापासून अखेरपर्यंत.

**आमूलाग** वि. (सास.) प्रारंभापासून शेवटापर्यंत; सर्वांगीण; सर्व बाजूंनी; खालपासून वरपर्यंत; मुळापासून शेंड्यापर्यंत; सर्वस्पर्शी.

**आमेज** पु. भेसळ; मिश्रण, पहा : **अमेज** [फा.]

**आमेट** स्त्री. (खेळात) तहकुबी. (गो.)

**आमेद** स्त्री. आमदानी; उत्पन्न; आमद. पहा : **अमदानी**

**आमेन** उद्गा. (ख्रि.) तथास्तु : 'पाद्रीसाहेब जें जें सांगतील त्यास आमेन् या एक्या पदानेंच उत्तर करावयाचे हीच कां धर्मनिष्ठा ?' – निमा ८७६.
वि. १. स्थिर. २. सत्य; बायबलमध्ये ख्रिस्ताच्या प्रवचनात या शब्दांचे भाषांतर सत्य, सत्य (व्हेरिली, व्हेरिली) असे केले आहे.
पु. १. येशुख्रिस्ताचे एक नाव. २. संमती, समाप्ती दर्शक शब्द. आमेन. [फा. आमीन]

**आमेरीर** पु. बंदुका वगैरे हत्यारे नीट करणारा.

**आमेहरबान** पु. सरकार. [फा.]

**आमोट** सना. आम्ही. [गोंड]

**आमोण** पहा : **अंबोण**

**आमोद** पु. १. सुगंध; सुवास : 'कृष्णमुखकमळ सुंदर । जननयन तेचि भ्रमर । तेथेंचि गुंतले साचार । कृष्णआमोद रसभावें ।'– एरुस्व ६.१८. २. आनंद; सुख. [सं.]

**आमोद–प्रमोद** पु. हितगुज; प्रेमालाप; गुजगोष्टी; प्रेमकथा.

**आमोदित** वि. १. सुगंधित; सुवासिक. २. सुखी; आनंदी. [सं.]

**आमोरासमोर** क्रिवि. समोरासमोर; एकमेकाकडे तोंड करून : 'आम्ही दोघे बंधू आमोरासमोर बसलो होतो.' –पुंडलिक ५.

**आमोरी** स्त्री. दिवे लावण्याची वेळ; तिन्ही सांज. (गो.) (पोर्तु. आव्हि मेरिया किंवा मारीय हे तिन्हीसांजा म्हणावयाचे स्तोत्र.)

**आमोला** पु. १. चोहोकडून मारा. पहा : **आमाला** : 'आमोलेयांचेआं दळभीडा । पुरतां हातियेरूं कैचा तेहवडा ।'– शिव ८८०.
२. वीरपुरुष : 'तुं प्रतापीया रायाचा आमोला'– रुस्व १६००.

**आमोलेपण** न. मारण्याची बुद्धी; शौर्य : 'भीडला समरंगणी आमोलेपणें ।' – शिव ९७९.

**आम्नाय** पु. १. वेद; श्रुती : 'सुकृत कीजे पुसतां । आम्नायातें ।' – ज्ञा १८.२४३. २. अभ्यास. ३. परंपरागत आचार. ४. उपदेश.५. शाखा; एकाच परंपरेला फुटलेले फाटे; उपपंथ. उदा. पारिमांडल्य आम्नाय. [सं.]

**आम्र** पु. आंब्याचे झाड, फळ; आंबा. [सं.]

**आम्रकुल** (वन.) आंबा, काजू, चारोळी, मोई इत्यादी द्विदलिकित वनस्पतींचे कुल. [सं.]

**आम्रपल्लव** पु.वा. १.आंब्याची डहाळी. ही शुभ व अशुभ अशा दोन्ही प्रसंगी वापरतात. २. (ल.) चांगल्या वाईट प्रसंगी पुढे होणारा, विवेकशून्य, हलकट माणूस.

**आम्ल** न. आंबट; आंबटपणा : 'कां चुनियाहुनि दासट । आम्ल हन ।' – ज्ञा १७.१३९.

**आम्लकर** आम्ल निर्माण, उत्पन्न करणारे.

**आम्लकोरण** न.धातू, काच आदीवर आम्लाच्या–ॲसिडच्या साहाय्याने केलेली कलाकुसर. [सं.]

**आम्लपित्त** (आयु.) पोटात निर्माण होणाऱ्या आम्लाधिक्यामुळे पित्तदोष वाढणे. [सं.]

**आम्लमान** न. (कृषि.) एखाद्या पदार्थात किती आम्लता आहे याचे मोजमाप. [सं.]

**आम्लमार्जन** न. (यंत्र) गंज निघून येण्यासाठी धातूची वस्तू योग्य अशा आम्लात बुडवून काढणे. [सं.]

**आम्लरक्तता** स्त्री. (वै.) शरीरात आम्ल जास्त तयार झाल्यामुळे रक्तातील व उत्तीमधील अल्कलीचे प्रमाण कमी होणे. यामुळे रोगट श्वासोच्छवास, डोकेदुखी, एखाद्या गोष्टीचा तिटकारा, उलट्या होणे व दृष्टिदोष ही लक्षणे उद्भवतात. रक्त हे नेहमी अल्कधर्मी असते. ते आम्लधर्मी बनणे हे विकृतिनिदर्शक आहे. [सं.]

**आम्लरोधी** वि. (वै.) आम्लाच्या परिणामास विरोध करणारे, मारक. [सं.]

**आम्लवृद्धि–द्धी** स्त्री. (वै.) रक्तातील, प्रमाणाबाहेरील आम्लामुळे झालेला विकार. [सं.]

**आम्लवेतस्** न. १. महाळुंगाप्रमाणे ही एक लिंबाची जात आहे. ही फार आंबट असते. ही फळे काशीकडे फार होतात; सुळे निंबू. (व.) २. चुका; आंबट भाजी. [सं.]

**आम्लस्त्रावी** वि. (वै.) आम्लरस बाहेर टाकणारी (ग्रंथी). [सं.]

**आम्लारी** वि. (कृषी.) आम्लता कमी करणारी. [सं.]

**आम्लांक** पु. (रसा.) एखाद्या पदार्थात आम्लता अथवा विम्लता किती आहे हे दर्शविणारी मोजपट्टी. [सं.]

**आम्ही** सना. प्रथम पुरुषी मीचे अव. बहुमानार्थी एकवचनी अर्थानेही वापरतात. राजे, सरदार, मोठे लोक, संपादक, अधिकारी इ. आपल्याबद्दल बोलताना 'आम्ही' शब्द वापरतात. पहा : **आपण** : 'आम्ही कोण म्हणून काय पुससी? आम्ही असूं लाडके । देवाचे' – केक (आम्ही कोण). [सं. अस्मद्; अहं]

**आय** पु. १. आटोका; आटोप : 'हे आदिपुरुषाची माया । ब्रह्मेया हीं नयेचि आया ।' – ज्ञा १.२०३. २. अस्तित्व. ३. आकार; स्वरूप : 'ते म्हणती भला भला रे नेटका । बरवी आणिली आया ग्रंथपीठिका ।' – एभा १.१७९. घर वगैरे बांधकामाकरिता जी जागा ठरविली तिच्या लांबी रुंदीच्या गुणाकारास आठाने भागून जी बाकी राहील ती. हे आय आठ आहेत – ध्वज, धूम, सिंह, श्वान, वृषभ, खर, कुंजर व ध्वांक्ष. घर बांधण्यास विषम स्थानाचे आय शुभ व समस्थानचे अशुभ समजतात : 'सभा रचिली तें वेळीं । आठही आय साधले त्या स्थळीं । अष्टदिक्पाळ महाबळी । पायाचे मूळीं स्थापिले ।' – हरि ३४.११५.

**आय** पु. (अर्थ.) १. लाभ; उत्पन्न; मिळकत; भांडवल, श्रम वगैरेंच्या साहाय्याने सुरू केलेल्या उद्योगातील पैशात मोजलेला नफा; फायदा. २. व्यक्तीने देऊ केलेल्या सेवेबद्दल ठरावीक कालावधीत मिळणारी रक्कम. ३. उत्पादित मालाची पैशांतील किंमत. ४. (ज्यो.) कुंडलीतील

११ वे स्थान; आयस्थान. ५. अलुते बलुते; उत्पन्नातील गावकामगाराचा हक्क. पहा : **अलुतीबलुती** ६. आकलन; ग्रहण; स्वाधीन; विस्तार : 'जरि इंद्रियें येंति आया ।' – ज्ञा २.३५१. [सं.]

**आय** न. लोखंड. [सं. अयस्]

**आय** स्त्री. आई. (कु.)

**आय आय** उद्‌गा. अंगात एखादी आकस्मिक वेदना उत्पन्न झाली असता किंवा काही दु:ख झाले असता एकदम उद्गार निघतो तो; अयोयो. [सं. अयि]

**आयकट्ट** न. गावच्या जमिनीच्या मोजमापाचे पत्रक.

**आयकर** पु. (अर्थ.) मिळकतीवर, उत्पन्नावर आकारला जाणारा कर; प्राप्तिकर; व्यक्तीच्या आर्थिक उत्पन्नावर सरकारकडून घेतला जाणारा कर : '१९५४-५५ या वर्षी आयकर देणारे लोक भारतात २०, २८,८०८' – लोस ७०. [सं.]

**आयकरी** पु. गावातील वरठी, न्हावी, सुतार वगैरे; बलुतेदार. यांना कामाबद्दल धान्यरूपाने मजुरी द्यावयाची असते. (व.)

**आयघाल्या** पु. आईवरून दिलेली शिवी : 'ही आगळीक कुंच्या आयघाल्यानं केली' – तअं २४५.

**आयचण-न** स्त्री. १. अडचण : 'गस्त घालावया माझ्या वाड्याला आयचण.' – जसा ३५२. २. अडगळ; कचरा.

**आयचा** उद्‌गा. त्रास, नापसंती इ व्यक्त करणारा उद्‌गारवाचक शब्द.

**आयचो** वि. आजचा. (गो.)[सं. अद्य]

**आयणी** स्त्री. १. इच्छा; हेतू; वासना : 'तुका म्हणे मन तुमचे चरणीं । एवढी आयणी पुरवावी ।' – तुगा १६१९. २. मत. ३. मन; बुद्धी : 'हे सद्‌गुरूची विनवणी । कीं ब्रम्हसुखाची खाणी । परिसतां सप्रेम बोलणीं । रिझली आयणी सज्जनांची ।' – एभा ४.२३. ४. मालिका; ओळ : 'तैसी देशी आणि संस्कृत वाणी । एक भावार्थाच्या सुखासनीं । शोभती आयणी । चोखट आइका ।' – ज्ञा १०.४५. ५. चातुर्य; युक्ती; रीत : 'नातरी जाणिवेच्या आयणी करितां दधि कडसणी । मग नवनीत निर्वाणीं । दिसें जैसें ।' – ज्ञा २.१२९. ६. अभिमान; गर्व : 'तो(शेष) ही बोलिकेपणें आयणी । बोलतां रसना गेली चिरूनि ।' – स्वादि १.२.२१. [आइणी, आयनी इतर रूपे.]

**आयणी** स्त्री. म्हण; आहणा.

**आयत** वि. लांब; विस्तृत; मोठे; ताणलेले; ओढलेले; लांबरुंद : 'पैं कमलायत डोळसा ।' –ज्ञा ११.६९. (वन.) समांतर बाजू असलेले, रुंदीपेक्षा बरीच अधिक लांबी असलेले (पान, फळ इ.)

पु. ज्या चौकोनाचे सर्व कोन काटकोन असतात व समोरासमोरच्या बाजू समान असतात त्याला आयत म्हणतात.

न. स्त्रियांनी उभे राहण्याचे स्थान; एक नृत्य प्रकार. [सं. आ+यम्]

**आयत** स्त्री. कुराणातील ईश्वराचे वाक्य : 'ईश्वराचे वाक्य कुराण शरीफच्या ग्रंथात असते त्यास आयत असे म्हणतात.' – वाड-सनदा २३. [फा. आयत्]

**आयतखाऊ** वि. ऐतखाऊ; आयतोजी.

**आयतन** जागा; स्थळ; राहण्याचे घर; वसतिस्थान; देऊळ; अग्निकुंड : 'परी संतकृपेसि मी आयतन' – एभा ५.७४. [सं.]

**आयतवृत्त** न. (ग.) लांबट वर्तुळ. [सं.]

**आयता** क्रिवि. १. प्रयत्न केल्यावाचून; दगदग, काळजी न करता; हाताशी सज्ज, तयार; श्रम न करता; चालून येणारे : 'पाजी असाचि मजला गंगास्तन आयती सु-धारा हो ।' – मोभीष्म १२.१२. २. बोलावल्यावाचून; आपण कारण झाल्याशिवाय; आपल्या संमतीशिवाय (येणे, प्राप्त होणे, दडणे-माणूस, प्रसंग, इष्ट गोष्ट).

वि. प्राप्त झालेला; आलेला; सध्या हजर; चालत असलेला. (काळाविषयी). [सं. अयत्नत:]

**आयता** पु. तांदळाच्या पिठाचे आंबोळीसारखे एक खाद्य; धिरडे. याचे पीठ आंबवीत नाहीत. हे आयत्या वेळी करता येते.

**आयतामूल** पु. एखाद्या विधवेचा पाट लावण्यापूर्वीचा मुलगा; आयतोळा.

**आयतार** पु. आदितवार; रविवार. (गो.)[सं. आदित्यवार]

**आयताळ** वि. शिवलेले, तयार (कपडे) : 'भिंतीच्या कडला एक आयताळ कपडे घिऊन बसलेला माणूस दिसला.' – वाळवण ९५.

**आयताळे** न. लागणाऱ्या वस्तूंची किंवा पदार्थांची तयारी.

**आयती** स्त्री. १. स्वयंपाकासाठी (निवडून, धुऊन, दळून, ठेविलेली डाळ, तांदूळ, पीठ इ.) साहित्य; सिद्धता; तयारी : 'पहा हो समाराधनेची आयती । घेउनि आला अतिभक्ति ।' – गुच ३८.१५. २. विस्तार; थाट : 'गंभीर वाचा ते आयती । गर्जनेची ।।' – ज्ञा २.७८. ३. सहज; पहा : **आयता** : 'ना ते अखंडचि आयती । परि संगे भिन्न गमली होती । ते सारिलिया मागौती । जैसी का तैसी ।' – ज्ञा ८.४४. ४. प्रतिष्ठा; स्थान.

**आयती** वि. काही न करता; कष्ट न करता; आपोआप : जमीन आयती सुधारून मिळाली.' – माजिया ५९२.

**आयती बायको** स्त्री. न्हाती धुती वयात आलेली स्त्री; वाढलेली, मोठी बायको.

**आयती वेळ** स्त्री. १. पूजा, जेवण वगैरेच्या तयारीची वेळ; ऐन कामाची, घाईची, जरुरीची वेळ. २. मळणीची किंवा पेरणीची घात, वेळ; हंगाम.

**आयते** न. १. धिरडे; आयता (पक्वान्न). २.स्वयंपाकाचे साहित्य. ३. आमटीत टाकण्यासाठी तयार केलेला कच्चा मसाला. (गो.)

**आयतेकार** पु. स्वयंपाकाची पूर्व तयारी करणारा. (गो.)

**आयते सुयते** न. एखाद्या कामास लागणारी हत्यारेपात्यारे, साधन, सरंजाम, साधनसामग्री. [आयतचे द्वि.]

**आयतोजी, आयतगब्बू, आयतमार-ऱ्या, आयतोबा** पु. आयतखाऊ; काही कष्ट न करता दुसऱ्याचे खाणारा; जेवणाच्या ऐन वेळी येणारा; श्रम करण्याच्या वेळी दूर राहून फल प्राप्तीच्या वेळी हजर होणाऱ्या माणसास हा शब्द लावतात.

**आयतोळा** वि. १. श्रम न करता मिळालेला, सापडलेला, आयता. २. (थट्टेने) पाट लावलेल्या विधवेचे पहिल्या घरचे मूल. (हे दुसऱ्या नवऱ्यास आयतेच मिळालेले असते म्हणून).

**आयतोळा** पु. ग्रामीण बायकांच्या गळ्यातील एक दागिना.

**आयतोळा** पु. वड्यांचा एक प्रकार.

**आयत्त** वि. १. स्वाधीन; आधीन; अवलंबून असणारा; अनुयायी; अनुषंगी; हाताखालचा. २. पराधीन. ३. झटणारा. ४. आरंभिलेला.

**आयत्तकंठ** वि. (संगीत) ज्याचा गळा, आवाज स्वाधीन आहे असा (मनुष्य). [सं.]

**आयत्तकंठत्व** न. (संगीत) आवाज ताब्यात असणे.

**आयत्यावेळी** क्रिवि. १. ऐन कामाच्या प्रसंगी. २. नडीच्या वेळेस.

**आयद** स्त्री. वसूल. [फा.]

**आयदण–न, आयदाण–न** न. बांबूच्या बारीक पट्ट्यांची विणलेली पाटी, टोपली, गोण, भांडे. (राजा.गो.) [सं. आयतन]

**आयदी** ऐदी, सुस्त, आळशी, जड, मैंद.

**आयदेपणा** पु.आळशीपणा; ऐदीपणा : 'यांच्या काम करण्याच्या शिताफीची, आयदेपणाची आणि कर्तव्यशून्यतेची कोणासही खात्री झाल्यावाचून राहणार नाहीं.' – लोटिकेले १.१.२६८.

**आयन** न. (रसा.) सामान्यत : विजेच्या बाबतीत उदासीन असलेल्या अणूवर किंवा अणुसंचयावर त्यातील इलेक्ट्रॉन संख्येत वाढ किंवा घट झाल्याने निर्माण होणारा विद्युत उच्चय. [सं.]

**आयनक, आयना** चष्मा; उपनेत्र; चाळिशी, आरशी.

**आयनन कक्ष** पु. (भौ.) काही प्रमाणात निर्वात केलेली इलेक्ट्रोडनी युक्त अशी नळी. [सं.]

**आयनन प्रमापी** पु. (विअ.) ऋण व घन आयनांनी युक्त अशा स्थिर ॲटममधून (अणूमधून) जे इलेक्ट्रॉन बाजूला काढले जातात किंवा आत मिळवले जातात ते मोजण्याचे उपकरण. [सं.]

**आयनबाह्य** वि. (भू.) कर्कवृत्त व मकरवृत्त यांच्या पलीकडचा (ध्रुवापर्यंतचा भूप्रदेश). [सं.]

**आयनरणे–आयनेरणे** अक्रि. आई गरोदर झाली असता तिचे दूध प्याल्यामुळे आजारी होणे; आयनेऱ्याचा रोग होणे. पहा : **अवथणणे**

**आयताकार** वि. (अभियां.) समकोन, काटकोनात ठेवलेला. [सं.]

**आयन विनिमय** पु. (रसा.) आयनांची देवघेव; एका आयनाच्या जागी दुसरा आयन आणण्याची प्रक्रिया.

**आयनवृत्त** न. (ज्यो.) रविकक्षा; कक्षावृत्त व क्रांतिवृत्त यांमधील अंतर. [सं.]

**आयना** पु. आरसा. [फा.]

**आयनायु–यू** पु. (भौ.) आयन, इलेक्ट्रॉन आणि उदासीन अणूंची व रेणूंची जुळणी. यामध्ये कणांची गती ही विद्युतचुंबकीय आंतरक्रियेने भारित केलेली असते.

**आयनावरण** न. आयन कणांचे थर असलेले, रेडिओ संदेश पाठवण्यास आवश्यकल असे पृथ्वीवरील वातावरण.

**आयनिक विक्रिया** स्त्री. (रसा.) विद्रवातील आयनांची अत्यल्प काळात घडून येणारी परस्परावलंबी विक्रिया.

**आयनिक वृत्त** न. (ज्यो.) आयनवृत्त; क्रांतिवृत्त; पृथ्वीच्या भ्रमणकक्षेची पातळी आकाशाच्या गोलाला जेथे भिडते तेथे आकाशगोलावर कल्पिलेले वर्तुळ. सूर्य या वर्तुळावरूनच वर्षभरात एक फेरी मारतो. पहा : **आयनवृत्त** [सं.]

**आयनी** इच्छा; हेतू, वासना.

**आयनी** वि. लोखंडी; लोखंडाचा : 'आयनी गोळे सापडले.' – ऐलेसं ४.१५८८. [सं. आयस् = लोखंड]

**आयनी** वि. (रसा.) आयनासंबंधी. [सं.]

**आयनीकरण** न. (रसा.) अणूमधील किंवा अणुसंचयामधील इलेक्ट्रॉनच्या संख्येत वाढ किंवा घट करून त्यांना आयनरूप देण्याची प्रक्रिया. [सं.]

**आयनीभवन** न. (रसा.) अणुकेंद्राबाहेरील कक्षातली इलेक्ट्रॉनची संख्या कमी किंवा जास्त झाल्याने अनुक्रमे धन आयन व ऋण आयन तयार होण्याची प्रक्रिया. [सं.]

**आयनेरे** न. आईच्या अंगावर पिणे तुटण्यामुळे मुलास होणारी विकृती; आई गरोदर असता तिचे अयोग्य दूध प्याल्यामुळे मुलास होणारी विकृती. (गरोदरपणी आईचे दूध चांगले नसते म्हणून मुलांना यावेळी तोडतात).

**आयपाय** पु. आईबाप. (गो.) [आई+पोर्तु. पाय = बाप] (वा.) **आयपाय वैर करणे** – आईबापावरून शिव्या देणे; आईबापाचा उद्धार करणे.

**आयपूत** पु. दत्तक घेतलेला मुलगा. (राजा.)

**आय प्रगणना** स्त्री. उत्पन्नांची मोजणी.

**आयब** पु. दोष; व्यंग; बट्टा; कलंक. पहा : **अयब** : 'घोड्यास आयब काय आहे?' – राऊ १०२.

**आयबछुपायी** स्त्री. व्यंग, दोष, न्यून, खोड लपविणे : 'आयबछुपायी करून आतां पूर्वीप्रमाणे तिला सर्रास चिकटू म्हटलें तर...' – गांगा १४०–४१.

**आयमाय उधळणे** क्रि. आईचे नाव घेऊन शिवीगाळ करणे; आईचा उल्लेख करून अपशब्द वापरणे; आईमाई उद्धरणे : 'त्येची कुनी आयमाय उधळली तर त्याला न्हाई का राग यायचा?' – पाचोळा २७.

**आयराणी** स्त्री. हडळ, जखीण, जाखाई–जोखाई या सारखी एक क्षुद्र देवता; हिला मायराणी असेही म्हणतात. [वै.सं. आरण्यानी = वनदेवता]

**आयराणी मायराणी** (विनोद, उप.) नट्टापट्टा, नखरा करणारी स्त्री.

**आयलड–डी** क्रिवि. अल्याड; अलीकडची बाजू. (ग्रा.)

**आयला** उद्गा. आईवरून उच्चारलेला एक अपशब्द : 'आयला हे कुठल्या येसवेचं घर..' – रैत ११७. (गो.)

**आयले** वि. अलीकडील. (गो.)

**आयल्यान** क्रिवि. अलीकडे किंवा जवळ. (स्थलदृष्ट्या).

**आयवेल** न. ओल्या नारळाच्या कढवलेल्या रसात मीठ व हळद घालून तयार केलेले औषधी तेल.

**आयव्यय** पु. १. जमा आणि खर्च; वसूल आणि खर्च; उत्पन्न आणि खर्च; येणे देणे. २. (ज्यो.) कुंडलीतील ग्रहांच्या शुभाशुभ

लक्षणावरून मनुष्याच्या आयुष्यातील लाभ, हानी यांचे गणित; आयव्ययाची स्थाने; कुंडलीतील अकरावे स्थान आयाचे आणि बारावे व्ययाचे धरतात. [सं.]

**आयशिलो** वि. जवळचा; लगतचा. (गो.)

**आयशी** स्त्री. आई; आईस. (कों.)

**आयस** वि. लोखंडाचे; लोहमय; लोखंडी.
न. लोखंड : 'सिवतलियाही परिसें । लोहत्वाचिये अवदसे । न मूकिजे आयसें । तैं कवणा बोलु ।' – ज्ञा १८.१७७२.

**आयस्थान** न. (ज्यो.) कुंडलीतील एकदशस्थान : 'सूर्य एकादशस्थानी म्हणजे आयस्थानी स्वगृहींचा अथवा उच्च असेल तर अनेक प्रकारचा लाभ होतील.' – जाबो १७८.

**आयंदा** क्रिवि. यावर्षी; यापुढे.

**आयंडा** पु. १. भात झोडण्यासाठी एका वेळी हातात घेतलेली भाताची पेंडी; पेंढी; लाळा; भाताचा भारा; 'आयंडा आपटला की तीन चार आधोल्या भात .... पडत होते.' – आआशे ३८०. २. भातेण्याचा झोडलेल्या भाताचा भारा. ३. वरील पेंढीस बांधावयाची दोरी. (कों.गो.)

**आयंबे** न. कुत्र्याची छत्री. पहा : **अळंबी**

**आय:शूल** पु. १. लोखंडाचा सूळ. २. मोठे संकट; दुर्दैवाचा घाला. ३. भयंकर पेचाची स्थिती. [सं.]

**आय:शुलिक** वि. १. कार्यतत्पर. २. धाडसी.
पु. सौम्य उपाय न योजता कठोर उपाय योजून जो इष्ट हेतू साध्य करू पाहतो तो. [सं.]

**आया** स्त्री. १. लहान मुलाला सांभाळण्यासाठी ठेवलेली बाई. २. रुग्णालयात परिचारिकेच्या हाताखाली काम करणारी बाई.

**आया** स्त्री. समज; आकलन; आटोका. पहा : **आय** (क्रि. येणे) : 'बोलणें न ये आया बोलक्याचें ।।' – एभा ३.३२. (वा.) **आया आणणे** – आकाराला आणणे; अस्तित्वात आणणे : 'अभिमाने गुण आणिले आया ।' – एभा २२.५५१.

**आया** पु. विस्तार; 'ते चढतेयां भूमीचे आये ।' – ज्ञा १८.४२. २. मान, प्रतिष्ठा; अटकळ अंत. ३. विशिष्ट अधिकारी.

**आयां असणे**– दीन असणे, होणे : 'तोफांची मारगिरी गावात दाणा चारा, दारू गोळा नाही, यामुळे शत्रू आयां आहे.' – ऐलेसं ३५१७.

**आयाओया** पहा : **आय आय**

**आयागमन** न. पुनरागमन; पुनर्जन्म : 'मागती होय आयागमन । सर्व जीवांचें ।' – कथा १.१५.३३. [सं. आय+आगमन]

**आयाज** पु. बट्टा : 'अलीकडे तिस्सापासून रुपया पडला. याचा आयाज ज्याजती आहे.' – ऐलेसं ७४९५.

**आयात** वि. जवळ आलेला; प्राप्त झालेला.
स्त्री. परक्या ठिकाणाहून, परदेशातून बाहेरून आलेला माल.

**आयात अभिकर्ता** पु. परदेशातून माल आणण्याचा व्यवहार करणारी व्यक्ती, संस्था.

**आयातक** पु. परदेशातून आयात करणारा.

**आयातकर** पु. परदेशातून आयात केलेल्या वस्तू, माल इत्यादींवर आकारण्यात येणारा कर. [सं.]

**आयातचोर** पु. चोरटी आयात करणारा माणूस : 'साठेबाज, आयात चोर.. यांना कोणीही संरक्षण देणार नाही.' – आआ ११९.

**आयातजकात** स्त्री. परठिकाणाहून किंवा परदेशातून आलेल्या मालावर घेण्यात येणारी जकात.

**आयातनिर्गत, आयात निर्यात** वि. आलेला व गेलेला; प्राप्त झालेला व निघून गेलेला.
स्त्री. १. परदेशातून आलेला व परदेशी गेलेला माल; परदेशातून माल आणण्याचा व परदेशात माल पाठविण्याचा व्यवहार. २. त्यावरील जकात. [सं.]

**आयातशुल्क** न. (अर्थ.) परदेशातून आणलेल्या मालावर आकारलेला कर.

**आयाद करणे** सक्रि. आणविणे : 'फौजा जाऊन परगणे उद्ध्वस्त जाले. आता कौल देऊन आयाद करावे.' – पेद ३०.९६.

**आयानाम्ल** न. चरबीपासून काढलेले एक आम्ल; तेजाब.

**आयाबंधन** न. येण्याजाण्याचे बंधन : 'यांसि कव्हणाची आयाबंधनीं आक्षेपता नाहीं' – लीचउ १५४.

**आयाबाया** स्त्री. १. शेजारणीपाजारणी; नात्यागोत्याच्या नसलेल्या, कोणीतरी सामान्य स्त्रिया. २. (ल.) नेभळट, कमजोर, नि:सत्त्व किंवा भागूबाई माणूस; पराक्रमहीन, दरिद्री पुरुष.

**आयाम** पु. १. जमीन वगैरेंची लांबी. २. विस्तार; विशेष बाजू. ३. नियमन; नियंत्रण. ४. (विअ.) तरंगविस्तार; दोलविस्तार. ५. (भू.) तरंगाची शीर्षापासून पायापर्यंतची उंची. [सं.]

**आयामांक** पु. १. (भौ.) कंपित कणांतून बाहेर फेकले गेलेले जास्तीत जास्त कण मोजण्याचे माप. २. (विअ.) घटकावयव नियमन करणारा सर्वांत वरचा गुणक. ३. विस्तार गुणांक. [सं.]

**आया येणे** सक्रि. १. समजणे; आकलन होणे : 'कीं शिव ब्रम्हादिकां न येसी आया ।' – हरि २३.१५३. २. प्रत्ययास येणे : 'तें मिथ्या कैसेनि ये आया ।' – रंयोक १.११२६. ३. स्वाधीन होणे; ताब्यात येणे; आटोक्यात येणे : 'ब्रम्हांदिकां नयेचि आया । देव याया देहबुद्धी ।' एरुस्व १३.५०. ४. शरण येणे; पराभव होणे; जेरीस येणे; मऊ येणे. ५. आकारास येणे; अस्तित्व असणे : 'ब्रम्हावेगळी माया । सर्वथा नये आया ।' –एभा २४.४७७.

**आयाल** बेशिस्त, अव्यवस्थित.

**आयालदांडी** स्त्री. आयाळ आणि शेपटीचा बुंधा– दांडी. [फा. आयाल]

**आयाव** न. अहेव; सौभाग्य. (गो.) [सं. अवैधव्य]

**आयास** पु. १. श्रम; मेहनत; दगदग; कष्ट : 'भणौनि तुझां आयास ।' – शिव १२३. २. (अव.) थकवा येणे; गळून जाणे. (क्रि. होणे, पडणे). ३. हार; नरमाई (क्रि. येणे) [सं.]

**आयासप्रयास, आयाससायास** पु. श्रम; कष्ट; मेहनत; कसोशी; अनेक दु:खे; प्रयत्न. [आयासचे द्वि.]

**आयासी** वि. १. कष्टी; श्रमी : 'तें हृदयीं धरूनीही मी कां अद्यापि सांग आयासी ।' – केका२८. २. मेहनत करणारा; कष्टाळू; प्रयत्नवादी; खटपटी.

**आयाळ** स्त्री. घोडा, सिंह इत्यादींच्या मानेवरील लांब केस.

**आयिस, आयिसा** स्त्री. आई : 'तऱ्हीं काइ आयिसांहूनि अंतरंगु ।' – राज्ञा ११.३२.

**आयीद** पु. साक्षी. [फा.]

**आयीन** पु. नियमपद्धती. [फा.]

**आयु** न. आयुष्य; जीवनकाळ. (सामा. शब्द). शतायु [सं. आयुः]

**आयुक्त** पु. विशिष्ट विभागाचा सरकारी मुख्य अधिकारी.

**आयुग्मी** वि. १. (भौ.) एकमेकांना जोडलेले; एकमेकांशी संबंधित. २. (ग.) दिलेल्या राशीशी संकर केल्यास एकक मूल्य अथवा राशी देईल अशी (राशी). [सं.]

**आयुग्मी रूपांतरण** न. (ग.) दिलेल्या रूपांतरणाशी संकर केल्यास होणारे एकक रूपांतरण. [सं.]

**आयुध** न. १. शस्त्र; हत्यार (तलवार, भाला इ.) : 'सत्वकाळीं कामां न येतीं आयुधें । सोयरीं संबंधें सैन्य लोक' –तुगा ३५६. २. (ल.) अवजार; उपकरण; साधन (शेती, कारागिरी इ.चे). [सं.]

**आयुधिका** स्त्री. एखाद्या विशिष्ट कामासाठी लागणारा हत्यारांचा – उपकरणांचा संच, पेटी. [सं.]

**आयुरारोग्य** न. पुष्कळ आयुष्य व आरोग्य; दीर्घायुष्य व जन्मभर आजारापासून मुक्तता; निरोगी स्थिती. [सं.]

**आयुर्दाय** पु. आयुष्यमर्यादा; जीवनकाल. [सं.]

**आयुर्भाव** पु.१. मनातील विचार दृग्गोचर करणे; हावभावाने व्यक्त करणे, सांगणे : 'ऐकोनि श्रोता आयुर्भाव । आशंका घेतली ।' – वेसीस्व १०.१०७. २. आविर्भाव; जोष; ऐट : 'नासरजंग याचा आयुर्भावाचा विध्वंस जाहला.' – हिंद १.२२. [सं. आविर्भाव]

**आयुर्भाव** पु. आयुष्याचा अनुभव : 'तुका म्हणे दुःखें आला आयुर्भाव । झाला बहु जीव कासावीस ।' – तुगा ३९५९. [सं.]

**आयुर्मान** न. आयुष्याची मर्यादा. [सं.]

**आयुर्विमा** पु. आयुष्याचा विमा; जीविताचे काही बरेवाईट झाल्यास आर्थिक संरक्षणाची हमी देणारा विमा कंपनीशी केलेला व्यवहार.[सं.]

**आयुर्विमापत्र** न. विम्यासंबंधीचा तपशील (कालावधी, नियतकालिक हमी, परिपक्वता काल इ.) ज्यात दिलेला असतो ते पत्र. [सं.]

**आयुर्वेद** पु. १. वैद्यक शास्त्राचा मूळ प्रमाणभूत ग्रंथ; ऋग्वेदाचा एक उपवेद. २. रोगचिकित्सेचे व उपचाराचे भारतीय वैद्यकशास्त्र; वैद्यक : 'आणि आयुर्वेदुही आघवा ।' – राज्ञा १३.२२४. [सं.]

**आयुर्वोळी** स्त्री. आयुष्याची रेषा : 'कीं ते आयुर्वोळी लेखाः सर्गादिकल्पाची' –सव११७.

**आयुष** न. जीवनकाळ; (शब्दास जोडून) : 'जैसें गतायुषें शरीरीं । चैतन्य वासु न करी ।' – ज्ञा ३.१०९.

**आयुष्मान्** वि. दीर्घायू; चिरंजीव; पुष्कळ आयुष्य असलेला; एखाद्यास आशीर्वाद देताना 'आयुष्मान भव' असे म्हणतात.
पु. (ज्यो.) सत्तावीस योगांपैकी तिसरा योग. [सं.]

**आयुष्य** न. १. जीवितकाल; हयात; आयुर्दाय; जन्मल्यापासून मरेपर्यंतचा काल; स्थूल शरीरावयव (शरीर), इंद्रिये (ज्ञान ग्रहण करणे), सत्त्व (मन) व आत्मा इत्यादींच्या संयोगास आयुर्वेदाने दिलेली संज्ञा. २. वय; उमर. ३. वेळ; अवधी; फुरसत. [सं.] (वा.) **आयुष्य मागणे** – आयुष्य वाढविण्याबद्दल देवाजवळ प्रार्थना करणे; हित चिंतणे : 'आयुष्य मागेन तुझ्या राज्याला ।' – ऐपो ३२. **आयुष्याचा उन्हाळा होणे** – १. आयुष्यात कोणताही ओलावा न राहणे. २. माया, प्रेम, पैसा, प्रतिष्ठा या सर्वांचा नाश होणे: 'दारिद्र्य, धिक्कार व सामाजिक बहिष्कार यांच्या योगानें त्यांच्या आयुष्याचा उन्हाळा झाला होता.' – विचार १०४. **आयुष्याची दोरी तुटणे** – आयुष्य संपणे, मरणे; मृत्यू होणे. **आयुष्याची दोरी बळकट असणे** –गंभीर दुखण्यातून बचावणे. **आयुष्याचे उणे करणे** – आयुष्य फुकट दवडणे.

**आयुष्यक्रम** पु. दिनचर्या; जीवितक्रम; रोजची वागणूक; वर्तणूक; राहणी. [सं.]

**आयुष्यमर्यादा** स्त्री. जगण्याचा अवधी; एकंदर आयुष्य.

**आयुष्यक्षेप** पु. आयुष्य फुकट घालवणे.

**आयुःशेष** वि. मरणोन्मुख.
पु. १. राहिलेले, शिलकी आयुष्य. २. आयुष्याचा शेवट. [सं.]

**आयुःक्षय** पु. आयुष्याचा नाश; आयुष्य घालवणे; आयुष्य कमी होणे. [सं.]

**आये – अयाये** उद्गा. दुःखोद्गार; शरीरास कष्ट झाले असता निघणारे उद्गार; विवळणे; अयायी–अयोयो, ओयओय इ.[ध्व; आईचे द्वि.].

**आये खंगणे** क्रि. उत्पन्न कमी होणे : 'हा आये खंगला म्हणौनि अर्थ सोडवी' – दृपा ३७.

**आयेतुटी** वि. श्रमलेले; कष्टी झालेले; सामर्थ्यहीन झालेले; अखेरीस टोकावर आलेले : 'तेह वेळीं कुच पर्वताच्या घाटीं । ओघळतां डोळे आले आये तुटी ।' – शिव ५६०.

**आयोग** पु. (राज्य.) विशिष्ट कामे पार पाडण्याकरिता सरकारने नेमलेले उच्चाधिकार मंडळ. उदा. लोकसेवा आयोग, विशिष्ट बाबींची चौकशी करण्याकरिता सरकारने नेमलेले मंडळ. [सं.]

**आयोजक** पु. कार्याची, समारंभाची आखणी, योजना करणारी व्यक्ती. [सं.]

**आयोजन** न. १. ठरवणे; निश्चित करणे; योजणे. २. व्यवस्था; प्रबंध; मांडणी. [सं.]

**आयोजना** स्त्री. व्यवस्था : 'परिसंवादाची आयोजना धर्मशाळेच्या मुख्य हॉलमध्ये करण्यात आली होती.' – चंद १९.

**आयोटा** पु. (भौ.) १. सर्वांत लहान परिमाण. २. ग्रीक वर्णमालेतील 'किंवा' चे प्रतीक म्हणून वापरले जाणारे अक्षर. [इं.]

**आयोडिन** न. अद; हे एक महत्त्वाचे औषधी द्रव्य आहे. याचा बहुधा बिब्याप्रमाणे बाह्योपचाराच्या कामी उपयोग करतात. याच्या अंगी जंतुनाशक व दुर्गंधीनाशक धर्म आहे. पहा : **अद** [इं.]

**आयोधन** न. १. युद्ध; लढाई. २. रणभूमी. ३. वध. [सं.]

**आयोर** पु. आहेर : 'केला सीतानं आयोर'– जसा २६४.

**आयोस** पु. अहो; महाराज : 'आयोसु : तुम्ही सत्र बाहीरी निगों नेदा'– अली.

**आर** स्त्री. अर्धांगवायू : 'आर मारची' – अर्धांग वायूचा झटका. (गो.)

**आर** पु. १.अजगर; अहार : 'आरें धारणु गिळिला'– ज्ञा १३.७२५.

२. सुस्त, आळशी माणूस; अजगर वृत्तीचा, जड माणूस.[सं. अजगर]

**आर** स्त्री. १. भोवरा, जाते, अंकुश, काठाचा शेवट, लाकडी कणा यांची अरी किंवा अणकुचीदार लोखंडी टोक. पहा : **अरी**. २. जरूर; निकड; तातडी; घाई; उत्कंठा; बोचणी. (क्रि. लावणे, लागणे). ३. दोरीचे बारीक टोक किंवा शेवट. ४. अंकुर; मोड–विशेषत: जुन्या नागवेलीस फुटणारे अंकुर, धुमारे. या धुमाऱ्यांचा बियाण्याकरिता उपयोग करतात. ५. (सामान्यत:) पागोरा; तंतू; वेलीचा ताणा; अंकुर : 'तेथ आरघेणें मूळाचें । तें ऐसें असें ।'– ज्ञा १५.७९. ६. काळजी; टोचणी; आच. ७. गुरांना टोचण्याची पराणी : 'जुंतिलें घाणां बांधोनी डोळे । मागें जोडी आर तेणेहि पोळे ।'–तुगा ७०१. ८. (औतकाम) चरकीवर भांडे झिलई (पॉलिश) करताना त्याच्या मधोमध दोन्हीं बाजूंनी लावले जाणारे खिळे. ९. करारीपणा; एखाद्याचे कोणाशी बिनसले असता पुन्हा त्याच्याशी बोलणे–चालणे इ. व्यवहार किंवा संबंध न ठेवण्याची वृत्ती; गर्व; ताठा; अभिमान. [सं. अर]

**आर** स्त्री. गुदस्थानात होणारे गळू.

**आर** स्त्री. चाकाचा तुंबा व पाटा यांच्यामधील लाकडी तुकडा.[सं. अर]

**आर** स्त्री. शरीरावरील केसांचा भोवरा किंवा झुपका. [सं. आवर्त]

**आर** दशमानपद्धतीतील शेतमोजणीचे शंभर चौरस सेंटीमीटरचे माप.

**आर** पु. विटीदांडूच्या खेळातील मोजण्याचा ६ वा आकडा (वकट, लेंड, मुंड, नाल, ऐद, आर इ.). [का. आरू]

**आर** पु. (तत्त्व.) १. सन्मार्ग. २. सत्कर्म. ३. सद्धर्म. ४. मंगलग्रह.

**आर** उद्गा. अरे; अर–र–र. [ध्व.]

**आर** प्र. संस्कृतमधील 'कार' (=करणारा) या अर्थी मराठीतील प्रत्यय, हा कारागिरांना लागतो. जसे–सोनार, सुतार, लोहार, चांभार इ. [सं. कृ–कार]

**आरई** पहा : **अरई**

**आरकट** वि. अर्कट; वस्ताद : 'मुलीची आई मोठी आरकट आणि धनलोभी असते.'– मलोत ७७.

**आरकटी** वि. अर्काटी. कर्नाटकातील एक शहर, तेथील नाणे. 'अर्काटचे होन ते जमा तक्त आरकाटी'– समारो. ४.४६.

**आरकस** पु. करवतीने लाकूड कापणारा.

**आरकाटी** स्त्री. शमीची एक जात. (अहि.)

**आरक्त** वि. लाल; तांबडा; तांबूस: 'मस्तकीं मुकुट कानीं कुंडलें तेज फांके । आरक्त दंत हिरे कैसे शोभले निके ।।'– तुगा ४८३. [सं.]

**आरक्त पेशिका** स्त्री. (प्राणि.) लाल रक्तपेशी.

**आरक्तोष्ण** वि. तांबडे होईपर्यंत तापलेले. [सं. आरक्त+ उष्ण.]

**आरखंडा** पु. डबर; खाणीतून काढलेल्या दगडांचा एक प्रकार. (कों.)

**आरखे** न. कमानी कापण्याची बारीक करवत. पहा : **अरकस** [फा. अरा=करवत]

**आरगढाळ** स्त्री. हयगय. (व.)

**आरगणे** क्रि. गिळणे; खाणे : 'निघालासा चार घास आरगून तरी जावा...' – चिताक १९.

**आरगुंदी** स्त्री. पुष्पविशेष: 'आनववेधाची आरगुंदी : हरिहरब्रह्मादिक पाडळ बचकुंदी.'– मूप्र १९१५.

**आरघाई** स्त्री. उंच सुराने म्हटले जाणारे लळित नावाचे गाणे; गिरकी घेताना गीताचा अर्थ सांगणे: 'घनसान म्हणतां : आरघाई देतां : तया गजरासवें'– उगी ४८(७)४६०.

**आरज** पु. आर्जव; लाड : 'कांहीं न करितील आरज ।' – दावि २६४.
वि. असंस्कृत; ओबडधोबड: 'मऱ्हाटी बोलिला आरज' – तसा. १०२३.

**आरज** स्त्री. आढ्यता.
वि. आर्य; पूज्य: 'जो आरजास गोवी । तो येक मूर्ख ।' – दास २.१.२०. [सं. आराध्य]

**आरज** वि. असंस्कृत; ओबडधोबड : 'मराठी बोलिला आरज'– तसा १०२३.

**आरजा** स्त्री. ऋतू प्राप्त झालेली स्त्री; युवती; तरुण मुलगी: 'हरि म्हणे वस्त्र काढून बुजा । तैसेंच करिती आरजा । म्हणती काय करावें अधोक्षजा । संकट थोर मांडिलें ।' – हरि ९.२७४. [सं. आ+रजस्]

**आरजा** स्त्री. ज्येष्ठ : 'रुक्माई म्हणे परियेसी वो आरजे'– नाम ९४६. [सं.आर्या.]

**आरजु** स्त्री. इच्छा; महत्त्वाकांक्षा; वांछा : 'दिल्लीत काबीजात जाल्यास वजारतची आरजु सुजाअतदौलास आहे व पातशहास तक्तावर बसावे हे जरूर. तेव्हा ते तुमचे मुद्दे मान्य करतील.'– ऐसंसा ७.४४.

**आरड, आरडा** स्त्री. १. आरडाओरड; आक्रोश; बखेडा, २. शीण.

**आरडणे** अक्रि. ओरडणे; रडणे; आक्रोश करणे; हंबरडा फोडणे.

**आरडमुरड** क्रिवि. वेडेवाकडे; मुरडलेले : 'ओठ वाकडेतिकडे, आरडामुरड केले.'– बाविबु २३.

**आरडहुएल घालणे** क्रि. गोंधळ, आरडाओरडा करणे : 'कावळे परड्यात आरडहुएल घालीत होते.'– शेलूक १४७.

**आरडाओरड** स्त्री. गोंधळ; टीका; गवगवा : 'मी बदली केली तर... बरीच आरडाओरड झाली.'– मीशिसं १८५.

**आरडावणे** क्रि. ओरडणे. (व.)[सं. आ+रूद्]

**आरड्या** ओरडणारा.

**आरण** पु. (कृषि.) निळीचा रंग तयार करताना निळीची झाडे भिजत घालतात तो हौद. [सं. आरण = खोलपणा, खोली]

**आरण, अरण** न. आरण्यक म्हणून जो वेदाचा भाग आहे त्यास भिक्षुक लोक चुकीने असे म्हणतात. [सं. आरण्यक]

**आरण** स्त्री. १. अपेक्षा; इच्छा: 'आम्हां द्रव्याची नाहीं आरण । आम्ही करावें वेद पठण ।'– कथा ६.१९.१९८. २. मन आवरणे. ३. उत्सुक होणे. [गुज.] [फा.]

**आरण–आरणी** स्त्री. १. युद्धभूमी : 'जया जिया अक्षौहिणी । तेणें तिया आरणीं । वरगण कवण कवणी । महारथीया ।'– ज्ञा १.१२२. २. युद्धाची उठावणी; युद्धविषयक हुकुम: 'आणि धुरे नाहीं रणीं । तरी कोणें द्यावी आरणी ।' – कथा ३.११.१८०. ३. शस्त्र.४.सैन्य 'दोन्ही आरणीं मिळालीया असेति ।'– गोप्रच २१. [सं. आ+रण]

**आरणा** पु. गवा; रानरेडा; अरण्यमहिष : 'श्रीमंत राजश्री माधवराव यांणीं मजला आज्ञा केली कीं पंतास लिहून आरणे चार उत्तम, लढावयासी योग्य असे आणून देणें.'– मइसा १.१३५.

**आरणी** स्त्री. साड्या; लुगडी (रेशमी जरीची). (तंजा.)

**आरणूक** स्त्री. विश्रांती; अराणूक: 'आरणूक ते मना नाहीं जयाचियां ।'– गीता १२.३१४. [सं. आ +रम्]
**आरणे** अक्रि. आरवणे; कोंबड्याचे ओरडणे. [सं. आ+रू]
**आरणे** अक्रि. अजगरासारखे सुस्त पडणे; अहारणे. (राजा.).
**आरणे** अक्रि. (एखाद्या गोष्टीविषयी) उत्सुक होणे; अधीर होणे: 'आरोनिया पाहे वाट । कटकट सोसेना ।' – तुगा ६७६.
**आरणे** अक्रि. १. ओली जमीन उलणे, भेगलणे, वाळणे, सुकणे. २. शांत होणे; शमणे; तृप्त होणे: 'उपकारी असे आरोनि उरला । आपुलें तयाला पर नाहीं ।' – तुगा २३९५.(बे.) [का. आरू=सुकणे]
**आरण्य, आरण्यक** वि. अरण्यासंबंधी; वन्य; जंगली; रानटी. [सं.]
**आरण्यक** न. वैदिक वाङ्मयातील अध्यात्मविषयक भाग. ब्राह्मणग्रंथांच्या शेवटी हा भाग असून तो बहुतेक गद्य असतो. वेदांच्या प्रत्येक शाखेचे स्वतंत्र आरण्यक आहे. याचे अध्ययन घरात न करता अरण्यात किंवा गावातील एखाद्या देवळात करतात. [सं.]
पु. १. अरण्यवासी. २. वेदान्त.
**आरत** न. आरती: 'रामीरामदासें आरत वोवाळिले ।'– दावि ४८२. [सं. आरतिः]
**आरत** क्रिवि. अलीकडे: 'म्हणतिलें आरत ये श्रमलासि भूपा ।'– दावि ४३८. [सं. आर=सान्निध्य; आरात्]
**आरतले** वि. आवड पुरविणारे; काळजी घेणारे : 'मुलीला आरतलें ठिकाण सांपडले.' (व.) [सं. आर्ति]
**आरता, आरती** क्रिवि. अलीकडच्या: 'केल्याविण नव्हे हातीं । धरोनि आती आरतीपारती ।'– तुगा १६०; 'सूर्याबा रे बंधु आरता ये रे माझ्या दादा ।'– ऐपो ४५. [सं.आर= सान्निध्य; आरात्]
**आरतापरता** क्रिवि. इकडेतिकडे; आजूबाजूला.
**आरती** स्त्री. १. तबकात, लावलेले निरांजन किंवा जळता दिवा ठेवून त्याने देव, गुरू यांना ओवाळण्याचा विधी. २. ओवाळण्यासाठी तयार केलेले दीपासहित ताम्हन, तबक इ. साहित्य. ३. देवास निरांजन ओवाळताना म्हणावयाचे स्तुतिपर गीत. उदा. 'सुखकर्ता दु:खहर्ता । वार्ता विघ्नाची ।' ४. तबकामध्ये काढलेली कमल, स्वस्तिक यांची आकृती. ५. पुरणाचे, तांदळाच्या पिठाचे, कणकेचे दिवे करून त्यात तूप-वात घालून प्रदीप्त करून देवास ओवाळणे. ६. प्रशंसा; सन्मान; बडेजाव. (क्रि. करणे) : 'लॉर्ड सँढर्स्ट यांचीही आरती करण्याचा आमचा विचार आहे.'– लोटिकेले. २.१०३. ७. समाप्ती; कार्याची अखेर (क्रि. होणे): 'नेलोर दंग्याची आरती...'– के ३.१.४२. [सं.]
**आरती कुरवंडी** स्त्री. १. लग्नादी मंगल कार्यात संकट निवारणार्थ स्त्रियांनी वधूवरांना ओवाळणे. (सामान्यत:) आरती; ओवाळणी : 'ओवाळू आरत्या कुरवंड्या येती'– विठ्ठलाची आरती. २. ओवाळण्याच्या विधीस लागणारे साहित्य (निरांजन, ताम्हन, तांदूळ इ.)
**आरद** न. इहलोकातले; मृत्युलोकीचे जीवित; मृत्युलोक : 'सुचि नाहीं स्वधर्म नाहीं । आचार नाहीं विचार नाहीं । आरत्र नाहीं परत्र नाहीं । मुक्त क्रिया मनाची ।'– दास २.४.२२.
**आरदकांडी** (आरद्‌काण्डी) वि. अर्ध्या वयाची; वयस्कर; उतारवयाची: 'गंगामाय जरा आरदकांडी व्हती व तिला बोर्डिंगची माहिती व्हती. म्हणून पोरं जरा तिला मान देत व्हते.'– आप ४२.
**आरदाली** स्त्री. उत्पन्नातला अर्धा मोबदला; निम्मा वाटा : 'आरदालीनं पैसे मिळतील. मिसनकाम करीत करीत शिकून घ्यायचं !' – पाचोळा ४०.
**आरदास** अर्जदास्त.
**आरद्र** वि. भावाकूल; मृदू : 'तैसीं आसुवें येती नेत्रा : आरद्र म्हणौनिया'– मूप्र. १९७१. [सं. आर्द्र]
**आरधेली** वि. अर्धेली; अर्धेल करून व्यवहार व तो करणारा (शेतकरी)
**आरपणे** क्रि. नष्ट होणे. [सं. अर्प.]
**आरपार** क्रिवि. १. वेध्य किंवा उल्लंघ्य पदार्थाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत (वेधणे, उल्लंघणे); थेट मधून, आतून; या बाजूपासून त्या बाजूपर्यंत; इकडून तिकडे; अलीकडून पलीकडे.[पार चे द्वि.] २. पुरेपूर : 'ती आरपार हबकली'– पूपु ९२. (वा.) **आरपार सुजणे–** सर्व बाजूंनी सुजणे; सर्व अंगभर सुजणे.
**आरफुल** न. एक दागिना. (गो.)
**आरबळणे** अक्रि. १. घाबरून जाणे; गुदमरणे: 'तात्काळ विषें आरबळोण। आशंका प्राण सांडिला ।'– एभा २३.६००. २. क्षीण होणे : 'स्वशरीर दु:खें करुनी । आरबळतु जाय प्रतिक्षणीं ।' – रंयोवा १.१०८७. ३. बरळणे; ओरडणे. ४. झोपेने सुस्तावणे.
**आरबा** पु. गोंधळ; गडबळ; धांदल : 'तिचा अगदी आरबा उडल्यामुळें पुढची व्यवस्था तिच्या ध्यानांत आली नाहीं'– चारु. २४३.
**आरबाई** स्त्री. लळीत नावाचे एक मोठ्याने म्हणावयाचे लांबलचक गाणे: 'घनसान म्हणतां आरबाई घेतां'– भाए ४६१.[सं. आ+रु =बोलणे]
**आरबाज** वि. आढ्यतेखोर; आर बाळगणारा. पहा : **आर**
**आरबाट** वि. अचाट: 'आरबाट ताकदीचा.'– खळाळ १६.
**आरब्ध** वि. आरंभिलेले; सुरुवात केलेले; हात घातलेले. [सं.]
**आरब्धकार्य** न. (वेदान्त) प्रारब्ध; संचिताचा एक भाग : 'प्रारब्धासच आरब्धकार्य असें दुसरें नांव आहे.'– गीर २९६.
**आरभटी** स्त्री. १. ओढाताण; गडबड: 'मोठी आरभटी करूनि विकटी दंतावळी चावुनी ।'– आसीस्व ४२. २. वीररसात्मक नाटक. [सं. आरभटी = शौर्य]
**आरभार** पु. भरवसा; भरिभार. (गो.)
**आरभ्य** वि. आरंभ करण्यास योग्य; आरंभणीय.
क्रिवि. आरंभ केल्यापासून. उदा. जन्मादारभ्य : 'एवं कथिलयादारभ्य ।' – ज्ञा १५.५७१. [सं. आ+रभ्]
**आरभ्यमाण** वि. ज्याची सुरुवात किंवा आरंभ करण्यात येत आहे; हाती घेतलेले (काम इ.) किंवा सुरुवात केलेले. [सं.]
**आरमान** स्त्री. इच्छा, हौस.
**आरमार** स्त्री. कपाट; अलमारी. [पोर्तु. आर्मारियु] (गो.)
**आरमार** न. १. लढाऊ जहाजांचा तांडा; जहाजावरील योद्धे, अधिकारी व जहाजावरील युद्धसामग्री या सर्वांस आरमार म्हणतात. २. लढाऊ जहाजे. ३. नाविकदल. [पोर्तु. आर्माडा]

**आरमारकर** वि. आरमाराची गलबते संग्रही असणारा.
**आरमारी** वि. आरामारासंबंधी; नाविक दलासंबंधी.
**आरमारी तांडा** पु. लढाऊ गलबतांचा काफिला.
**आरय** स्त्री. काळी रेती. (गो.) [पोर्तु. आरेइजा]
**आरय** गळू.
**आरल, आरले** न. १. पराग : 'सेवंतेयांचे आरल खुपे तोचि खांडेया भालेयाचे घाय आढें देवढे साहे.'– चक्रसूत्र २४. २. फूल.
**आरव** पु. ध्वनी; शब्द; आवाज.
**आरव** पु. १. वृक्ष : 'संवरितु नगराची बरंव । तैसे चातुर्दक्ष आरव ।'– ऋ १५. २. बाग; अरण्य; राई : 'चळां कल्पतरूचे आरव ।'– राज्ञा १८.१७७६. ३. शेतविभाग (गो.) [सिं. आ+ रुहवन्]
**आरव** पु. अंकुर : 'जेथे शक्तितरूचा आरऊ ।'– शिव १०९. [सं. आरा]
**आरवणी** स्त्री. पक्ष्यांचे– विशेषत: कोंबड्यांचे ओरडणे, आरवणे. [सं. आ+रू–स्व]
**आरवणे** अक्रि. ओरडणे; शब्द करणे. [सं. आ+रू]
**आरवणे** क्रि. अंकुर फुटणे. [सं. आ+रूह्]
**आरवसा** पु. अंकुर; आर; अणुकुचीदार, निमुळते टोक: 'यया महदादि आरवसें । अधो शाखा ।'– ज्ञा १५.१०९. [सं. आर=अंकुर]
**आरवंठा–ठी** पु. कापणी झाल्यानंतर पुन्हा जमीन न भाजता दुसऱ्या वर्षाच्या पेरणीसाठी तसेच राखून ठेवलेले भाताचे शेत. [सं. आ+रूह्वन् = रोप]
**आरवा** पु. तामिळ स्मार्त ब्राह्मण. [सं. तामीळ. अर्वा]
**आरवार, आरवाळीं, आरशिशी, आरशी, आरसी, आरम, आरळी** हे शब्द **'अ'** मध्ये पहा.
**आरवाली** स्त्री. त्रास; खोड्या; उपद्रव : 'राजे वेडे खरेच परंतु त्यासही विचारे करून सांगणे ते सांगावे. बंदीखाना दाखल न करावे. आईसाहेबांनी आरवली सोसावी.'– पुरंद १.२२०.
**आरवाळ** वि. उनाड : 'चंद्रा असली आरवाळ बायको.'– आपा ४९.
**आरवाळी** स्त्री. लहान मुलांच्या खोड्या.
**आरवी** पु. वृक्ष; झाड : 'आरवी वृक्षांतळि आसन ।'– लीच १. ४०.
**आरशिशी** स्त्री. अर्ध शिशी; अर्धे डोके दुखणे.
**आरशी** स्त्री. १. लहान आरसा. २. चष्मा; उपनेत्र.
**आरसड** न. (वस्त्रो.) लावगण (उभा ताणा) तरंगून राहावे म्हणून लावगणाखाली असलेला दोन–तीन हात लांब व एक–दोन सूत जाडीचा लाकडी तुकडा.
**आरसपानी** वि. १. संगमरवरी; आरसे लावलेला (महाल वगैरे). २. (ल.) नितल; मोहक.
**आरसा, आरसपान** पु. संगमरवरी दगड. प्रतिबिंब दिसण्यासाठी तयार केलेली काच; धातूत प्रतिबिंब दिसावे यासाठी केलेली योजना. (धातू चकचकीत करून किंवा काचेच्यामागे पाऱ्याचा मुलामा देऊन); दर्पण; आदर्श : 'पाहातें आरिसां पाहे । तेथें कांहींचि नवल नव्हे ।'– अमृ ६.२. [सं. आदर्श][सं. आदर्श + पाषाण]
**आरसा** पु. १. वेध. २. वेढा. ३. शह: 'पुण्यात नकाशा करून पाठविला त्याप्रमाणें आमची फौज सिकाकोलाकडे जावी त्यास हैदराचा आरसा अदवानीस होता याजमुळे दिवस लागले. आरसा निघून गेला.'– नागभो १.१२४.
**आरसाट्यात असणे** क्रि. ताब्यात, कह्यात असणे : 'पण तात्या त्याच्या आरसाट्यात नव्हता.'– सीए १११.
**आरसुड, आरसोड** आसूड. (व.)
**आरसेमहाल** पु. सर्वत्र आरसे लावले आहेत असा महाल, दिवाणखाना; अयनेमहाल.
**आरस्पानी** पहा : **अरसपानी**
**आरळ** वि. १. नाजूक; अरुवार, मृदू; २. सैल; विस्कळीत; ढिले : 'कवणाचिये सेजे फुलांचे आरळ घालिजे ।'– भाए १३०.
पु. १. फुले. २. फुलांचा मऊ बिछाना : 'मालती मोगरे चंपकी । आरळ घातले हस्तकीं । पथिकातें पहुडावया ।।'– मुह १९४. पहा : **अरळ** ३. नृत्यातील एक मुद्रा : 'मृगीसुरू आरलु : प्रबोधेंसीं घेति आदळु ।'– उगी ४५७.
**आरळी** स्त्री. घोड्याच्या अंगावर उलट्या दिशेने असलेले केस. (हे अशुभ लक्षण समजतात.)
**आरळी** आरोळी.
**आरक्षण** न. राखून ठेवणे; राखीव जागा. [सं.]
**आरक्षित** वि. राखीव; विशिष्ट कारणांसाठी राखून ठेवलेला. [सं.]
**आरक्षी** पु. पोलीस; रखवालदार.
**आरंदळणे** पहा : **अरंदळणे**
**आरंधे** न. संतान नसल्यामुळे होणारे दु:ख : 'तेणें बहुत दु:ख जालें । घरीं आरंधें पडलें । म्हणती आम्हांस कां ठेविलें । दैवें वांझ करूनि ।' – दास ३.३.३७. [सं. आ + रध = नाश]
**आरंबणे – आरंबळणे** अक्रि. १. पोळणे; पेटणे; भडकणे : 'जैसा आरंबळला आगीं ।' – राज्ञा ११.३२०. २. व्याकुळ होणे : 'तेणें दु:खें थोर आरंबळली.'– गोप्र १.
**आरंबळणे** अक्रि. १. आक्रंदणे; हंबरडा फोडणे; विवळणे: 'शरीं खिळिले पांचही जण । आरंबळत पडियेले ।'– रावि २८.४५.२. मरगळणे; क्षीण होणे. [सं. आ+ रम्= शब्द करणे]
**आरंभ** पु. १. सुरुवात; उपक्रम; प्रारंभ; एखाद्या कार्याला, धंद्याला हात घालणे. २. अस्तित्वात आल्यावेळची, मूळस्थिती; प्रथमावस्था, क्रिया, प्रवेश. उदा. जगाचा आरंभ; सृष्टीचा आरंभ. ३. जेथून सुरुवात होते तो भाग; आदिभूत विभाग. [सं. आ+ रभ्]
**आरंभक** न. पूर्व सुकृत; नशीब: 'जयाचे जैसें आरंभक । तैसें भोगवी सुखदु:ख ।'– श्रीचक्र २.१०.१.
**आरंभक** न. (वियं.) एखादे यंत्र किंवा उपकरण चालू करणारा दांडा किंवा कळ. [सं.]
**आरंभण** न. सुरुवात; प्रारंभ.
पु. १. संगीतमर्मज्ञ श्रोता. २. आरंभ करणारा. [सं.]
**आरंभणे** अक्रि. सुरुवात करणे; प्रारंभ करणे; हात घालणे. [सं. आरंभण]

**आरंभवाद** पु. जगाच्या उत्पत्तीसंबंधी एक मत; सूक्ष्म व नित्य परमाणूंचा परस्पर संयोग होण्यास जेव्हा आरंभ होतो तेव्हा सृष्टीतील व्यक्त पदार्थ बनू लागतात. या कल्पनेस आरंभवाद अशी पारिभाषिक संज्ञा आहे.– गीर १४९.

**आरंभवादी** पु. जगाच्या उत्पत्तीसंबंधी एक मत असणारे : 'सांख्य कधी आरंभवादी नव्हते.'– मागोवा २५.१.

**आरंभशूर** वि. कोणत्याही कामास आरंभ करावयाच्या वेळीच जास्त उत्साह दाखवून आळसाने शेवटी अर्धेच कार्य टाकून देणारा; आरंभी उत्साह दाखवून शेवटी हातपाय गाळणारा. [सं.]

**आरंभस्थान** न. जेथून एखाद्या कामाला, गोष्टीला, कार्याला इ. सुरुवात होते असे ठिकाण.

**आरा** पु. (यंअ) १. चक्राला आधार देणारा जोड. २. ज्यामुळे चाक वाकत नाही किंवा वाकडे होत नाही अशी रिम व हाब यांना जोडणारी चाकाच्या आत बसविलेली कांब (चाकाच्या आत अशा अनेक कांबी असतात.) ३. विशिष्ट उद्देशाने तयार केलेली कांब. ४. खीळ, खिटी, पावंडा. ४. करवत. [सं.]

**आरा** पु. वीस पंचवीस हात लांब व चार पाच हात रुंद जमीन; एका नांगराने नांगरण्याइतकी, नांगरभर जमीन. (व.)[का. आरू = नांगर]

**आरा** पु. गवताची चुंबळ; भांड्याखाली ठेवण्यासाठी बनवलेली गवताची गोल बैठक. [सं. हार]

**आरा** पु. साधन; (द्युतात पण वगैरे लावण्यासाठी) द्रव्य : 'तंव देवी म्हणे कर्पुरगौरा । तुम्हां खेळावया नाहीं आरा ।' – कथा २.१५.१२३. [सं.]

**आरा** पु. पिकाची कापणी.

**आरा** पु. लाकडावरची रेघ. [आराखडा] [कर्ना.]

**आरा** पु. रोख; बाजू; प्रदेश : 'आपले बुनगे थोरले बांकानेरचे आऱ्यास गेल्यानें त्यास फार जवळ पडेल.' – पेद ३६.१३६. २. चाकाच्या आरा पु. १. चाकाच्या तुंब्यापासून धावेपर्यंत असणारा उभा दांडा. ३. करवत. [सं. अरा]

**आराइणे** क्रि. १. धारण करणे; धरणे : 'किंवा मनोभिमान धरिला । तोही आजिची सार्थ झाला । जो गोपीमनें आराइला । कृष्णप्राप्तीलागीं ।' – रासपं ५.७११.

**आराइणे** अक्रि. १. अर्पण करणे; अनुकूल असणे : 'परी सर्व प्राणें मजचिलागीं । आराइले असती ।' –ज्ञा १.११०. २. उत्पन्न होणे : 'किंबहुना तृषितालागीं । पाणी आरायिलें असे जगीं ।' –ज्ञा १६.१६१. [सं. आ+ ऋ किंवा आराध्]

**आराइणे** अक्रि. १. थांबणे; बंद करणे; कंटाळणे; पुरे करणे : 'जो भोगितां उन्मनी । आरायेना ।' – ज्ञा १२.२०९. २. तृप्त होणे. ३. विश्रांती घेणे.

**आराखडा** १. कच्चा कागद; खर्डा, स्थूल नकाशा. २. संपूर्ण विषयाची कल्पना देणारे मुद्याचे किंवा महत्त्वाच्या गोष्टींचे टिपण. ३. यंत्राची, इमारतीची आरंभिक रूपरेषा, आलेख किंवा आकृती.

**आराखा** पु. मर्यादा; कुंपण. (व.) [सं. आ+रक्ष्]

**आराजी** स्त्री. क्षेत्रफळ. (व.)

**आराजी** स्त्री. व्यवस्था.

**आराट–ड** स्त्री. आरडा; ओरड. (गो.)

**आराटी** पहा : **अराटी** : 'वोरबडित स्नेहाची आराटी ।' – एभा १०.६.

**आराटेपराटे** वि. उलटेसुलटे. (गो.)

**आराठीमाल** पु. निरनिराळ्या प्रकारचा माल.

**आराणूक** स्त्री. १.विश्रांती, स्वस्थता, स्वास्थ्य, फुरसत. २. शांतता, सौख्य, शांती : 'आराणूक नाहीं चित्ता' – एभा १०.१२५. ३. उसंत : 'बहुत कामें मज नाहीं आराणूक ।' – तुगा ११३. ४. खटपट : 'तुझ्या पायांसाठीं केली आराणूक.' – तुगा ११२०. ५. समाधान; तृप्ती : 'ते कथा आईकां । मनाचिया आराणुका ।' –ज्ञा २.८०.

**आरातणे** क्रि. जवळ येणे; उत्पन्न होणे. अर्पण करणे; अनुकूल असणे : 'कांई लावकैआं केउतें । आरातीचि ना ।' – शिव ११६. [सं. आ+ऋ; आरात्]

**आरातारा** पु. रागरंग. [ताराचे द्वि.]

**आराति–ती** पु. शत्रू : 'दीर्घद्वेषी या सृष्टीचा कोण असा आराति ।' – टिक ३२. [सं. आराति = शत्रू]

**आरातिक** न. आरती : 'आरातिकें घेऊन भक्त येती ।' – सारुह ७.५६. [सं. आरति]

**आरादंत जनित्र** न. (विअ.) करवतीच्या दात्याच्या आकाराची कंपने निर्माण करणारे जनित्र. [सं.]

**आरादंती** वि. (भौ.) करवतीसारखे अणकुचीदार दाते असलेला.

**आरादुपकारी** वि. (तत्त्व.) साहाय्यकारी; उपकारी : 'कर्माला वाचस्पतीने आरादुपकारक म्हणजे मोक्षाचे दूरान्वयी साधन म्हटले आहे.' – मतम २.२२४. [सं.]

**आराध** पु. खटपट; श्रम : 'आराध करी सोसी । त्यासी हांसे तो आळसी ।' – तुगा २७३५. [सं. आ+राध् =तुष्ट करणे]

**आराधक** वि. १. आराधी; उपासक; भक्त; आराधना करणारा. [सं. आ+राध् = पूजा करणे]

**आराधणूक** स्त्री. १. पूजा; सेवा; प्रार्थना. २. एखाद्याची मर्जी प्रसन्न ठेवण्याचा किंवा संपादन करण्याचा प्रयत्न. [सं. आराधना]

**आराधणे** उक्रि. १. पूजा, सेवा, भक्ती, स्तुती, भजन, मनधरणी, खुशामत करणे : 'एकाभावें तुम्ही गायत्री आराधिजे ।' – वसा २०. २. संपादन करणे; मिळवणे. [सं. आ+राध् = मिळवणे].

**आराधन** न. १. पूजा; भक्ती; प्रार्थना; सेवा; उपासना; खुशामत; मनधरणी : 'योगादिकें साधनें । साकांक्ष आराधनें ।' – ज्ञा ३.९०. २. प्राप्ती; उपार्जन; संपादन. ३. उपास्य देवता : 'माझें आराधन । पंढरपुरीचें निधान ।' – तुगा ८२१. [सं.]

**आराधना** स्त्री. १. उपासना, भक्ती, मनधरणी. २. ब्राम्हण भोजन; संन्यासी समाधिस्थ झाल्यावर त्याच्या वर्षश्राद्धाच्या दिवशी प्रतिवर्षी प्रथम श्राद्ध करून नंतर ब्राम्हणपूजन, त्यांच्या तीर्थाचे पूजन, ब्राम्हणभोजन इ. करावयाचा विधी. संन्याशाच्या पुण्यतिथीचा समारंभ. [सं.]

**आराधित** वि. पूजिलेला; सेविलेला; प्रार्थिलेला; आराधना किंवा प्रयत्न केलेला. [सं.]

**आराधी, आराधीण** पु. स्त्री. (विप्र) आरादी-ण. १. आराधना करणारा-री. २. (विशेषत:) देवीचा पुजारी-ण, भक्त; खंडोबाचा भक्त. ३. खंडोबाच्या, देवीच्या-देवीच्या नावाने भिक्षा मागणारी एक जात. ४. भोलाईचे भक्त; नपुंसक; षंढ. [सं. आराधी-धिनी]

**आराधुरा** पु. १. सारासार विचार. २. भीडमुर्वत. (व.)

**आराध्य, आराधनीय** वि. १. पूजा किंवा भजन करण्यास योग्य, लायक. २. ज्याची खुशामत किंवा चाकरी करायची तो. ३. प्राप्त करून घ्यावयाची वस्तू; संपादनीय गोष्ट : 'मोक्षु दुराराध्यु कीर होय ।' -ज्ञा ११.९९. [सं.]

**आराध्यदेवता,दैवत** स्त्री. १. कुलस्वामिनी-स्वामी; कुलदेवता; कुलदैवत; उपास्यदेवता. २. खुशामत्या ज्याची खुशामत करतो तो. (तो माणूस खुशामत्याचे आराध्यदैवत असते.)

**आराध्य ब्राम्हण** पु. गळ्यात जानवे व लिंगाकृती प्रतिमा घालणारे आणि भस्म व रुद्राक्ष धारण करणारे विशेषत: आंध्र प्रदेशातील शैव ब्राह्मण.

**आराध्यलिंग** न. उपास्य दैवत; पूजनीय देवता : 'सज्जन वनचंदना । आराध्यलिंगा ।' - ज्ञा १०.३. [सं.]

**आरानक** स्त्री. स्वास्थ्य; समाधान : 'मनाचिया आरानका: चितु देई' - ऋम ३८८.

**आरापारा** क्रिवि. तुरळक; विरळपणे; इकडेतिकडे. (राजा.) [आर = इकडे + पार = तिकडे]

**आरापुठ्ठा** पु. शरीराची ठेवण, बांधा; अंगलट. (ना.) [आरा व पुठ्ठा हे चाकाचे अनुक्रमे उभे लाकूड व नाभ्भी हे भाग आहेत.]

**आराब** न. एक वाद्य; ताशा. (गो.)[फा.]

**आराब-बा** पु. १. पहा : **अराबा**. २. घोटाळा; गोंधळ; रगाडा; पसारा.

**आराबा** पु. सरंजाम; तोफखाना; हस्तक.
स्त्री. गाडी; तोफखान्याची आग; मार.

**आराबाय** स्त्री. मध्ये लुडबूड करणारी स्त्री. (गो.)

**आराम** पु. (जरतारी धंदा) विवक्षित अंशापर्यंत (तारेस) झिलई येण्यासाठी उष्णता देणे.

**आराम** पु. १. विश्रांती; विसावा; आनंद : 'ज्याचा आराम मजमार्जी ।' - एभा ११.७४८. २. दु:ख किंवा आजारापासून मुक्तता; स्वास्थ्य; सुखरूपता : 'दौलानीं तबियत आराम झाल्याची नबाबास मजर पाठविली.' - मइसा ७.१२०. ३. बाग; उपवन; उद्यान; क्रीडाभुवन : 'आगमनिगमांचा कल्पद्रुम । कीं सकळ विद्यावल्लींचा आराम ।' - जै १.५७. ४. (संघ व्यायाम) एक आज्ञा. हात खाली सोडून, दोन पायांत एक फूट अंतर ठेवून ताठ उभे राहणे. ५. बाण. ६. खेळ.

**आरामक** पु. उद्यान; मळा : 'आरामक' - लोणा. शिला. १०९.

**आरामकक्ष** पु. विसाव्याची जागा (मोठ्या हॉटेलमधील, सभागृहातील वगैरे). [सं.]

**आरामखाना** पु. १. विश्रांतिस्थान; शेजघर. २. अठरा कारखान्यांपैकी एक. [फा.]

**आरामखुर्ची** स्त्री. जिच्यावर आरामात बसता येईल, निजता येईल अशी कापड किंवा वेत वगैरे लावलेली खुर्ची. : 'तो आरामखुर्चीवर स्वस्थ पडून होता.' - नाकु २.

**आरामगाह** पु. आरामगृह. [फा.]

**आरामगृह** न. विश्रांतीचे ठिकाण; विश्रामधाम; विसाव्याचे स्थान. [सं.]

**आराममतलब** वि. सुखासक्त; सुखासीन : 'हे लोक कामचुकार नाहीत, आराममतलब नाहीत...' - जजदि ८८.

**आरामशीर** वि. १. सुखदायक; सुखावह; स्वस्थता, हुशारी देणारा, आणणारा (झोप, औषध, पथ्यपाणी वगैरे);आनंददायक (रस्ता, वाहन वगैरे). २. काहीही न करता, आराम मिळेल अशा प्रकारे. [फा.]

**आरामुख** पु. बाणाचा एक प्रकारचा. [सं.]

**आरायणे** क्रि. प्रसन्न होणे : 'मि अमूकेया तमूकेया गेलां होतां : तो आरायचि ना' - लीच २.६१.

**आरारूट** न. ज्यापासून पौष्टिक मैदा तयार करतात असे झाड व त्याचा कंद. आरारूटचे झाड साधारण हळदीसारखे असते. या झाडाच्या फांद्यापासून बलक काढतात व त्यापासून तवकील तयार करतात. ते हलके व सहज पचण्यासारखे असल्यामुळे लहान मुलांना व आजारी माणसांना देतात.

**आराला** वि. उत्कंठित.

**आराव** पु. शब्द; आवाज; पक्ष्यादिकांचा गलबला; ध्वनी; गर्जना : 'अमररवेंचि भरावें तें नभ बहु न मानवा रावें ।' - मोविराट ५.७५. [सं. आ+रू = आवाज करणे]

**आरावण** पु. लग्नाच्या वरातीत नारळ, चंदन, तांदूळ, खण वगैरे एका बांबूच्या दुरडीत घालून नोकराच्या डोक्यावरून वाहून नेतात ती दुरडी. या दुरडीत वधूगृही शास्त्रीय विधीसाठी वरास लागणारे सामानही असते. (गो.) [सं. आहरण = भूषण, अलंकार]

**आरावणे** क्रि. आटोक्यात आणणे. (गो.)

**आरावणे** क्रि. १. हातपाय ताणून निजणे; अहारणे. २. आराम करणे; विश्रांती घेणे : 'तियें म्हणति सेतासीवाराचे दीस : आम्ही आरावोंना:' - लीच २.४१.

**आरास** सुंदर रीतीने केलेली मांडणी, सजावट.

**आरासारा** पु. आवरासावर; आवराआवरी; (सामान इ.) थोडक्या जागेत नीटनेटके लावून ठेवणे. [आवरासावरचा संक्षेप]

**आरिख** वि. १. ऋषिप्रणीत; छांदस; वैदिक : 'पुराणिचे आरिख बोल.' - वछा ९७. २. छांदिष्ट; आर्ष; अव्यवस्थित : 'जेवि कां तें बाळ अज्ञान पंचवार्षिक । जडबुद्धि केवळ आरिख ।' - स्वादि ४.४.४२. ३. बोबडे; असंस्कृत; गावंढळ : 'तो आरिखा शब्दांमाझारी । चातुर्य बोलां ते पुरी । स्वाक्षरें मुखाबाहेरी । पडो नेदी ।' - ज्ञाप्र ७९२. [सं. आर्ष]

**आरिख्यक कला** (सास.) रंगाच्या व उठावांच्या ऐवजी रेषांच्या साहाय्याने प्रगट होणाऱ्या कला.

**आरिगळा** पु. अडसर : 'येमाचीं द्वारे फोडुनु । खिळी आरिगळा मोडुनु । उपडिलें दाखिलें ।।' - क्रिपु २.४१.१२४. [सं. अर्गला]

**आरी** स्त्री. १. चर्मकाराचे हत्यार, याने कातड्यास भोके पाडतात. २. चाकाचा भाग. ३. करवत. ४. निर्गंध वृक्ष; बेल्या खैर : 'लागले

आळवीचें रान आरीबोरीचें दारुण' – वसा ७. [सं. आर] ५. (तंतुवाद्ये) सतार वगैरेंची तारा ओवण्यासाठी एक व तारा टेकवण्यासाठी एक हस्तिदंती फणी. ६. कोंबडयाच्या डोक्यावरील तुरा. (कु.) ७. कोळशाची भुकटी.

**आरी** स्त्री. स्था. टोपण.

**आरीफ** वि. जाणता; सूज्ञ : 'विशेष लिहावें तरी महाराज साहेब आरीफ असेती.' – मइसा ८.७. [फा. आरिफ़्=जाणता]

**आरीबोरी** स्त्री. १. आरी, बोरी यासारखी विशेषत: काटेरी व फुलांस वास नसलेली झाडे : 'चंदनाचे संगतीवरी । सुवास होती अरीबोरी । त्यातें देवद्विज वंदिती शिरीं । तेवी साधकां करी सत्संग ।' – एभा २९.२५२. २. (सामान्यत:) बोरीचे झाड; बोरीबरोबर आरीचाही निरर्थक उल्लेख येतो : 'आरी बोरी रुई कारली ती शीघ्र आण । जवळि राखण मांडा ।' – वसा ७. [सं. आरि+बोरी किंवा बोरीचे द्वि.]

**आरीयत** स्त्री. शरम : 'गुदस्तां दादासाहेब पुण्याजवळून आले; परंतु पुणें पाहिलें नाहीं हे आरियत मातुश्रीस फार आहे.' – मदबा १.६२. [फा. आर् =लाज]

**आरु** स्त्री. बैलांनी पळावे म्हणून केलेली लोखंडी तीक्ष्ण टोचणी. (व.)

**आरुच** स्त्री. अरुची; अप्रीती; नावड : 'त्यास तरी आमचे ठायीं आरुच पुढें मसलत कोनती करावी.' – पेद २५.२७८. [सं. अ+रुचि]

**आरुता** स्त्री. १. योग्यता : 'म्हणोनि लोटिला ऊर्ध्व चरणी । आरुता नाहीं स्वर्गभुवनीं ।' –कथा ३.७.३३. २. सामर्थ्य : 'अगे बायो मला आरुता नाही गे पैसे देण्याची.' – सांजवात १७९. [सं. अर्हता]

**आरुता–ती–ते** क्रिवि. अलीकडे; जवळ; अगोदर; इकडे : 'वहिली गे धाअे । वालावी आरुतीं ।'. शिव – ८२९. [सं. आरात्]

**आरूनफिरून** क्रिवि. १. फिरून फिरून : 'आरूनफिरून एकच विचार मनात घोळत राहिला.' – ऊन ४८. २. मधूनमधून.

**आरुष** वि. (प्र.) आर्ष; छांदस; वैदिक. १. असमंजस; असंबद्ध; वेडीवाकडी; गावंढळ; बोबडी; रुक्ष; छांदिष्ट; पोरकट; अडाणी (वाणी, बोल, भाषण, कृती वगैरे) : 'ते माझे मऱ्हाटे आरुष बोल । सद्‌गुरूनें केले सखोल ।' – एभा १६.७. २. मंद; मूर्ख; अजागळ; रुक्ष; गोसावड्यासारखा : 'या आरुष नामांचा चाळा । घेऊनि गर्जती वेळोवेळां ।' – एभा ५.४१२. [सं. आर्ष]

**आरुसा** वि. टोकदार.

पु. जुंपणीस ज्या कड्या असतात त्यांना बांधणारा सळ किंवा वादी.

**आरुसा करणे** क्रि. (चर्मकार धंदा) दोऱ्याचे टोक बारीक करणे.

**आरू** न. अंग.

**आरूढ** वि. १ चढलेला; वर बसलेला, गेलेला; आरोहण केलेला (क्रि. होणे) : 'जऱ्ही संग्रामारूढ आहों । जाहलों आम्हीं ।' – ज्ञा ४.३०. सामा. शब्द – अनुभवारूढ = आनुभविक; इंद्रियारूढ = इंद्रियांच्या योगाने जाणीव झालेला; अधिकारारूढ, गर्वारूढ, पदारूढ, ज्ञानारूढ; संप्रदाय–धर्म–योग–राज्य–स्थान–काम–क्रोध–लोभ–शांती–कर्ण–जिव्हा वगैरेवर आरूढ. २. उगवलेला. [सं. आ+रूह्]

**आरूढणे** क्रि. १. आरूढ होणे; वर चढणे; वर बसणे; स्वार होणे : 'असों हें जमासीं जेयांचा भेदारा । तें राउत आरूढिलें ।' – शिव ९३८. २. (ल.) लोकांच्या तोंडी असणे; बभ्रा होणे; बोभाटा होणे.

**आरूढि–ढी** स्त्री. १. वर चढणे; आरोहण. २. सूर्य, चंद्र वगैरेंचा उदय.

**आरूदार** वि. टोकदार : 'आरूदार जोड्याच्या करकराटानं तिला भानावर खेचलं.' – शिळान ७२.

**आरे** वि. कर्नाटकातील दक्षिणी लोकांची एक जात; दक्षिणेकडे मराठे जातींना आरे हे उपपद लावतात. [सं. आर्य]

**आरे** उद्गा. अरे, संबोधनार्थी.

**आरेकस** करवत चालविणारा.

**आरेकसणे** पहा : **अरकसणे**

**आरेख–खा** पु. निग्रह; संयम; धाक; वचक; ताबा.

**आरेखक** पु. आकृत्या काढणारा; मसुदा तयार करणारा. [सं.]

**आरेखणे** उक्रि. आरेख्यात ठेवणे; ताब्यात, धाकात ठेवणे; संयमन करणे; निग्रह करणे.

**आरेखन** न. एखाद्या वस्तूचा आराखडा, बाह्याकार लेखन किंवा नकाशा. [सं.]

**आरेखन कक्ष** पु. चित्रे, नकाशे वगैरे काढण्यासाठी कार्यालयांत, शाळांत असलेली स्वतंत्र खोली, दालन. [सं.]

**आरेखनकौशल्य** न. इमारती, प्रकल्प वगैरेचे नकाशे, आराखडे तयार करण्याची कला, कसब, रेखाटनकौशल्य. [सं.]

**आरेभेरे** क्रिवि. अप्रत्यक्षपणे; परभारे. (गो.)[भेरे चे द्वि.]

**आरै** स्त्री. गळू; फोड : 'इंद्रभटा आरै जाली होती.' – लिचउ १४७.

**आरोगण–णा** न. स्त्री. भोजन; जेवण; मेजवानी; भोजन करणे; अन्न सेवन करणे : 'आंघोळी देवें पूजा सारिली । आरोगणा सपरिवारीं जाली ।' – शिव ५७६. [का. आरोगण = खाणे]

**आरोगणे** उक्रि. भोजन करणे; खाणे; जेवणे : 'दोषादोष न पाहता प्रभुवरा । आरोगिसी चांगलें ।' – निमा १.५०. [का. आरोगण]

**आरोग्य** न. १. निरोगीपणा; (प्रकृतीचे) स्वास्थ्य.

**आरोग्यधाम** न. आजारी माणसाच्या देखभालीसाठी व प्रकृती सुधारण्यासाठी असलेली संस्था; हवा पालटण्याचे ठिकाण; आरोग्यभुवन. [सं.]

**आरोग्यविज्ञान** न. १. आरोग्य नीट राखण्यासंबंधीचे शास्त्र. [सं.]

**आरोग्यसंपन्न** वि. चांगले स्वास्थ्य लाभलेला, निकोप प्रकृतीचा; उत्तम आरोग्य असलेला. [सं.]

**आरोठा** पु. कापणी केलेले भाताचे शेत.

**आरोड** पु. ओरडा : 'कोन शिंग फुंकतो, असा आरोड उठला.' – श्रीयो २.१२३.

**आरोण** न. चाराच्या फळापेक्षा थोडे लहान असणारे व अंबूस–गोड स्वादाचे एक जंगली फळ. (ना.)

**आरोथा** स्त्री. १. तीव्र इच्छा; उत्कंठा : 'पायांवरी डोई ठेवाया आरोथा– झाली द्यावी सत्ता क्षेम ऐसी ।' –तुगा ३८०४. पहा : **अरुता** [सं. आर्ति]

**आरोधन** न. (वियं.) १. ब्रेक लावून थांबवणे, (गती) सावकाश करणे. २. वाहनाचा वेग मर्यादित ठेवण्याचे यंत्र–उपकरण. ३. यंत्राचा वेग,

हालचाल, भ्रमणशक्ती कमी करण्याकरिता योजलेले उपकरण.[सं.]

**आरोधी** पु. (यंअ.) गतिरोधक (हे लाकूड, चामडे, रबर, धातू इत्यादींचे बनविलेले असतात.) [सं.]

**आरोधीनियंत्रण** न. (यंअ.) यंत्राचा किंवा वाहनाचा वेग मर्यादित करणारे उपकरण. [सं.]

**आरोप, आरोपण–णा** पु. न. स्त्री. १. लावणे; पुरणे (वृक्ष इ.) २. (ल.) चिकटविणे; लावणे; जोडणे; दोष आपला असताना तो सोईस्करपणे दुसऱ्यास चिकटविणे : 'परी करिता बीजारोपण । अंकुर जाण त्या नाहीं ।' – एभा १३.५८३. सामा.शब्द : वृक्षारोप, बीजारोप, स्तंभारोप, दोषारोप, गुणारोप वगैरे. ३. धर्म; गुण : 'शोषण उष्णादि आरोप । तेज जाणावें ।' – दास ८.५.२८; 'मना कोपआरोपणा तें नसावी ।' –राम १०७. ४. दोषारोप; गुन्हा लावणे; ठपका ठेवणे : 'जल्पती ठेवूनि आरोपण ।' – दावि २८५. ५. (अलंकार) उत्प्रेक्षालंकार. उदा. 'तेजस्वितादि कारणामुळें सूर्यत्वाचा आरोप करून हा ब्राह्मण केवळ सूर्य आहे असा आरोप होतो'; 'कां वस्त्रपणाचेनि आरोपें । मूर्खाप्रति तंतु हारपे ।' – ज्ञा १८.५४४. ६. खोटा आळ; बालंट; चुकीची समजूत; चूक. ७. ठेवणे. ८. चढविणे. ९. बोजा लादणे. १०. नसता गुण कल्पिणे. ११. (वै.) एका शरीरात दुसऱ्या शरीरातील सदृश भाग–अवयव घालणे, अथवा शस्त्रकर्माने चिकटविणे, अवयवारोपण. [सं. आ+रोप्]

**आरोपणे** उक्रि. १. लावणे; रोपणे; पेरणे; पुरणे; रोवणे : 'नातरी विधिचिये वाफे। सत्क्रियाबीज आरोपे ।' –ज्ञा १३.३२. २. (ल.) चिकटविणे; अंगी लावणे; लादणे : 'तैसी इये निर्मळ माझ्या स्वरूपीं । जो भूतभावना आरोपी ।' –ज्ञा ९.७९. ३ हवाली करणे; सोपविणे; स्वाधीन करणे; वर ठेवणे : 'शस्त्राग्रीं जिव्हारें । आरोपुनी ।' – ज्ञा १.२२. ४. राहणे; ठाकणे; माजणे : 'मग अधर्मुचि आरोपे । कुळामाजीं ।'– ज्ञा १.२४५. ५. आरोप ठेवणे; दोष देणे; ठपका ठेवणे; आळ घेणे. [सं. आरोप्]

**आरोपपत्र** न. एखाद्या व्यक्तीने गुन्हा केल्याच्या संशयावरून त्याच्या विरुद्ध पुराव्यासह दाखल केलेले दोषारोप ठेवणारे पत्र.

**आरोपमुक्त** स्त्री. अपराधाच्या आरोपातून मोकळे होणे–करणे; दोषमुक्ती; अपराधमुक्ती. [सं.]

**आरोपयोग्य** वि. आरोप करण्याजोगा; दूषणीय. [सं.]

**आरोपित, आरोपी** वि. १. आरोप केलेला; आरोप असलेला. आरोपाच्या सर्व अर्थाने पहा : **आरोप** २. खोटा; बनावट; ढोंगी. ३. गुन्हेगार; ज्याच्यावर आरोप ठेवला गेला आहे असा : 'प्रेसअॅक्टाप्रमाणे आरोपित लेखांचा नाट्यदृष्ट्या विचार करण्याचा अधिकारच .... कोर्टाला नाहीं.'– लोटिकेले ३.३५३. [सं.]

**आरोपित** वि. १. लादलेला. २. कल्पिलेला. ३. चढविलेला.

**आरोबा** पु. तोफखाना; तोफ.

**आरोरा** पु. प्रभात; उषा; अरुण; प्रभातकालीन आकाशाचा वर्ण. [इं.]

**आरोरा बोरिआलिस** पु. उत्तरध्रुवाकडील प्रदेशात पडणारा एक चमत्कारिक प्रकारचा प्रकाश.

**आरोशापारोशाने** क्रिवि. स्नान न करता, न धुता तसाच (माणूस, कपडा, भांडे वगैरे). पहा : **पारोसा** [पारोसाचे द्वि.]

**आरोह** पु. (संगीत) षड्ज स्वरापासून वर निषादाकडे स्वर म्हणत जाणे. [सं.]

**आरोह, आरोहण** पु. न. १. चढणे; वर जाणे; उठणे : 'सिंहासन होईन आपण । वरि गुरु करिती आरोहण ।'– ज्ञा १३.४२५. २. (ल.) प्रगती; वाढ; वृद्धी. ३. आरंभ करणे; उद्युक्त होणे : 'चढतें प्रेमाचें भरतें । तें नावेक आवरोनि चित्तें । पुढील कथा निरुपणातें । करीं निश्चितें आरोहण ।' – एभा १.१७६. [सं. आ+रुह्]

**आरोहक** पु. चढणारा; स्वार होणारा. [सं.]

**आरोहण करणे** अक्रि. चढणे; वर जाणे; स्वार होणे.

**आरोह पर्जन्य** पु. (भू.) ऊर्ध्व दिशेने वाहणाऱ्या वातप्रवाहामुळे जमिनीवर न पडता उलट वर जाणारा पाऊस.

**आरोहवर्षाव** पु. (भू.) आकाशातून खाली येताना ऊर्ध्व दिशेने वाहणाऱ्या हवेमुळे पुन्हा वर जाणारा पाऊस अथवा हिम.

**आरोही** पु. (विअ.) वस्तू वर उचलण्याचे उपकरण. [सं.]

**आरोही** वि. १. (भू.) तापून वर चढणारा हवेचा प्रवाह. २. (ग.) वर चढत जाणारे.(अंक) [सं.]

**आरोही प्रधानवाही** स्त्री. (विअ.) १. वीजप्रवाह वाहून नेणाऱ्या मुख्य तारा. २. ( जयां) पाण्याची चढणीवर जाणारी मुख्य नलिका.

**आरोही फल** (फल्) न. (ग.) स्वचलाच्या वाढत्या किंमतीबरोबर ज्याचे मूल्य वाढत जाते असे फल. [सं.]

**आरोही लहर** स्त्री. (भूशा.) चढणीची लाट (पर्वतांची). [सं.]

**आरोही वर्ण** पु (संगीत) षड्जापासून निषादाकडे वर गात जावयाचे स्वर[सं.]

**आरोही श्रेणी** स्त्री. (ग.) जिच्यातील पदांची किंमत क्रमाक्रमाने वाढत आहे अशी श्रेणी. [सं.]

**आरोळा** स्त्री. नांगराची पुढची फळी : 'आरोळ्यावर बसलों व्हतों.'– पेरणी ५४.

**आरोळी** स्त्री. १. जोराची हाक; ललकारी. २. मोठ्याने ओरडणे; गरजणे; गर्जना करणे: 'बाळें चरफडतां देखें जाळीं । आक्रंदोनि दे आरोळी ।'– एभा ७.६००. [सं. आ + रु = आवाज करणे]

**आरोळी** स्त्री. १. कणीक व हरभऱ्याचे पीठ एकत्र करून त्यात तूप, मीठ, साखर, वेलची इ. घालून तिंबून त्याचा भज्याप्रमाणे तळून करतात तो खाण्याचा पदार्थ. २. गाखर; गाकर; निखाऱ्यावर भाजलेली जाड पोळी. ३. चांदकी; पानगी; अरोळी.

**आरौत** क्रिवि. अलीकडे; अगोदर : 'दिसे हा आरौता । कर्मभागु ।।'– ज्ञा २.२७४.

**आरौते** क्रिवि. १. पूर्वी; अगोदर. 'पैं चंद्रोदया आरौतें । जयांचे डोळे फुटती असते । ते काऊळे केवी चंद्रातें । वोळखती ।'– ज्ञा ४.२४. २. अलीकडे; या बाजूला : 'चौघे शापूनि केलें परते । कनिष्ठा पाचारिलें आरौतें ।' – मुआदि १९.१०२. ३. शिवाय; विना : 'जैसें कल्पांतीचें भरितें । स्थळ जळां दोहीतें । बुडविल्या आरौतें । राहूंचि नेणें ।'– अमृ ४.११.

वि. अपुरे; कमी : 'तो काय बोलोनि दाखवूं आतां । बोलणें बोलतां आरौते पडे ।'– निगा १९६. [सं. आरात्.]

**आर्क** स्त्री. १. बालेकिल्ला; अर्क २. कमान, चाप.[इं.] (वा.) **आर्का घालीत वचणें (जाणे)**– वाकडेतिकडे जाणे; झिंगत जाणे. (गो.)

**आर्क लाईट** पु. (फोटो.) काळोखाच्या वेळी विशेषत: पावसाळ्यात ज्या प्रकाशात फोटो घेतात तो प्रकाश. हा 'विद्युतजन्य आर्क' नावाचा विशिष्ट प्रकाश कर्बापासून देण्यात येतो. [इं.]

**आर्कारी** स्त्री. (वहाणेचा) थोरला (पहिला) पट्टा. (तळास शिवण्यात येणाऱ्या वक्राकृती दोन पट्ट्यांपैकी अलीकडचा पट्टा.) हा दुसऱ्यापेक्षा रुंद असतो. शोभेसाठी कोठे कोठे या पट्ट्यावर एक अगर तीन गुंड्या बसवतात. (गो.)

**आर्केस्ट्रा** पु. १. वाद्यवृंद; वाद्यवादक समूह. २. नाट्यगृहात प्रेक्षक व रंगभूमी यांच्यामध्ये वादकगणांची बसण्याची जागा. ३. वरच्या दर्जाच्या प्रेक्षकांची बसण्याची जागा. [इं.]

**आर्गन दीप** (विअ.) हवेत आढळणाऱ्या एक प्रकारच्या रंगरहित व वासरहित वायुतत्त्वांनी युक्त असा दिवा. [इं.+सं.]

**आर्गळा** स्त्री. अडसर. पहा : **अर्गळा** : 'आपोआप बेड्या तुटल्या शृंखळा । बंदाच्या आर्गळा कुलपें कोंडे ।।'– तुगा १०.

**आर्गुमास** न. कात, गूळ घालून तयार केलेला चुना.(गो.)[पोर्तु. ऑर्गामस]

**आर्जक** वि. जोडलेले; पूर्वसंचित.

**आर्जकु** पु. थाट; शृंगार; आरास : 'दुसरे सराव्याचा व डेऱ्याचा आर्जकु पाहून थोडेसे दु:खहि जाले.'– पेद २०.८०.

**आर्जणे** क्रि. मिळवणे : 'सायासें पुण्य आर्जिजे ।'– ज्ञा २.२५३.

**आर्जव** न. सरळपणा; प्रामाणिकपणा; साधेपणा; भलेपणा: 'तैसें प्राणिमात्रीं सौजन्य । आर्जव तें ।' –ज्ञा १६.११३. [सं. ऋजु]

**आर्जव** स्त्री. न. १. स्तुती; विनंती; सेवा; उपासना; मनधरणी: 'कैसें याचें आर्जव फळलें ।' – गुच ९.२२. २. (ल.) खुशामत; थुंकी झेलणे; हांजी हांजी करणे : 'आर्जव वाटेल त्याने वाटेल त्याचें करावें. तें करण्याची सनद अगर हक्क कोणी कोणास द्यावा लागत नाहीं.'– लोटिकेले ३.१६७. [फा. आर्झू.]

**आर्जवशक्ति–क्ती** स्त्री. सभ्यपणे किंवा नम्रपणे वागण्याचा गुण; चांगली रीतभात; सौजन्य; कुलीनता. [सं. आर्जव]

**आर्जव संपादन** न. (अशुद्ध प्रयोग) मनधरणी; हांजी हांजी; खुशामत. (क्रि. करणे).

**आर्जविणे** उक्रि. आर्जव करणे; खुशामत करणे; हांजी हांजी करणे; आर्जव करून प्रसन्न करणे; मिनतवारी करणे.

**आर्जवी–वू** वि. १. आर्जव करणारा; आर्जवात राहणारा. २. खुशामत करणारा; हांजीखोर. ३. आर्जवासंबंधी. ४. लीन, नम्र. ५. खुशामत करून आपले काम साधणारा. (वा.) **आर्जवी असणे**– लखलाभ होणे : 'तुम्हांस मागितलें होतें तेवढेंही तुमचे वस्तु देवविले नाहीं. बरें. तुमचें तुम्हांस आर्जवी असो.' – ब्रच २९५.

**आर्जव्य लावणे** क्रि. वशिला, भीड लावणे : 'अलीकडे संकर सेणवो याणें आर्जव्य लाऊन येथील सर्व कारभार आपखुद (आपण स्वत:) करू लागला '–शांदुसं ई परि ११.

**आर्जुदा** वि. असंतुष्ट; नाखूष : 'मनाई वगैरे येथील साहूकार वगैरे यांचा माल बंद पडला. खरीदी फरोख्ती न चाले या अर्थी साहुकार आर्जुदा.'– पुअभा ३.३८.

**आर्जू** स्त्री. इच्छा : 'बल्की मागील फडचे व पुढें स्वच्छता व्हावी ऐसी कल्याणराव यांची आर्जू'– मइसा. ७.

वि. इच्छा करणारा; इच्छुक : 'गोहजवालाहि फार आर्जू आहे कीं ग्वाल्हेर घेऊन माझा मुलुख सोडून द्यावा.' – मदबा १.१९०. [फा. आर्झू]

**आर्जूमंद –वंद** वि. आर्जू; इच्छुक : 'फराशीस सर्काराशी दोस्ती करण्यास वकील पाठवून बहुत आर्जूमंद'– ऐलेसं ७.६.६६; 'अगोदर कांहीं आर्जुवंद नव्हतो व पुढें ही आम्ही होत नाहीं.'– मइसा ६.६०५.[फा.]

**आर्जो** स्त्री. मनधरणी; आर्जव : 'तेथील अमीर आमची आर्जो करितात.'– मइसा ३.४२८. [फा. आर्झू]

**आर्टिकल** न. १. वृत्तपत्रातील किंवा मासिकांतील लेख : 'आर्टिकलची मर्यादाहि भरत आली. – आगर ३.१४२. २. नियम; कसर; सॉलिसिटर होण्यासाठी करावा लागणारा करार. ३. वस्तू. ४. उपपद. [इं.]

**आर्टिलरी** स्त्री. तोफा; तोफखाना. [इं.]

**आर्टेशिअन झरा** पु. (भूशा.) खडकातील विशिष्ट दाबामुळे भूगर्भातील पाणी ज्यातून वर येते असा झरा.

**आर्टेशिअन द्रोणी** पु. (भूशा.) खडकातील विशिष्ट दाबामुळे भूगर्भातून पाणी वर येण्याची क्रिया जेथे प्रामुख्याने आढळते असा भूप्रदेश.

**आर्डि** स्त्री. दरी; गिरिकंदर : 'जैसिया भंवती दीसति आर्डि ।'– राज्ञा ९.८०.

**आर्त** स्त्री. १. उत्कंठा; आतुरता; तळमळ; इच्छा : 'पाहे पां श्रीशंभूची प्रसन्नता तया उपमन्यूचिया आर्ता । काय क्षीराब्धि दूधभाता । देइजेचिना ।' – ज्ञा ५.११.

वि. १. रोगी; रुग्ण; आधिव्याधिग्रस्त. २. दु:खित; पीडित; त्रस्त; विपन्न; अनाथ : 'नातरि आर्ततें स्पर्शिजे । अळूमाळू ।'– ज्ञा १३.२८८. ३. आतुर; उतावळा. सामा. शब्द– कामार्त, क्षुधार्त, रोगार्त, तृषार्त वगैरे. [सं.]

**आर्तक** वि. उत्कंठित असणारा; आतुर असलेला : 'अहो ऐका भाविक । संत आर्तक मुमुक्षु ते ।'– निगा १५२. [सं. आर्त]

**आर्तणे** सक्रि. तळमळणे.

**आर्तता** स्त्री. आतुरता; व्याकुळता: 'आर्ततेनें आरोळी ठोकली.'– पुत्र २५.

**आर्तदानी** वि. भक्तांची इच्छा पुरविणारा : 'परमेश्वर, आर्तदानी' – लीचउ १३८.

**आर्तबंधु –धू** पु. दीनबंधू; पीडितांना संकटांतून सोडविणारा: 'आइकें गा आर्तबंधू ।निरंतर कारुण्यसिंधू ।'– ज्ञा १४.३. [सं.]

**आर्तभूत** वि. उत्कंठेने पीडलेला; खंत घेतलेला; आर्त झालेला : 'पत्रिका देखोनि कृष्णनाथ । श्रवणार्थी आर्तभूत ।।'– एरुस्व ३.५३. [सं.]

**आर्तव** पु. १. स्त्रियांचा विटाळ; स्त्रीरज; शोणित. रजस्वलेचे चवथ्या दिवसाचे स्नान.

वि. १. विटाळासंबंधी. जसे :– आर्तवदोष= प्रदर, धुपणी वगैरे

विटाळासंबंधी रोग. २. ऋतूत उत्पन्न होणारे; योग्य काळाचे. [सं.]

**आर्तव (सांपातिक) वर्ष** न. (ज्यो.) सूर्याने वसंतसंपातबिंदू लागोपाठ दोनदा ओलांडून जाण्यामधील अवधी. ऋतुचक्राची आवर्तने येवढ्या अवधीने पुन: पुन: होतात. [सं.]

**आर्तवंत** वि. उत्सुक; आतुर : 'धाविन्नले लहानथोर । आर्तवंत पहावया ।'– मुआदि २८.५४. [सं. आर्त]

**आर्तसाधु–धू–अभिमानी** वि. दीनांचा दयाळू; दु:खितांचा परामर्श घेणारा; आर्तबंधू. [सं.]

**आर्तस्वर** पु. दु:खिताचा आक्रोश; दु:खाची आरोळी; संकटाच्या वेळची हाक. [सं.]

**आर्ता** क्रिवि. अलीकडे; इकडे : 'देव पर्ताचि आर्ता ।'– दावि ४१३.

**आर्ति–र्ती** स्त्री. १. दु:ख; पीडा; उपद्रव : 'जयाचि आर्तीचि भोगित । विषयीं त्यजिलें संत ।'– ज्ञा २.१७०. २. उत्कट इच्छा; आतुरता : 'कीं गोपिकांची पुरवावया आर्ती । मी झालों श्रीपती कामारा ।'– एभा १६.३१४.३. आजार; रोग. ४. नाश; क्षय. ५. दिवे ओवाळण्याचा विधी. [सं. आर्ति]

**आर्तिक** वि. इच्छा करणारा; इच्छाळू; सकाम; लोभी : 'मग तो म्हणें स्त्रियेकारणें आर्तिकु नरू काय न करी ।'– पंच ४.७. [सं. आर्त]

**आर्तिया** वि. व्यथित; दु:खी.

**आर्ते** अ. आवडीने.

**आर्तेल** वि. आर्त, उत्कंठित.

**आर्तो** क्रिवि अलीकडे; जवळ; अगोदर. पहा : **अरता** (चि. गो.)

**आर्थ** वि.१. अर्थासंबंधी; विषयासंबंधी; वाच्यार्थासंबंधी. शाब्द याच्या उलट. २. अभिप्रेत; ध्वनित; गर्भित. [सं. अर्थ.]

**आर्थिक** वि. १. पहा : **अर्थ**. २. अर्थशास्त्रानुसार. पहा : **अर्थशास्त्र.** ३. संपत्तीच्या आयव्ययासंबंधी; नफ्या–तोट्यासंबंधी. सांपत्तिक; द्रव्य, धन यासंबंधी. [सं.]

**आर्थिक अनुशास्ति–स्ती** स्त्री. (अर्थ.) एका देशाने दुसऱ्या देशावर आणलेला आर्थिक दबाव किंवा बहिष्कार.

**आर्थिक आढावा** पु. (अर्थ.) संस्था किंवा देश यांच्या गतकाळातील – काही ठरावीक काळातील आर्थिक व्यवहाराचे समालोचन.

**आर्थिक आधारसामग्री** स्त्री. एखाद्या गोष्टीच्या, संस्थेच्या, देशाच्या अर्थविषयक अभ्यासासाठी गोळा केलेली माहिती.

**आर्थिक अरिष्ट** न. अर्थव्यवहाराच्या दृष्टीने अस्थिर, अडचणींचा व संकटाचा काळ.

**आर्थिक कल्याण** न. (अर्थ.) व्यक्ती किंवा देश यांच्या अधिकाधिक आर्थिक गरजा पूर्ण करणे.

**आर्थिक कार्यक्षमता** स्त्री. (अर्थ.) प्रत्येक कामगाराची अधिकाधिक सरासरी उत्पादन करण्याची क्षमता.

**आर्थिक खंड** पु. (अर्थ.) केवळ जमिनीच्या वापराबद्दल जमिनीच्या मालकाला मिळणारा मोबदला.

**आर्थिक दाब** पु. बहिष्कारादी साधनांनी अडवणूक करून आर्थिक नुकसान पोचविणे : 'मुसलमानांवर घातलेला नैर्बंधिक व आर्थिक दाब तसाच चालू ठेवला पाहिजे.'– के ११.११.४१.

**आर्थिक धोरण** न. (अर्थ.) उत्पादन, वितरण, रोजगार इत्यादींविषयींचे देशाचे धोरण.

**आर्थिक निर्णय** पु. (अर्थ.) अर्थशास्त्रीय दृष्टिकोनातून सर्वच वस्तूंचा पुरवठा मर्यादित असल्यामुळे दोन वस्तूंपैकी एकीची निवड करण्यासंबंधीचे निर्णय.

**आर्थिक नियोजन** (अर्थ.) आयव्ययाबाबत केलेली योजना, व्यवस्था. पैशाची आवक व विनियोग या संबंधीचा स्थूल आराखडा.

**आर्थिक परिपक्वता** स्त्री. (अर्थ.) आर्थिकदृष्ट्या देश पूर्ण विकसित होणे.

**आर्थिक परीक्षण** न. आर्थिक परिस्थितीचे समालोचन; आढावा. [सं.]

**आर्थिक पाहणी** स्त्री. (अर्थ.) एखादे कुटुंब, जात, जमात, कंपनी, समाज किंवा राष्ट्र यांच्या आर्थिक बाबींची पाहणी.

**आर्थिक प्रश्न** पु. (अर्थ.) अनंत गरजा आणि मर्यादित व पर्यायी उपयोगाची साधने यामुळे निर्माण होणारा व्यक्ती किंवा देशापुढील प्रश्न.

**आर्थिक प्रेरणा** स्त्री. (अर्थ.) माणसाच्या सर्व क्रिया पूर्णपणे आर्थिक विचाराने प्रेरित झालेल्या असतात. (असे अर्थशास्त्र मानते).

**आर्थिक भूगोल** पु. (अर्थ.) भूगोलाची एक शाखा. एखाद्या ठिकाणची नैसर्गिक आणि आर्थिक परिस्थिती आणि त्या ठिकाणी होणारे उत्पादन व त्याचे वितरण यांच्या परस्पर संबंधाचा अभ्यास.

**आर्थिक वर्ष** न. अर्थसंकल्पाच्या कालावधीकरिता मंजूर केले जाणारे (१ एप्रिल ते ३१ मार्च अखेरपर्यंतचे) वर्ष.

**आर्थिक वस्तु–स्तू** स्त्री. (अर्थ.) व्यवहारोपयोगी माल; माणसाला उपयुक्त असलेली व पैसे देऊन घेतलेली वस्तू किंवा सेवा.

**आर्थिक विषमता** स्त्री. समाजात संपत्तीची विषम वाटणी असणे, काही लोक अतिश्रीमंत, काही अति गरीब.

**आर्थिक व्यवहार** पु. सांपत्तिक देवघेवीचा व्यवहार.

**आर्थिक (अभि) वृद्धि–द्धी** स्त्री. (अर्थ.) राष्ट्रीय उत्पन्नाचा विस्तार किंवा विविध वस्तूंच्या आणि सेवांच्या उत्पादनाचे एकूण परिणाम.

**आर्थिक संकट** बिकट सांपत्तिक परिस्थिती, आवक व खर्च यात असमतोल.

**आर्थिक संघर्ष** पु. (अर्थ.) अर्थशास्त्राच्या मूलभूत सिद्धांताच्या सहज सिद्धतेला अर्थशास्त्राशी संबंधित विचारांमुळे निर्माण होणारी बाधा.

**आर्थिक संबंध** पु. (अर्थ.) मागणी आणि पुरवठा, मालक आणि मजूर, उत्पादन आणि वितरण इत्यादी गोष्टींशी निगडित असलेले, दोन व्यक्ती, संस्था किंवा देश यांच्यातील संबंध.

**आर्थिक संस्था** स्त्री. (अर्थ.) १. बँका, हुंडीघरे, व्यवसाय संस्थांमधील आस्थापन विभाग इ. आर्थिक व्यवहार करणाऱ्या संस्था. २. उत्पादन, विनिमय, वितरण, कुटुंबव्यवस्था, करपद्धती, श्रमव्यवस्था इ. आर्थिक व्यवहारांशी संबंधित असणाऱ्या संस्था.

**आर्थिक सातत्य** न. (अर्थ.) देशाच्या आर्थिक धोरणाचे सातत्य. राजकीय स्थित्यंतरे झाली तरी आर्थिक धोरण स्थिर राहावे ही अपेक्षा.

**आर्थिक सिद्धान्त** पु. (अर्थ.) अर्थशास्त्रातील सिद्धांत.

**आर्थिक स्वातंत्र्य** न. (अर्थ.) १. खाजगी किंवा मुक्त उपक्रमांच्या

उत्पादन, वितरण, विनिमय इत्यादी बाबतींतील आर्थिक स्वातंत्र्य. २. उपभोग, व्यवसाय वगैरे बाबतींत असलेले व्यक्तीचे स्वातंत्र्य.

**आर्थिक हितविरोध** पु. (अर्थ.) क्रेता (खरेदीदार) आणि विक्रेता यांच्या परस्पर हितसंबंधात निर्माण झालेला संघर्ष, विरोध.

**आर्थिकार्थ** पु. गर्भित अर्थ; समाविष्ट केलेला अर्थ. [सं.]

**आर्थे**. पु. वि. साठी; करिता.

**आर्दुसी** वि. अदूरदर्शीपणाची :'तेथून पत्रे समागमीयासी आली. या गृहस्तास मात्र न आले हे गोष्टी आर्दुसी दिसोन आली.'– पेद १४.२२.

**आर्द्र** वि. १. ओला; आंबट ओला; दमट; भिजलेला. सामा. शब्द– दयार्द्र, प्रेमार्द्र इ. २. रसभरित; ताजा. ३. मायाळू. ४. मऊ. [सं.]

**आर्द्रक** न. १. आले; औषधी कंदमूळ. यापासून सुंठ तयार करतात; अद्रक. [सं.]

**आर्द्रक** पु. (भौ.) हवेतील बाष्प शोषून घेणारा पदार्थातील घटक; उदा. मिठामध्ये सोडियम नायट्रेट. [सं.]

**आर्द्र गलन** न. (कृषी) पिकांचा एक रोग. शेतात पाणी साचून राहिल्यामुळे जमिनीतील कवकांची वाढ होऊन पिकाची मुळे व खोड कुजून झाडे मरतात. [सं.]

**आर्द्रणीयता** स्त्री. (भौ.) हवेतील बाष्पाने ओले होण्याची पदार्थाची क्षमता. उदा. मीठ. [सं.]

**आर्द्रता** स्त्री. १. ओलेपणा; ओलावा. २. (भौ.) हवेतील दमटपणा. [सं.]

**आर्द्रतादर्शक** पु. आर्द्रता दर्शविणारे उपकरण. [सं.]

**आर्द्रताधारणक्षमता** स्त्री. (कृषी.) ओलावा धरून ठेवण्याची शक्ती. [सं.]

**आर्द्रता निष्कासक** पु. (भौ.) आर्द्रता शोषून घेणारे, काढून टाकणारे यंत्र.

**आर्द्रतामापक–मापी** न. पु. हवेतील आर्द्रता मापण्याचे यंत्र. [सं.]

**आर्द्रतामितीय** वि. (भौ.) आर्द्रतामापकाने मोजण्यायोग्य. [सं.]

**आर्द्रतारोधक** वि. दमटपणा, ओलसरपणाला प्रतिबंध करणारे; आर्द्रतेच्या परिणामापासून मुक्त ठेवणारे. [सं.]

**आर्द्रतारोधी स्तर** पु. (स्था.) ओलीचा प्रतिबंध करणारी उपाय योजना; पाणी झिरपू नये म्हणून दिलेला थर. [सं.]

**आर्द्रतालेखी** पु. (भू.) वातावरणातील, हवेतील आर्द्रतेचे प्रमाण मोजून, त्यामध्ये कालानुसार होणारे बदल दाखवणारा आलेख. [सं.]

**आर्द्रताशोषी** वि. (स्था.) हवेतील आर्द्रता, ओलावा शोषून घेणारे. [सं.]

**आर्द्रा** न. (ज्यो.) सत्तावीस नक्षत्रांपैकी सहावे नक्षत्र. [सं.]

**आर्धिक** पु. अर्धेलीने शेत करणारा. [सं.]

**आर्य** पु. १. एक मानववंश. २. वैदिक; प्राचीन वैदिक ऋषींनी, ब्राह्मणांनी प्रस्थापित केलेल्या देवतांची उपासना करणाऱ्या जातींस हे राष्ट्रवाचक नाव होते. श्रेष्ठ; विद्वान; आदरार्ह व्यक्ती; कुलीन; सदाचारी माणूस. ३. तामीळनाडूतील पत्तर ब्राह्मणांची विशिष्ट जात. [सं.]

**आर्य** वि. १. कुलीन; श्रेष्ठ, सभ्य; मान्यवर; वडील: 'परमोदार वृकोदर भुज यश देतील शीघ्र आर्यातें ।'– मोसभा १.८६. २. आर्य लोकांना शोभणारे (वर्तन, वागणूक इ.). ३. यथोचित; मुक्त; लायक; योग्य. जसे :– आर्यवेष, आर्यधर्म. ४. आर्यांसंबंधी; आर्यांची. जसे :– आर्यभाषा; आर्यदेश. ५. मोठ्या माणसांना आदरार्थी वापरतात; बहुमानसूचक पदवी : 'आर्या, राजा कोठें बाधे तददर्शनेंचि भीमाते ।'– मोकर्ण ३९.४९. ६. स्वामी. ७. गुरू. [सं.]

**आर्यन** वि. पहा : **आर्य** (भाषा, समाज.) १. आर्यभाषा, लोक वगैरे संबंधी; आर्यपरंपरेतील. २. आर्यभाषा वंश. याला इंडो–युरोपियन किंवा इन्डोजर्मानिक म्हणतात. संस्कृत, झेंद, पार्शी, ग्रीक, लॅटिन, केल्टिक, ट्युटॉनिक् आणि स्लॅव्हानिक या भाषा आपल्या अर्वाचीन पोटभाषांसह आर्यन भाषेत समाविष्ट केल्या जातात. ३. आर्यमानववंश; आर्यभाषा बोलणारे लोक यात येतात. हिंदू, इराणी, ग्रीक, रोमन, इंग्रज, फ्रेंच, जर्मन, स्कँडिनेव्हियन्, स्पॅनिश, केल्ट व स्लाव्ह हे प्रमुख लोक या आर्यन महावंशात येतात.

**आर्यपुत्र** पु. श्रेष्ठ, थोर माणूस (संस्कृत नाटकात नवऱ्याला संबोधतात): 'आतां आर्यपुत्रापुढें स्वतां केलेली कांहीं कविता म्हणून दाखीव.'– कमं ३०. [सं.]

**आर्यभाषा** स्त्री. १. आर्यभाषावंशातील भाषा. २. संस्कृत भाषा. [सं.]

**आर्यमिश्र** पु. पूज्य आणि सन्मान्य मनुष्य. [सं.]

**आर्यवृत्त** न. सदाचार; सद्वर्तन. [सं.]

**आर्यवैद्यक** पु. आर्यांची एक प्राचीन औषध पद्धती. [सं.]

**आर्यव्रत** न. आर्यांनी घालून दिलेले आचार, नियम; कुलीनता; सदाचरण (शरणागताची उपेक्षा न करणे, दीनांवर दया करणे इ.) : 'आता यांही आर्यव्रत कैसें जीवितार्थ सोडावें ।' – मोउद्योग ४.७६. [सं.]

**आर्यसत्य** न. बुद्धाच्या तत्त्वज्ञानातील चार महत्त्वाच्या तत्त्वांपैकी प्रत्येक. दुःख, दुःखकारण, दुःखनाश व दुःखनाशाचा मार्ग ही चार आर्यसत्ये.

**आर्यसमाज** पु. स्वामी दयानंद सरस्वती यांनी स्थापन केलेला, वेद मानणारा धार्मिक पंथ. हा भारतातील एक महत्त्वाचा एकेश्वरी पंथ. आधिभौतिक, आध्यात्मिक, सामाजिक वगैरे बाबतीत मनुष्य जातीचे कल्याण करावे हा याचा उद्देश आहे. हा संप्रदाय जातिभेद मानीत नाही.

**आऱ्या** पु. फजिती; बोऱ्या.

**आर्या** स्त्री. १. श्रेष्ठ आदरणीय स्त्री; साध्वी स्त्री : 'चाले देवी (द्रौपदी) जीचा कैवारी देवदेव ती आर्या ।' – मोस्त्री २.३. २. एक वृत्त; छंद; आर्येच्या प्रत्येक अर्धात साडेसात मात्रागण असतात. त्यात विषमस्थानी ज गण नसावा आणि षष्ठस्थानी ज गण किंवा न गण यावा हा सामान्य नियम आहे. आर्या, गीती, उपगीती, उद्‌गीती आणि आर्यागीती असे आर्यावृत्ताचे पाच भेद आहेत. यातील प्रथम आर्या हा वृत्तप्रकार संस्कृत असून मराठीत हे वृत्त क्वचित येते. आर्या नावाचे जे वृत्त मराठीत आहे ते वास्तविक गीती आहे. मोरोपंत यासच आर्यावृत्त म्हणतात : 'शोभा आर्यावृत्तें आली भुलतील यासि कवि कोटी ।'– मोभीष्म १२.७९. पहिल्या व तिसऱ्या पादात १२ मात्रा, दुसऱ्यात १८ आणि चौथ्यात १५ असे वास्तविक आर्यावृत्ताचे लक्षण आहे. [सं.]

**आर्या (र्ये) करणे–होणे** क्रि. १. खाली करणे, खाली ठेवणे, पाहणे : 'आगबोटीचो जिनो आर्या कर'. २. (नाविक) शीड उतरणे; शीड खाली करणे, पाडणे. ३. मरणे (कु.) : 'बातमी ऐकल्याबरोबर त्याने आर्या केलान्' ४. नाश करणे : 'भटाच्या गवताची आर्या रे ।

माझ्या बैलानं केल्यान् रे.' [का. आरु=विझणे, नष्ट होणे]

**आर्यागीति–ती** स्त्री. या वृत्ताच्या पहिल्या व तिसऱ्या चरणात १२ मात्रा असून दुसऱ्या व चौथ्या चरणात २० मात्रा असतात. उदा. सत्यप्रतिज्ञ भीमस्तुतिपावे बंधु कंठलोहित पानें । मारी वसिष्ठ–सुत जो मुनि विश्वामित्र तत् कीर्तितोहि तपानें ।।' – मोकर्ण ६.३२. [सं.]

**आर्यावर्त** पु. आर्यांचा प्रदेश; आजचा उत्तर हिंदुस्थान; आर्यावर्ताची प्राचीन सीमा–पूर्व समुद्र, पश्चिम समुद्र, उत्तरेस हिमाचल आणि दक्षिणेस विंध्याचल यामधील भाग. [सं.]

**आर्युभाव** पु. (आविर्भावाबद्दल चुकीने) आविर्भाव; हूल; खोटा रोख : 'गोवलास आर्युभाव दाखवून अंजनवेलीचे दुचले काम करावे असे याचे मानस आहे.' – पेद ३.८२. [सं. आविर्भाव]

**आर्ये** वि. आर्ष : 'श्रीप्रभु आर्ये:' – लीचउ ४६६.

**आर्ष** वि. १. ऋषीसंबंधी; ऋषिप्रणीत (ग्रंथ, आचार, प्रयोग इ.) : 'राम यशोग्रंथशतीं क्षम जीवां जेविं आर्ष ताराया ।' – मोमीष्म ५.२५. २. पवित्र; पूज्य; प्रमाणभूत; आधारभूत (ग्रंथ, संप्रदाय, ज्ञान वगैरे) ३. (ल.) मंद; जड; अव्यवस्थित; मूर्ख; हट्टी; हेकेखोर. ४. असमंजस; अयुक्त; मूर्खपणाचे; फाजील, बोबडे (भाषण, मत वगैरे) : 'तैसें माझें आर्ष बोलणें पूर्ण । अंगीकाराल वाटतें ।' –मवि १.४१. ५. विचित्र; तऱ्हेवाईक; रूढीस धरून नसलेला. (ऋषिकाली संस्कृत भाषा प्रचलित असल्याकारणाने तिच्यात नेहमी फेरबदल होत असत म्हणजे पूर्वीचे काही शब्द व रूपे नष्ट होऊन नवीन शब्द व रूपे भाषेत येत असत. ऋषींनी आपल्या वेदमंत्रांत योजिलेले शब्द व रूपे ही जेव्हा अप्रचलित झाली तेव्हा त्यांना आर्ष (ऋषींनी योजिलेली) असे म्हणत व असे अप्रचलित शब्द व रूपे चालू नसल्यामुळे कानाला विचित्र लागत. यावरून आर्ष शब्दाचे लाक्षणिक अर्थ झाले). ६. प्राचीन; पुरातन; अप्रचलित; प्रचारात नसलेला. ऋषींचा; ऋषिकालीन. [सं.]

**आर्षप्रयोग** पु. ऋषींनी दृष्ट अशा वेदग्रंथांत पाणिनीय व्याकरणाच्या नियमांना सोडून असणारे प्रयोग. [सं.]

**आर्षभाव** पु. भोळा भाव : 'परि सगुणस्वरूपें आर्षभावार्थे।' –सप्र १.७१. [सं.]

**आर्षविवाह** पु. त्रैवर्णिकांच्या अष्टविवाहातील एक प्रकार, यात मुलीचा बाप वराकडून गाय व बैल यांच्या एक किंवा दोन जोड्या घेऊन त्यास आपली मुलगी देतो. पहा : **अष्टविवाह** [सं.]

**आर्षविज्ञान** न. पुरातन, प्राचीन काळाविषयीचे ज्ञान मिळविण्याचे शास्त्र.

**आर्हत** पु. (तत्त्व.) जैन–सिद्धांतवादी; जैन. [सं.]

**आऱ्हा** क्रिवि. अलीकडे: 'जया जेंआऱ्हां परौतें। जया जें पुढेंमागौतें।' – ज्ञा १५.७५.

**आल** स्त्री. एक झाड; याच्या मुळ्यांपासून व सालीपासून तांबडा रंग काढून त्याचा कातडे, रेशीम वगैरे रंगविण्याकडे उपयोग करतात. आलवण म्हणजे आल वृक्षापासून जो तांबडा रंग निघतो त्याने रंगविलेले कापड. [सं. अलक्तक]

**आल** वि. १. कोवळा. (गो.) २. मूर्ख; खुळा.(गो.) [सं. आर्द्र]

**आलक** पु. कपटी, लबाड मनुष्य; गुन्हेगार : 'असे जरी आपण आलकांही । न देय येऊं पण आळ काहीं ।' – सारुह १.६५. [सं. आल ]

**आलकट पालकट** उलटापालट.

**आलकडी** पहा : **हालकडी** (गो.)

**आलक्तक** पु. अळिता. [सं.]

**आलख** पु. अलक्ष; ब्रह्म. अलख–अल्लख : 'आलख तो सकळाहुनि वर्ता ।' – दावि ३७९.

**आलखणे** क्रि. हलणे; ओघळणे : 'तो परमानंद आलखैला ।' –शिव ४१०.२. आळून गोळा होणे : 'जैसा आलखला ब्रह्मरसु'– ज्ञाप्र ४३२. [सं. आ+लख्=जाणे, हलणे]

**आलखती** क्रिवि. अदृश्य; न कळण्याजोगे : 'सत्यलोकीं आलखती बाधिलीं । तैसीं अमृतें दृष्टीं पातलीं ।' – दाव ४७८. [सं. आलक्ष्य]

**आलखपलख, आलखटपलखट मारणे** क्रि.मांडी घालणे : 'आलख पलख मारी थवपी कमाना तीर कसुनि कस्ती.' –सला ६३.

**आलखिडी** स्त्री. विळा, कोयती वगैरे ठेवण्याचा खाच पडलेला एक लाकडी तुकडा. एका वाटोळ्या फळीस एक लांबट खाच पाडून त्या खाचेत कोयता ठेवतात व त्या फळीस एक आडवे भोक पाडून त्यातून दोरी ओवून त्या दोरीने फळी कंबरेस बांधतात.

**आलग** न. १. अग्र, टोक. २. (ल.) क्षेप; फेक : 'पुढें दृष्टिचेनि आलगें । खोचि कीं निवटी मागें ।' –अमृ २.१९. [सं. अग्र अ+लग्]

**आलगट** वि.द्वाड; कुभांडी; हलकट; हूड; अल्लड : 'आलगटा अवघ्याचि नारी । नसतींच गाऱ्हाणीं आणितां ।' – निगा ३५.

**आलगट(ड) बालगट(ड)** न. बालंट; तोहमत; आळ; आरोप; कुभांड. (ग्रा.)

**आलगणे** सक्रि. व्यापणे.

**आलगरजी** वि. पहा : **अलगरजी**: 'कामापुरता हात वरवर कुरवाळसी । आलगरज्या काम करून कंटाळसी ।' –होला ८५.

**आलजुल** न. सामानसुमान.

**आलट पालट – उलटापालट** –अदलाबदली.

**आलतड** पहा : **अलतड** (गो.)

**आलतणे** क्रि. परत जाणे.

**आलतू फालतू** वि. सामान्य; भलतासलता; वाटेलतो; क्षुल्लक; दर्जा नसलेला : 'दुसरी आलतु फालतु परीक्षणं न छापण्याच्या प्रतिज्ञेनं ...' मसासं १.

**आलपीन** स्त्री. केसांची विशिष्ट रचना. (कर.)

**आलबत** क्रिवि. अवश्य; जरूर; न चुकता : 'रत्ना म्हाताऱ्यानं तुला आलबत येऊन भेटून जायला सांगितलंय बघ!' – ऊन ७९.

**आलबालं** न. कौतुकाने मायेने कुरवाळणे, गालावरून हात फिरवून बोटे मोडणे : 'पॉर आलबालं व्हतं.' –उपरा ३८.

**आलबेल** वि. शांत; सर्वत्र चांगले : 'सारे कसे अलबेल झाले.' – कोउन्हे ३५.

**आलबेला–ली** वि. पहा : **अलबेला** : 'सखये शृंगाररसाचे रंगे । बनली आलबेली ।' – होला ८४; हलका; सैल; अनिश्चित; लाडका. क्रिवि. सहजासहजी.

**आलम** पु. १. जग; प्रजा; अलम; लोक; रयत : 'रघुनाथराव बिरादर असता त्याणीं दगा केला । आलमशिवाय (दुनियेविरहित) गोष्ट त्यांजकडून अमलांत आली.' -ऐलेख ७.३५६६. 'संपूर्ण आलमांत जालें कीं ...यांची दोस्ती होऊन टोपीकरास सजा करावी ऐसा नक्षा अला हा लौकिक.'-मइसा १९.९२.२.काळ; स्थिती; अंमल : 'कराराप्रमाणें फडचे करावे, यास दिरंग लावून तफावत होणें दोस्तीचे आलमांत दुरूस्त नाहीं.'-मइसा ५.२४.[फा. आलम् = जग]

**आलमखाना** पु. वाद्यशाळा. [फा.]

**आलमगिरी** पु. एक अल्प किंमतीचे नाणे. (व.) पहा : **अलमगिरी पैसा**

**आलमगीर** पु. जगज्जेता. [फा.]

**आलमण्डाइन** न. (भूशा.) लोह व अल्युमिनियम सिलिकेटचे रासायनिक संघटन असणारे 'यार्नेट' खनिज. (उपरत्न म्हणून व घर्षक म्हणून वापरतात.) [इं.]

**आलमपन्हा** वि. जगाचा संरक्षक; जगदाश्रय. [फा.]

**आलमारी** स्त्री. पहा : **कपाट** : 'विषयसुखाच्या आलमाऱ्या माझ्या तीवर तपेरुद्रा ।' -पला ९३.

**आलय** न. १. घर; राहण्याचे ठिकाण; निवासस्थान; वसतिस्थान, मंदिर. २. साठा; खजिना; कोठार. सामा. शब्द - देवालय, धर्मालय : 'जें धर्मालय म्हणिजे ।' - ज्ञा १.८६. [सं.]

**आलर्कविरोधी उपचार** पु. कुत्र्या मांजरासारख्या जनावरांच्या चावण्यामुळे होणाऱ्या रोगांवरील उपचार; पिसाळलेला कुत्रा चावून होणाऱ्या रोगावरील उपचार; श्वानदंशावरील उपचार.

**आललटप्पू** वि. बेजबाबदार; अर्थहीन : 'अंमलदारांच्या आललटप्पू शिफारसी ...' - जोफु १९५.

**आलव** स्त्री. हाक : 'पिसें आलव घाली ।' - राज्ञा १८.२६.

**आलवणे** क्रि. हाक मारणे; मनधरणी करणे.

**आलवाकालव करणे** क्रि. कालवणे : 'पसा दोन पसे हरभऱ्याची डाळ तुरीच्या अर्ध्या-पाऊण पायली डाळींत आलवाकालव केली.' - बाविबु ३३७.

**आलवारजोडा** पु. (चर्म.) मारवाडी जोडा. (साध्या घाटाचा) अलवार नावाच्या गावावरून तेथील धाटणीचा जोडा.

**आलवाल** न. आळे; पाणी राहण्यासाठी झाडाभोवती केलेला खळगा : 'आलवाल न भरितां जळें । सुरतरू ओपी इच्छिलीं फळें ।' - मुआदि ३०.१३०. [सं.]

**आलविं** क्रिवि. टप्प्यात; आटोक्यात; मर्यादेत : 'तुम्ही यातें दृष्टीचिये आलविं राखा ।' - महासंत ७४.

**आलस** पु. (आयु.) पांडुरोगाचा एक प्रकार.

**आलस, आलस्य** पु. आळशीपणा; पहा : **आळस** : 'सर्वेद्रिंया जाड्य । मनामाजीं मौढ्य । माल्हाती दार्ढ्य । आलस्याचें ।।' - ज्ञा १४.१७९. [सं.]

**आलंकारिक** वि. १. अलंकारयुक्त; भूषणे, दागिने, शोभादायक वस्तू यांनी मंडित; सुशोभित; सुंदर. २. साहित्यशास्त्रातील गुणांनी युक्त; उपमा, रूपक वगैरे काव्यगुणांनी पूर्ण (पद्य, ग्रंथ, भाषासरणी). ३. अलंकारशास्त्राचे ज्ञान असणारा (मनुष्य). [सं.]

**आलंग** पु. तट; रांग; लष्करी शिपायांच्या झोपडीची रांग : 'हल्ली गोवळकोटानजीक भांडीयाच्या भाराखाले जाऊन आलंगा घालून बैसले आहेत.' - पेद ३३.४७.

**आलंपेड्डयार** वि. वडील अगर पालक यांचा दाब नसलेला; रिकामटेकडा. (गो.)

**आलंब** पु. (भौ.) १. तरफेचा आधारबिंदू अथवा घर. २. ओळंबा; लंबक. ३. आश्रय; आसरा; अवलंबन : 'तेयेचेनि आलंबें । तो तयासी न विसंबे ।' - विसिं ७.१२३. [सं.]

**आलंबक** पु. ज्यावर कुठलीही वस्तू अडकवून, टांगून ठेवता येईल असा खिळा, खुंटी, कडी, हलकडी इ. [सं.]

**आलंबन** न. १. लोंबणे. २. आधार; आश्रय. ३. स्थान. ४. मनोवृत्तीला उत्तेजक कारण. ५. एकाग्रता. ६. जोडलेला. [सं.]

**आला** अक्रि. येणे या धातूचा भूतकाळ; आगमन झाले, केले.

**आला** वि. अत्युच्च; सर्वश्रेष्ठ : 'प्रस्तुतचा रंग तर असा दिसतो जे आला व अद्ना खाविंदापाशीं बराबर.' - मइसा ५.९.[फा. आला = श्रेष्ठ]

**आलागेला - भला** वि. १. येणारा जाणारा. २. (ल.) पै-पाहुणा; अतिथि-अभ्यागत . (वा.) **आल्यागेल्याचे घर** - ज्या ठिकाणी नेहमी पाहुणे येतात ते घर.

**आलात** पु. कोलीत; जळते, पेटलेले लाकूड.

**आलातचक्र** न. कोलीत वाटोळे फिरविले असता दिसणारे चक्र, कडे : 'आलातचक्रींचा निर्धार । अग्नि सत्त्य मिथ्या चक्र ।'- एभा १३.५५१. [सं.]

**आलाथ** पु. वल्हयाच्या काठीला लावण्यात येणारा रुंद पंखा : 'पुढे आरमाराची आलाथ, अवदा(न) काठ्या आदीकरून उतरणी करीत असो.' - पेद.

**आलादर्जा** पु. उत्कृष्ट, सर्वोत्तम स्थिती. (ना.)

**आलादिवस** क्रिवि. खंड न पडता; दररोज; प्रत्येक दिवशी.

**आलान** न. १. हत्ती बांधण्याचा खांब. २. बेडी. ३. दोरी. [सं.]

**आलाप** . पु. १. बोल; बोलणे; भाषण : 'त्यांचिये वाचेचा ठाईं । कृष्णवीण वार्ता नाहीं । आलापु जितुका कांहीं । तो तद्विपर्याक जयांचा ।' - रास २.६७२. २. परस्पर भाषण-बोलणे; संभाषण; चर्चा : 'परी हे अप्रासंगिक आलाप । आतां असतु न बोलों संक्षेप ।' -ज्ञा ७.४४. ३. वर्णन; गोष्ट; कथा : 'जयाचिये वाचें माझे आलाप । दृष्टी भोगी माझेंचि रूप ।' - ज्ञा ९.४४५. ४. गाण्यातील-संगीतातील स्वर, तान, लकेर; रागाचा आकार. ५. आवाजी जमविणे; गाण्याची तयारी करणे. ६. (ल.) रडणे; ओरडणे. [सं. आ+लप्]

**आलाप (फ)चारी** स्त्री. आलाप; आलाप काढणे; गाण्याला सुरूवात करण्यापूर्वी स्वर जमविणे. [सं.]

**आलाप (फ)णे, आलापि(फि)णे** अक्रि. आलाप करणे; आलाप घेऊन गाणे; आलाप काढणे.

**आलापाला** पु. पाला, कंदमुळे वगैरे भक्ष्य; जाडेभरडे अन्न; कदन्न; देह

निर्वाह होण्यासाठी निष्कृष्ट दर्जाचे अन्न. [पालाचे द्वि.]

**आलापिनी** स्त्री. १. (संगीत.) सतराव्या श्रुतीचे नाव. २. वीणा. [सं.]

**आलाबला** संकट, गंडांतर.

**आलाबु** पु. भोपळा : 'आला मुनी जवळि, आलापितांचि जळिं आलाबुसा उसळला ।' – आभा.४५ [सं.]

**आला हजरत** पु. सर्वश्रेष्ठ स्वामी. [फा.]

**आलाहिदा** वि. अलग : नबाबांनी बहीर बुणगे कुली आलहिदे करून राये सोनगड सातकोस आहे तेथें पाठविले.' – पेद ३०.१५८. [अर.]

**आलांवतीण** स्त्री. १. बाळंतपणात मेलेल्या स्त्रीचे पिशाच. (गो.) २. (ल.) राक्षसी; भांडखोर स्त्री.

**आलिकाव** अलकाब, पदव्या दर्जा : 'यावरून हुजरूत अमानत फर्माविले तरी आपण साहेबांचे दौलतरखाह आहो आपले आलिकाव चालिले पाहिजे.' – पेद ३१.२६.

**आलिखणे** सक्रि. गाठणे : 'आगा हीव आलिखले ।' – ज्ञा १४.३७३.

**आलिजा, आलिजाहा, आलेजा** वि. उच्च पदवीचा. उदा. आलीजा बहादूर शिंदे. पहा : **अलीजाहाँ** [फा.]

**आलिजाह कारभार** पु. बेशिस्त, दिरंगाईचा कारभार : 'शिंद्यांचा घरचा प्रकार व श्रीमंतांच्या घरचा एकच धारा यांचा आलिजाह कारभार तेथें यांची स्थित व स्वरूप राहणें कळतच आहे.' –हिंदखं २.४५.[फा.]

**आलिजाहाँ** वि. प्रचंड; अवाढव्य; फार मोठ्या प्रमाणावर असलेला (कारखाना, संस्था, सरंजाम इ.). [फा.]

**आलियाडे** न. हट्ट : 'ग्रंथाचें हें आळियाडें '– राज्ञा १८.१७५४.

**आलिशान** वि. १. उच्च दर्जाचा; मोठ्या मानाचा. [फा.]

**आलिंग** पु. १. बैलास मारायच्या कोरड्याची तुताती(वादी) ज्या कातडी कडीला–वळ्याला (कोरड्याच्या मुठीच्या अग्राशी) बांधलेले किंवा अडवकलेले असते ते वळे, कडी. २. (ल.) (शिवाळीचे) पाते वर काढण्यासाठी किंवा बैलाच्या गळ्यास घट्ट करण्यासाठी उपयोगात आणायची दोरी. [सं.]

**आलिंगणा घालप** क्रि. आर्जव करणे; लोटांगण घालणे; मनधरणी करणे.

**आलिंगणे** क्रि. कवटाळणे; मिठी मारणे; आलिंगन देणे; भेटणे; जवळ घेणे; प्रेम व्यक्त करणे : 'कीं आलिंगावेंआं श्रीकृष्णराजा ।' – दाव १७१.

**आलिंगन** न. कवटाळणे; मिठी; भेट (क्रि. देणे).

**आलिंगित** कवटाळलेला; मिठी मारलेला; आलिंगन दिलेला.

**आली** स्त्री. आली या वनस्पतीच्या मुळापासून तांबडा रंग तयार करणारी, नेमाडात राहणारी जात.

**आली** स्त्री. १. सखी; मैत्रीण : 'गेली मदत कराया संकटि पाहुनि आपुली आली.' २. पंक्ती; ओळ; रांग. ३. हट्ट. [सं.]

**आली** वि. उंच; भव्य. [फा.]

**आलीए** अ. अग : 'काइ आलिए.' – गोप्र २.

**आलीक** वि. अज्ञात; अल्प; हीन. [सं. अलीक]

**आलीगेली** स्त्री. नफानुकसान; जमाखर्च; यशापयश; जयपराजय.

**आलीगोल** स्त्री. निजामाच्या राज्यातील बिनकवायती फौज.

पु. तोफेचा गोलंदाज; मराठ्यांच्या लष्करातील बिनकवायती पायदळ शिपायांचा जमाव. हे अलिगोल शिपाई बव्हंशी मुसलमान धर्माचे असत. लढायांत ते गोल करून म्हणजे जमावाने हल्ला चढवीत व तो चढविताना तोंडाने 'या अलि' अशी रणगर्जना करीत : 'त्या बराबर सरंजाम साठ हजार पठाण व चाळीस हजार आलीगोल व तीनशे तोफा चालू याप्रमाणे आहे.' –होकै ८.

**आलीढ (अंगहार)** पु. (नृत्य.) आलीढस्थान करून व्यंसितकरणातील हाताप्रमाणे हात करून खांद्यावर हळूहळू ठोकणे, डावा पाय नूपुर व उजवा आलात करणे. नंतर उजवा पाय पुढे फेकून हात उरोमंडल करणे, शेवटी करिहस्त व कटिच्छिन्न क्रमाने करणे.

**आलीढस्थान** न. (नृत्य.) ऐन्द्रस्थानाप्रमाणे उभे राहणे व उजवा पाय पाच ताल पुढे ठेवणे. (मल्लयुद्ध), शत्रूंची हेटाळणी वगैरे गोष्टी या स्थानात उभे राहण्याने सूचित होतात. [सं.]

**आलीम** पु. पंडित.

**आलीमिकदार** वि. उच्च; मोठ्या शक्तीचा. [फा.]

**आलीयह** वि. उंच; उच्च. [फा.]

**आलीवाट** स्त्री. आलेला मार्ग : 'बाण वर्षला घनदाट । रुक्मिया भुलविला आलीवाट ।' – एरुस्व १२.१३५.

**आलींबन** पु. आधार; आश्रय : 'पात्रादि आलिंबन । नाहिं हुताशना.' – उगी ४४.

**आलुकणे** क्रि. भूक लागणे : 'जैसें कां आलुकैलें । तुषान्न सेवी ।।' – राज्ञा ५.१०९.

**आलुका–की, आलुकेपण** १. व्यसन, भूक. : 'कसा प्रीतीचा आलुका देव ।' – किंसुदाम ३०. २. आळ : 'ते आळुकी नोहे नुरोधिं । बोलातें एया ।।' – राज्ञा १५.२२२.

**आलुता– ते** खेडेगावातून आढळणारे १२ आलुते – बलुतेदार. (तेली, तांबोळी, साळी, माळी, जंगम, कलावंत, डौरी, ठाकर, तराळ, सोनार, चौगुला इ. चा समावेश त्यात होतो.)

**आलुबुखार** एक प्रकारचे आंबूस पण रुचकर फळ, त्याचे झाड. डिंक काढण्यासाठीही या झाडाचा उपयोग केला जातो.

**आलुबोखर** पु. एक औषध.

**आलुबोंडा** पु. बटाटेवडा : 'त्याला कधी मिसळची प्लेट तर कधी आलुबोंडा देत असे.' –शिळान ८५.

**आलुमाल** वि. किंचित, थोडे.

**आलुलकी** स्त्री. आपुलकी; आपरूप; प्रेम; जीव लावणे : 'जर कदी तेयनी लई खा खा म्हणून आलुलकी केली की खायचो.' – आप २८.

**आलु –लू** पु. १. खाण्याजोगे कंदमूळ. २. बटाटा, गोराडु वगैरे कंद. (हिं.) [सं.]

**आलेख** पु. १. बिंदू, रेषा, वक्र किंवा स्तंभ यांच्या साहाय्याने एका चलाचे दुसऱ्या चलाशी असणारे तुलनात्मक संबंध दाखवणारी सांकेतिक

आकृती. २. चित्र; आराखडा : 'दैनंदिनी आंदोलनाचा आलेख मात्र दर्शविणारी आहे.' –के २.५.३९. ३. लिहिणे. ४. पत्र. [सं.]

**आलेखन** न. (ग.) (दिलेल्या समीकरणाचा) आलेख काढणे. [सं.]

**आलेखपत्र** न. (ग.) आलेख ज्याच्यावर काढायचा तो विशिष्ट कागद. [सं.]

**आलेख्य** न. चित्रे काढणे; चित्रकला; रेखाटणे; लिहिणे; चौसष्ट कलांपैकी एक कला. पहा : **चौसष्टकला** [सं.]

**आलेपण** (आलेपण्) न. येण्याची स्थिती : 'कीं निद्रेचेनि आलेपणें । निदेलें तें जाय प्राणें ।' – अमृ ४.२९.

**आलेपाक** पु. आल्यापासून तयार केलेला एक औषधी पदार्थ; आल्या–साखरेची वडी. [सं.]

**आलेपात्र** न. आलागेला; आलेला गृहस्थ; येणारी व्यक्ती : 'जे राजे गर्वे जाती । आल्या पात्रातें नोळखती । तयांचीं सर्वस्वें जातीं । सागरामाजीं ।।' – कालिका ८.६.

**आलेभाऊ, आलेमाय, आलेभाव** पु. सोयरेधायरे; दूरचे नातेवाईक (वा.) **आलेभाऊ कोल्हेभाऊ** – येणारे जाणारे; मौज पाहणारे; तमासगीर; बघे; नुसती गंमत पहायला किंवा फायदा करून घ्यायला जमलेली, ज्यांचा काहीही संबंध नाही अशी माणसे.(गो.)

**आलेया** अ. अरे : 'आलेया मीं गंगातीरीहुनि येत असे.' – गोप्र ५८.

**आलेयापालया** अ. कोठूनतरी; अलीकडे पलीकडे : 'आलें असैल आलेया पालया भरूनि.' – दृपा १२.

**आलेवार तालेवार** वि. मानमरातब सुखचैन भोगणाऱ्या; प्रतिष्ठित; वैभवसंपन्न : 'आजपर्यंत आलेवार तालेवार होऊन जिने दिवस काढले.' – स्फुगोभा १.१७.

**आलोक–आलोकन** पु. न. १. पाहणे; बघणे; अवलोकणे. २. दृश्य; देखावा; रूप; आकार : 'पैल खांब कां पुरूखु । ऐसा निश्चयो नाहीं एकु। परी काय नेणों आलोकु। दिसत असे ।।' – ज्ञा १४.७६. ३. प्रकाश; तेज; दीप्ती. ४. विचार; विचार करणे. ५. जयजयकार. ६. खिडकी; गवाक्ष. [सं.]

**आलोकनशक्ति –क्ती** स्त्री. नजरेचा, दृष्टीचा पल्ला, आवाका. [सं.]

**आलोकशब्द** पु. राजाने चालताना, किंवा सभेत बसला असताना लोकांकडे पाहावे, रामराम घ्यावा इ. अर्थाचे, चोपदार बोलतात ते शब्द; ललकारी; पुकारा. [सं.]

**आलोकित** वि. पाहिलेला; अवलोकन केलेला; अवलोकित.
न. (नृत्य.) नृत्यामध्ये एखाद्या वस्तूकडे पाहणे. [सं.]

**आलोच** पु. १. विचार; मनोगत; आलोक; कुजबुज; देखावा : 'मग समुद्रापैलीकडील देखे । स्वर्गींचा आलोचु आइके मनोगत वोळखे । मुंगियेचें ।।' –ज्ञा ६.२६९. २. ध्वनी; विचार. [सं.]

**आलोचणे** सक्रि १. पाहणे; बघणे; विचार करणे : 'मायेपुढें बाळका । रिगतां न पडे शंका । तैसे मन देतां लोकां । नालोची जो ।।' – ज्ञा १३.३६१. २. सांगणे : 'धांवोनि मिठी घालावयासी । हितगुज आलोचासी ।' – एभा ११.११५७. [सं.]

**आलोचन–ना** न. स्त्री. १. परीक्षण; निरीक्षण; बारकाईने पाहणे; विचार करणे; चर्चा; विचार : 'तयाप्रती कुलिश पाणी । आलोचना करी विश्वासे ।' –मुआदि १७.२९. २. टीका; समीक्षा. [सं.]

**आलोट** वि. खरे; अनावर.

**आलोडणे, आलोढणे** उक्रि. १. हालचाल करणे; ढवळाढवळ करणे; इकडेतिकडे करणे; घुसळणे; मिसळणे. २. (ल.) मनात घोळणे; घोळवणे; पुन्हा पुन्हा विचार करणे. ३. अध्ययन करणे; अभ्यासणे : 'तैसे शब्दजात आलोडिलें ।' – ज्ञा १०.१७२.

**आलोडन** न. (अप.) आलोढन. १. कोणताही पदार्थ ढवळण्याची क्रिया. २. (ल.) विषयातील (मथितार्थ) तत्त्व समजण्यासाठी अनेक प्रकारे, पुन:पुन्हा ग्रंथाचा अभ्यास करून पाहण्याचा क्रम; दीर्घ अभ्यास; अध्ययन. [सं.]

**आलोडित** वि. आलोडन केलेले. [सं.]

**आलोड्य** वि. (विप्र.) आलोढ्य; (क्व.) आलोड. १. आलोडन करण्याजोगा; ज्याचे आलोडन करायचे आहे असा (ग्रंथ वगैरे). २. पुष्कळ आलोडन झाल्यामुळे चांगला परिचित झालेला (विषय) किंवा त्या विषयाचा तज्ज्ञ (माणूस).
न. प्रावीण्य; पढिकत्व; पांडित्य. [सं.]

**आलोढणे** प्रा. क्रि. पारंगत होणे, हस्तगत करणे, घुसळणे.

**आलोनी** वि. अळणी : 'हें आलोनी : हें खारट. ' – गोप्र ३९. [सं. अलवण]

**आलोमश शेवरा** पु. वैरण म्हणून उपयोगात येणारे एक प्रकारचे द्विदल गवत.

**आलोह** पु. कळवळा : 'मातेचा आलोही जाणौनि ।' – ऋम २७४.

**आलोहित** क्रिवि. तांबडे, लाल.

**आल्हाता** पु. नळा, धोटा, पिचकारी.

**आल्गप्ती** क्रिवि. अचानक. (व.)

**आल्पीय भूक्रांति–ती** स्त्री. (भूशा.) 'आल्प्स' पर्वतासारखे घडीचे पर्वत होण्याच्या क्रमवार प्रक्रिया व घडामोडी.

**आल्फा** पु. (भौ.) ग्रीक मुळाक्षरांतील पहिला वर्ण. त्याचा उपयोग अशा संक्षेपाने होतो. नवीन सूत्रांना, शोधांना द्यावयाच्या सांकेतिक नावासाठी त्याचा वापर केला जातो. [इं.]

**आल्फा** न. रेडिओ ॲक्टिव्ह द्रव्यापासून उद्भवणारे किरण : 'आल्फा कणांचा वर्षाव थांबला की.....' अअं २५६.

**आल्ब्युमिन** न. दुधात, अंड्यात, रक्तात, वनस्पतीत सापडणारा श्वेतकल्कबल्क; (रसा.) अंड्यातील पांढरा बलक; (वन.) गर्भपोषक द्रव्य; बीजसंवर्धक द्रव्य; मगज; (वै.) रक्तातील एक घटक. ओजस द्रव्य.

**आल्म** न. धैर्य; धाडस. (गो.) [पोर्तु. आनिम्]

**आल्माआवे** स्त्री. बेढब, कुरूप स्त्री. (वै.) [पोर्तु.]

**आल्याड** क्रिवि. अलीकडे. : 'सरस्वतीच्या आल्याड आली.' – बाय २.२.

**आल्यापावली** क्रिवि. एकदम; ताबडतोब; आलातसा : 'तू आल्यापावलीं परत जावेंस हे फार चांगले.' – नाकु २.१२.

**आल्हर** पु. अंगाई गीत : 'गाऊनिया आल्हर मुखें । निर्जी निजवी त्या सुखें ।' – निगा १२५.

**आल्हात–ता** स्त्री. पिचकारी धोटा; नळा : 'आतुसोने– केतकीचे आल्हाते.' – रुस्व ५५.

**आल्हाद** पु. आनंद; संतोष; उल्हास; हर्ष. [सं.]

**आल्हादक** व. आल्हाद–आनंद देणारा; आनंददायक; उत्साहदायक; उत्साहकारक. [सं.]

**आल्हादणे** उक्रि. आनंदणे; संतोष पावणे : 'संफुल्लसारसमुखीसखीसंध नयन कल्हारीं आल्हादला ।' – आसी ६०. [सं. आल्हाद]

**आल्हादन** न. आनंदणे; उल्हास; आनंद; संतोष. [सं.]

**आल्हादित** वि. आनंदित; उल्हसित; हर्ष पावलेला.

**आव** पु. १. डौल; थाट; मोठा आविर्भाव; प्रतिष्ठा; महत्त्व : 'एथूनि रसां झाला आवो । रसाळपणाचा ।' –ज्ञा १.३३ (क्रि घालणे, आणणे). २. नीटनेटकेपणा; सुंदरता; बाह्य सौंदर्य; आकार मनोरमता; सुंदर घाट; (सामान्यत:) आकार; घाट; घडण : 'सप्तावरणेंसि प्रचंड । आवो साधूनि उदंड । निर्माण केलें ब्रह्मांड । मयूरांड आकारें ।' – एभा २४.१४२. ३. धैर्य; हिंमत; हिय्या; धमक; अवसान (क्रि धरणे, आणणे) : 'त्या धर्मसैनिकांचे झाले होतेचि सर्व आव रिते ।' – मोकर्ण १२.५. ४. दाब; आटोप; आब; दबदबा; शक्तिक्षेम; बल; सामर्थ्य : 'तुझिया लाठेपणाचा आवो । तिहीं लोकीं ।' –ज्ञा २.९. ५. नेम; पवित्रा : 'दृढ साधोनियां आवो । निजबळें घालिता घावो ।' – एभा १२.५८८. ६. घाट; घडण (भांडे वगैरेंची). ७. उद्रव; उद्गम. ८. ऐट; धीर. ९. अवडंबर. १०. उद्भवणे; पिकणे : 'पेरिजे नुसदी हिंसा । तेथ आवैल काय अहिंसा ।' –राज्ञा १३.२२३.

**आव** स्त्री. आतड्यासंबंधीचा रोग; आमांश; पोटातील अपक्वता, अपचन, अजीर्ण.

**आव** वि. निर्भेळ; ताजे; कोरे; (व.) [सं.]

**आव** पु. आवक; प्राप्ती; लाभ : 'केवढा माझा उपावो । करिता कोण प्रस्तावो । केलियाहि आवो । काय येथ ।।' – ज्ञा १८.६२२. [सं. आय]

**आव आणणे** क्रि. अंगात कर्तृत्व नसताना किंवा श्रीमंती, अधिकार नसताना ती असल्याचा देखावा करणे.

**आवई** स्त्री. १. आवई; कंडी; लोकवार्ता; भुमका; वार्ता; खबर; गप्प; बोलवा; बातमी. २. प्रसिद्धी; प्रख्याती : 'धर्मराज श्रीमंत धन्याची त्रैलोक्यामध्यें आवई' – ऐपो २०२. [सं. आ+ई] (वा.) **आवई उडविणे** – बातमी पिकविणे. **आवई पडणे** – बातमी पसरणे : 'मोठे बक्षीस मिळेल अशी आवई पडल्यावर बक्षिसाचे लालचीने जिकडून तिकडून तमाशेवाले आले.' – निमा १४८. **आवई खाणे** – भिणे : 'मुख्य शत्रु आवाई खाऊन व्यग्र जाहला आहे तो सांवर धरितो.' – मराआ ७. **आवई उठणे** क्रि. अफवा पसरणे.

**आवई तवई** स्त्री. संकट; हालअपेष्टा : 'आवया तवया भोगितला तो अकस्मात तिर्थरूप सिवापा निवर्तले.'– मइसा १२.३३७.

**आवक** वि. आलेला; प्राप्त झालेला; आयात; मिळालेला. स्त्री. १. जमा; उत्पन्न : 'जरी त्याची आवक मोठी असून काटकसरही मोठी असे तरी त्याला जबर कर्ज असे.' – इंरामू २९२. २. आलेली पत्रे, पुस्तके, कागद वगैरे; याच्या उलट जावक.

**आवक कारकून** पु. येणाऱ्या टपालाची नोंद ठेवणारा कारकून.

**आवकजावक** स्त्री. १. आयातनिर्यात; जमाखर्च. २. आवक जावक बारनिशी; आल्यागेल्या पत्रांची नोंद.

**आवकटा** पु. आश्चर्य; नवल.

**आवकणे, आवंकणे** अक्रि. अडखळणे; थांबणे; कचरणे; साशंक होणे. : 'पण यशवंत तूं करणार नां आज सारं? राधाबाईंनीं जरा अवंकत विचारलें.' – हाच कां धर्म २३९.

**आवक बारनिशी** स्त्री. ज्या वहीत आलेल्या कागदपत्रांची नोंद करतात ती वही.

**आवक वाहनखर्च** पु. माल वाहून आणण्याकरिता होणारा खर्च.

**आवक्श चिंतणे** आयुष्य चिंतणे; भले पाहणे; कल्याण चिंतणे; आशीर्वाद देणे: 'ह्यो त्याला बरकत येऊ दे म्हनत आवक्श चिंतत म्होरं जायाचा.' – उपरा ९९.

**आवखादा** वि. अवघड, अडचणीचा : 'शत्रू रात्रीचा दगा करणार. गवत रानामध्यें बहुत. जागा आवखादा. राउताचा इलाज नाहीं.' – पेद ३३.२९०.

**आवखादणे** अक्रि. धास्ती घेणे; धीर सोडणे : 'विश्वासराव अंबारींत होते म्हणूनच टिपल्यासारखे मारले गेले आणि ते गेल्यावर फौजेनें आवखादला.' – सकाळ २८.१०.३५.

**आवग** न. माशाच्या पोटातील आतडे. शरीराचा नाजूक भाग. पु. १. अहंकार. २. काढणी, बंधन : 'जो माया चि पालाणवी । आंगा अवगु घालवी ।' – राज्ञा १८.१०५७.

**आवगी** स्त्री. स्वैरबुद्धी.

**आवगणी** स्त्री.वेष; सोंग : 'वराहाची घेऊन आवगणी । अंशें येके धरिली धरणी । तेथें कायीं वानुं श्रीचक्रपाणी । उद्धरिला गोवर्धनू ।।' – रुस्व ३१५. [सं.]

**आवगणे** अक्रि. वाईट मार्गाला लागणे; स्वेच्छाचारी, दुराचारी बनणे; बहकणे; बावचळणे. : 'चोरीजारी अनाचर । करूनि नाहीं म्हणती नर । तैसा नावेक राजेश्वर । असत्या जागीं आवगला ।' – मुआदि १६.११६१. [सं. अव+गम्]

**आवगणे** सक्रि. १. धारण करणे; अंगीकारणे; अंगी आणणे, घेणे; अवगणी घेणे : 'कीं मानुषपणा आवगला । भणऔनि सत्यलोकां एओ बिहाला ।' – दाव ३५२.

**आवगणे** अक्रि – स्वच्छंदपणे वागणे; माणसातून उठणे. [सं. अव+गम्]

**आवगणे** सक्रि. आटोपणे. [सं. आव = आटोप]

**आवगत** वि. धारण केलेले : 'आवगतें आंग निवीळे' – उगी ७६.६०१.

**आवगळा** वि. अधिक उत्कट.

**आवगुंडी** स्त्री. (शेती, चर्मकारी) मोटेच्या बैलांस मागे ओढण्याकरिता कासऱ्यास जोडलेली वादी.

**आवग्र** क्रिवि. १. आरंभापासून अखेरपर्यंत; सतत; एकसारखा; अखंड; न थांबता : 'तेथें तीन दिवस आवग्र रात्रंदिवस पाउस लागला.' – पेद २०.१९८. २. सर्व; एकूण एक : 'रमण्यात जाऊन स्वार व गाडदी

